# SACRED SONGS.

# देवाचें भजन करण्याचीं गीतें.

---

"गीतें व स्तोत्रें व अध्यात्मसंबंधी प्रबंध यांकडून एकमेकांसीं बोलत आपल्या अंतःकरणांत प्रभूला गात व गायन करीत जा." एफे ५:१९.

---

Published by the American Mission.

*6th Edition.*

---

मुंबईमध्यें

अंग्लो-वर्न्याक्युलर छापखान्यांत छापिलें.

१८७८.

1878

## NOTE.

This Sixth Edition of the Sacred Songs is an exact reprint of the *Fifth* Edition, which was published in 1874. An index of subjects has been added and a few typographical errors corrected.

---

ही "देवाचें भजन करण्याच्या गीतांची" सहावी आवृत्ति जी पांचवी आवृत्ति १८७४ साली प्रसिद्ध झाली तिची बरोबर पुनरावृत्ति आहे. विषयांची अनुक्रमणिका मात्र अधिक घातली आहे; आणि थोड्या टैपाच्या चुक्या सुधारिल्या आहेत.





# अनुक्रमणिका.

# अनुक्रमणिका.

# अकरा भागांची अनुक्रमणिका.

या गितांच्या पुस्तकाचे अकरा भाग केले आहेत ते येणेप्रमाणें:—

## INDEX OF SUBJECTS.

# विषयांची अनुक्रमणिका.

# HYMNS.

# गीतें.

## 1. PRAISES OF GOD.

## १. ईश्वराचीं स्तवनें.

### 1. Praise to God. Ps. 100.

"Before Jehovah's awful throne."

### १. ईश्वराची स्तुति. स्तोत्र १००.

L. M. ८ अक्षरी.

१ अहो लोकानो, नम्र व्हा,
देवाची स्तुति वाढवा,
भिडेने द्याहो त्याला मान,
तो जगत्कर्त्ता हर्त्ता, जाण.

२ जनाला त्याने निर्मिलें,
पूर्ण चातुर्य घडिलें,
कळपावाणी पाळितो,
दीनांला मार्गी लावितो.

३ लोकानो, करा स्तुति फार,
माना देवाचे उपकार,
मिळुनी त्याच्या देवळीं
वर्णाहो कृपा सगळी.

४ देवाची पूर्ण श्रेष्ठता,
अढळ त्याची सत्यता,
ईश्वरी मोठी करुणा
ही सर्वकाळ सरेना.

---

### 2. Praise to God. Ps. 148.

### २. ईश्वराची स्तुति. स्तोत्र १४८.

8, 7. ८, ७ अक्षरी.

१ आदामाच्या वंशस्थानो,
तुह्मी स्तवा ईश्वरा,
आकाशांतल्या दुतानो,
वंदा हो परात्परा.

२ अहो सूर्य चंद्र, तुह्मी
ईश्वराला गौरवा,
तारे हो, आभाळा, भूमि,
त्याची स्तुति वाढवा.

३ कां देवाच्या हुकुमाने
सर्व जगें निर्मिलीं,
त्याच्या दृढ नियमाने
तीं अखंड चाललीं.

४ पावसारे, वारेयानो,
विजा, गर्जनाहो घोर,
सुसाट्याच्या वादळानो,
ईश्वराला ह्मणा थोर.

५ जन हो आबालवृद्ध,
तुह्मी स्तवा ईश्वरा,
करा चरित्रें प्रसिद्ध,
वंदा हो परात्परा.

---

3. PRAISE TO GOD. Ps. 150.
"Praise ye Jehovah's name."

### ३. ईश्वराची स्तुति. स्तोत्र १५०.

6, 4. ६,४ अक्षरी.

१ देवाची स्तुति गा,
महिमा अवघा
वर्णा अपार,
पवित्र मंदिरीं,
वर्ने अभ्रांतरीं,
गा कृपा ईश्वरी,
मोठा उद्धार.

२ स्तवा देवासमोर,
गजर करा थोर,
वाखाणा नाम;
वाद्यें वाजवितां,
सुस्वर काढितां,
गा देवममता,
कृपेचें काम.

3 कीर्त्ति ही वाढवा,
सर्वत्र गाजवा,
देवाला म्या;
तो श्वास चालवी,
गरजा पुरवी,
तो देव गौरवी,
हालेलूया.

---

4. SING UNTO THE LORD.

### ४. सुवंद्य नाम. स्तोत्र ६९.

Hindu M. पद.

ध्रु० प्रभु तव नाम सुवंदित, गावें.
१ मर्त्य पतित मी, वंदूनि तुजला;
म्यां चिरकाल जगावें. प्रभु०
२ त्वदितर ऐसा कोण? जयाला
गाउनि नित्य नगावें. प्रभु०
3 निशिदिनिं करसी, उपकारच तूं;
हे कां म्यां उबगावे. प्रभु०
४ मज ताराया, ख्रीस्त दिलासी;
तर तुज म्यां उमगावें. प्रभु०
५ देसि सदात्मा मजला कीं म्यां
तव मार्गीं न डगावें. प्रभु०
६ सदया मज दे दान असें कीं,
तव मुख नित्य बगावें. प्रभु०

---

5. PRAISE TO GOD. Ps. 136.
"Let us with a gladsome mind."

### ५. ईश्वराची स्तुति. स्तोत्र १3६.

7s. ७ अक्षरी.

१ देवस्तुति वाढवा,
त्याची दया गाजवा,
ईश्वराची करुणा,
सर्वकाळ सरेना.

२ त्याने जग निर्मिलें,
सूर्य चंद्र नेमिले,
सदा करी ममता,
ढळेनाची सत्यता.

3 स्वलोकांस रात्रीं घोर
दिधले प्रसाद थोर,
ईश्वराची करुणा
सर्वकाळ सरेना.

४ प्राणिमात्रां पोषितो,
त्यांची पापें सोसितो,
सदा करी ममता,
ढळेनाची सत्यता.

५ आमची दशा पाहिली,
तेव्हां कृपा योजिली,
ईश्वराची करुणा
सर्वकाळ सरेना.

६ प्रिय पुत्र धाडिला,
पुर्णोद्धार साधिला,
सदा करी ममता,
ढळेनाची सत्यता.

---

6. Praise to God.
"Praise to God, the great Creator."

### ६. ईश्वराची स्तुति.
8, 7. ८, ७ अक्षरी.

१ करा स्तुति ईश्वराची,
सर्व जगीं गाजवा,
दया कृपा सांगा त्याची,
कीर्त्ति सर्व वाढवा.
२ बापा, किती तूं दयाळू,
माणसांला पाळसी,
जनालागीं तूं कृपाळू,
पातक्यांला तारसी,
३ इहलोकीं स्तुति गावी,
वर्णा त्याचे उपकार,
परलोकीं वाढवावी,
कसा साधिला उद्धार !
४ करा स्तुति ईश्वराची,
सर्व जगीं गाजवा,
बाप, पुत्र, आत्मा, यांची
मोठी कीर्त्ति वाढवा.

---

7. Praise to God. Ps. 95.
"Come, sound His praise abroad."

### ७. ईश्वराची स्तुति. स्तोत्र ९५.
S. M. ६,८ अक्षरी.

१ चला हो, काढूं स्वर,
देवाला देऊं मान,
यहोवा आहे परात्पर,
देवाधिदेव, जाण.
२ तयाने पृथ्वी गोल
हाताने घडिला,
सीमांमध्यें समुद्र खोल
करुनी ठेविला.
३ या, लवूं त्यासमोर,
गुडघे टेंकूं लीन,
तो आमचा कर्त्ता अति थोर,
व आम्ही पापी दीन.
४ आगत्य ऐका आज,
नका हो चिडवूं,
भक्तीने करितां नमाज
स्तवनें वाढवूं.
५ हीं कृपावचनें
जरी न ऐकतां,
कीं आपलीं अंतःकरणें
कठीण करितां;
६ देव क्रोधायमान
शपथ वाहणार,
कीं तुम्हीं केला अपमान,
कृपा न मिळणार.

---

8. Praise to God. Ps. 117.
"From all that dwell &c."

### ८. ईश्वराची स्तुति. स्तोत्र ११७.
L. M. ८ अक्षरी.

१ राष्ट्रांनो, वंदा ईश्वरा,
स्तवनें गा परात्परा,
ख्रीस्ताची कीर्त्ति वाढवा,
उद्धारकृपा गाजवा
२ अत्यंत देवममता,
अढळ त्याची सत्यता,
सुवंद्य होवो तो दयाळ
दिगंतरीं अनंत काळ.

---

9. Praise to God. „
"Come thou Almighty King."

### ९. ईश्वराची स्तुति.
6, 4. ६,४ अक्षरी.

१ समर्थ ईश्वरा,
प्रभू परात्परा,
तूं हो आधार;
स्तवनें वाढवूं,
तुलाच गौरवूं,
सर्वत्र गाजवूं
तुझा उद्धार.

२ हे येशू दयावान्,
अनंत शक्तिमान्,
तूं क्षमा कर;
आम्हाला हो आश्रय,
निवार सर्व भय,
दे अंतकाळीं जय,
तूंच उद्धार.

३ पवित्र आत्म्या, ये,
आमच्या मनांमध्यें
दे प्रेरणा;
आम्हाला शुद्ध कर,
मनांत सत्ता धर,
ऐकावी हो सत्वर
ही प्रार्थना.

४ हे त्र्येक देवा थोर,
आम्ही तुझ्या समोर
गाऊं अपार;
आम्हाला वैभवीं
कृपेने पोंचवीं,
स्वतेज दाखवीं,
वर्णू उद्धार.

---

10. Praise to God. Ps. 134.

"O ye that praise the Lord of light."

### १०. ईश्वराची स्तुति. स्तोत्र १३४.

L. M. ८ अक्षरी.

१ अहो, जे तुम्ही भजतां
पवित्र देवमंदिरीं,
प्रेमाने उभे राहतां
गा महाकृत्यें ईश्वरी.

२ देवाने निर्मिलें आभाळ,
पृथ्वी, समुद्रहि अगाध,
तो करो आमचा प्रतिपाळ,
वरूनी देवो आशीर्वाद.

---

11. Praise to God.

### ११. ईश्वराची स्तुति.

L. M. ८ अक्षरी.

१ प्राणीमात्रानो, तुम्ही गा
देवाचा प्रेम अवघा,
तो दयावंत जगत्पाल
करुणा करी सर्वकाळ.

२ देवाच्या ठायीं ठेवा भाव,
सत्य हें जाणा त्याचें नांव,
अनंत त्याचे उपकार,
दिनांचा करितो उद्धार.

---

12. Praise to God. Ps. 146.

"I'll praise my Maker with my breath."

### १२. ईश्वराची स्तुति. स्तोत्र १४६.

L. P. M. ८,८,८ अक्षरी.

१ देवाला गातां काढा स्वर,
स्तवीन त्याला जन्मवर;
आणि हा देह पडतो
तों मोठ्या प्रेमें स्तवणार,
मी स्तवितां न राहणार
जीवात्मा टिके पावेतों.

२ राजाचा भरवसा काय?
मातीसीं मिळे निरुपाय,
स्वबोली न ठरवती;
क्षणांत श्वास खुंटतो,
देहाचा डौल बुडतो,
ते फुलावाणी वाळती.

३ जो पूर्ण भाव ठेवितो,
देवाच्या ठायीं धन्य तो,
त्या देवें सृष्टि निर्मिली;
दिनांची करी ममता,
अनंत त्याची सत्यता,
न कधीं बोली फिरली.

४ तो डोळे देतो अंधळ्यां,
तो उठवितो खंगल्यां,

तो मुक्त करी बंदीवान;
तो अन्न देतो परक्यांस
विधवांला आणि पोरक्यांस,
तो अनाथांचा नाथ, जाण.
५ देवाला भक्त प्रिय फार,
परी दुष्टांला टाकणार
अग्नीच्या डोहीं विकराळ;
हे भक्तमंडळी, तूं गा
देवाचा प्रेम अवघा,
तो तुझा राजा सर्वकाळ.
६ देवाला गातां काढा स्वर,
मी त्याला स्तवीं जन्मवर;
आणि हा देह पडतो
तों मोठ्या प्रेमें स्तवणार,
मी स्तवितां न राहणार,
जीवात्मा टिके पावेतों.

---

13. PRAISE TO GOD. Ps. 96.
"Sing to the Lord our God."

**१३. ईश्वराची स्तुति. स्तोत्र ९६.**

S. M. ६,८ अक्षरी.

१ देवाला गौरवा,
वाखाणा त्याचें नाम,
सुवर्त्तमान गाजवा,
वंदा कृपेचें काम.
२ वर्णावी हो लोकांस
देवाची प्रीति फार,
सांगावा मूर्तीपूजकांस
कृपेचा जो उद्धार.
३ ईश्वर आहे थोर,
अनंत बलवान्,
सर्व लोकांनीं त्यासमोर
अत्यंत द्यावा मान.
४ लोकांचे देव काय?
धिक्कारा त्यांजला,
सर्व जगांचा समुदाय
देवाने निर्मिला.
५ तयाला नमतां
नेहमीं धरा भय,
पवित्रतेनें भजतां
पायांचा घ्या आश्रय.
६ देवाला स्तुति द्या,
जातीहो मानवी,
प्राणीमात्रानो, त्याला भ्या,
तो राजा गौरवी.

---

14. THERE IS A GOD. Rom. 1: 20.
"There is a God, all nature speaks."

**१४. देव आहे. रोम. १:२०.**

L. M. ८ अक्षरी.

१ दुर्जन कितीं बुद्धिहीन,
जे देव नाहीं ह्मणती,
कां सूर्य, चंद्र, रात्र, दिन,
देवाची शक्ति दाविती.
२ सकाळीं सुर्य उगवून,
चहुंकडे प्रकाशतो,
तों त्याचा कर्त्ता त्याकडून
स्वतेज स्पष्ट दावितो.
३ अनंत त्याचीं कृत्यें थोर,
समुद्र, भूमि, वारा, आग,
सर्वांचा कर्त्ता तो चतुर,
हीं त्याच्या पावलांचा माग.
४ अहो जनांनो, पाहा वर,
चहुंकडेहि लक्ष द्या,
आहेच देव परात्पर,
कबूल करा, कृपा घ्या.

---

15. SINCERITY AND HYPOCRISY.
"God is a Spirit, just and wise."

**१५. भावार्थीपण आणि ढोंग.**

C. M. ८, ६ अक्षरी.

१ ईश्वर आत्मा ज्ञानवान,
मन पारखितो,
जी वरवंगी भक्ति, जाण,
तिला कंटाळतो.

२ भक्ताची पूर्ण सत्यता
ही त्याला आवडे,
तो दांभिकाला जाणता
न पाहे त्याकडे.

३ ते टेंकितात गुडघे,
लाविती डोळे वर,
निर्बुद्धि ढोंगी अवघे,
फसती खरोखर.

४ हे देवा, मला पारखून
मन भावार्थी कर,
तेणें मी खरा सुधरून
तुला भेटेन वर.

---

16. God Incomprehensible.

"Can creatures to perfection find?"

## १६. देव अतर्क्य. इयोब ११:७,८.

L. M. ८ अक्षरी.

१ स्वयंभू ईश्वराचें मन
शोधील कसा मर्त्य जन?
अपरिमित त्याचें ज्ञान,
ते नेणताती बुद्धिमान.

२ किती उच्छ्रित हो आभाळ!
अगाध केवढें पाताळ!
जनाला अंत लागेना,
तसा ईश्वर कळेना.

३ अनंत त्याचें शक्तिबळ,
हुकूम सर्वदा अढळ,
तयाला कोण आडवील?
कीं योजनांला दूषवील?

४ निषेध जेव्हां करितो,
अंधार जगा व्यापितो,
गडगडाट गर्जती,
आकाश भूमि कांपती.

५ हे त्याचे थोडे चमत्कार,
संपूर्ण कोण वर्णणार?
देवाचा अंत लागेना,
ईश्वरी तेज साहेना.

17. There is a God.

## १७. देव आहे. रोम. १:२०.

Hindu M. अभंग.

ध्रु० देव आहे, देव आहे,
कोणी कैसें ह्मणती नोहे.

१ सूर्य चंद्र रात्र दिन,
नक्षत्रेंहि भिन्न भिन्न,
ग्रहणें व काळ तीन,
शक्ति त्याची दाविती. देव०

२ पर्जन्याची वृष्टि होतां,
विजा ढगांत गर्जतां,
घरें झाडें गारा पडतां,
शक्ति त्याची दाविती. देव०

३ भूमि वारा आग सागर,
ज्वालामुखी भयंकर,
धरणीकंप वारंवार,
शक्ति त्याची दाविती. देव०

४ जरीमरी जेव्हां येती,
लोक असंख्य मरताती,
दुष्काळानें तीच गती,
देव नसतां होती कां? देव०

५ अन्न द्रव्य कन्या पुत्र,
जागिक सुखें हीं सर्वत्र,
इच्छितां हो आहोरात्र,
कां न मिळती तुह्मा. देव०

६ मोठे मोठे ज्ञानी झाले,
तत्वें शोधितां थकले,
अंतीं निराशें बोलले,
कोणी असावा कर्त्ता. देव०

७ बहु नास्तिक जगीं झाले,
देव नाहींच ह्मणाले,
अंतकाळीं ओरडले,
हाक मारूनी देवा. देव०

८ ऐसे बुद्धिहीन किती,
देव नाहीं जे ह्मणती,

तयां नरकांतीच प्राप्ति,
दृढ निश्चय हा हो. देव०

18. There is but one God.

१८. देव एकच आहे. यशा. ४५:५.

Hindu M. अभंग.

१ देव एक देव एक,
कैसे बोलतां अनेक.
२ देव ईश्वर सोडला,
भ्रम ह्मणोनी पडला.
३ सांगूं काय दोन चार,
कोट्यावधि नाहीं पार.
४ जारकर्माच्या पोराला,
गांव बापानीं भरला.
५ तैसी मूर्तिपूजकांची
भ्रष्ट स्थिति झाली साची.

19. God's Attributes.

१९. ईश्वराचे गुण.

Hindu M. आर्या (गीति).

१ सर्वज्ञ सर्वव्यापी,
सर्वसमर्थ स्वयंभु ईश्वर हा;
निर्विकार सनातन,
स्वतंत्र त्या ईश्वरा धरूनि रहा.
२ प्रभुचे गुण वर्णाया
अगणित वर्षे उगाळली काया
तरि त्या अनाद्यनंता,
अज्ञ जना वर्णवेल हो कां या ?
३ कर्त्ता पाप कराविना
प्रभु, देती दोष लोक रायाला!
न्यायी बाप मुलाला
कुकर्म सांगेल कीं करायाला ?
४ गोडी प्रभूची थोडी
असतां खोडी समूळ पापाला;
प्रिति कर्त्या पुत्राची
दया न येणार काय बापाला ?

५ प्रभु हा किति कनवाळू,
भक्ताचें हातरूण करि नीट;
स्वकरें धरूनी हृदयीं
प्रेमालिंगी न मानितां वीट.

20. God Omniscient.

२०. ईश्वर सर्वज्ञ. स्तोत्र ९४:९,१०.

Hindu M. अभंग.

१ ज्यानें घडिलासे डोळा,
तो का असेल आंधळा ?
२ ज्यानें कान दिला परा,
तो का असेल बहिरा ?
३ ज्यानें केलें मनोधर्म,
तो का नेणें त्याचें मर्म ?
४ ज्यानें सृष्टि केली जाण,
तो कां असेल अज्ञान ?
५ प्रभु नेणें ऐसें कांहीं,
कोठें, त्रिभूवनीं नाहीं.

21. God Omnipresent. Ps. 139.
"Lord, thou hast searched &c."

२१. ईश्वर सर्वत्र आहे. स्तोत्र १३९.

L. M. ८ अक्षरी.

१ हे देवा, मला पाहसी,
सहज तूं पारखसी,
मी निजतां व उठतां
तूं नेहमी सभोंवता.
२ मनाच्या सर्व कल्पना,
संपूर्ण माझ्या भावना,
विचार शब्द सगळे,
सहज तुला कळले.
३ चहुंकडे जों पाहतों
तों तुझा हात दिसतो,
मी कोठें तरी चालतां
तूं नेहमी सभोंवता.
४ हें तुझें ज्ञान केवढें!
समजण्यापलीकडे!

हे देवा, तुला चुकुनी
मी कोठें जाऊं लपुनी?
५ ही गोष्ट सुचुनी अक्षय,
पापाचें मला वाटे भय,
हे देवा, मला घेरितां
तूं नेहमीं सभोंवता.

---

22. GOD INFINITE.
"Great God, how infinite art thou."

## २२. ईश्वराचें थोरपण.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ हे देवा, तूं अत्यंत थोर,
मनुष्य किडे, जाण,
सर्वांनी तुझिया समोर
भिडेने द्यावा मान.
२ समुद्र तारे नव्हते
तेव्हां तूं भगवान्,
व जरी सर्व मरते
तरी तूं जीववान्.
३ तुझ्या दृष्टीला उघडें
हें जग सर्वकाळ;
हें तुझें ज्ञान केवढें!
अत्यंत हो विशाळ.
४ अनंत काळ जाणसी.
कांहींच लपेना,
जुनें कीं नवें तुजसीं
हें कांहीं वाटेना.
५ आम्हाला नित्य चिंतना
अपार जाचती,
हे देवा, तुझ्या योजना
सहज चालती.
६ अनंत ईश्वरासमोर
मनुष्य किडे, जाण,
त्यातुल्य कोठें नाहीं थोर,
सर्वांनी द्यावा मान.

23. GOD'S IMMUTABILITY. Ps.102.
Through endless years Thou art the same.

## २३. ईश्वर पालटत नाहीं. स्तोत्र १०२.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ अनादि थोर ईश्वरा,
तसाच राहसी,
असा नाहींच दुसरा,
तूं न पालटसी.
२ प्रारंभीं त्वांच मांडिले
पृथ्वीचे पाये स्थिर,
आभाळ हातें घडिलें,
तें स्थापिलें खंबीर.
३ हीं सगळीं जुनीं होऊन
काळें बिघडतील,
तूं जसें जीर्ण पांघरूण
तसीं फिरवसील.
४ तरी हे ईश्वरा महान्,
तूं सदा निर्विकार,
अनंत काळीं, भगवान्,
तूं न पालटणार.
५ तूं सर्वकाळ ममता
भक्तांची करिसी,
त्यांचें संतान स्मरता
कृपेने तारिसी.

---

24. GOD'S GREATNESS.
"The Lord Jehovah reigns."

## २४. ईश्वराचा महिमा.

H. M. ६, ६, ८ अक्षरी.

१ अनंत भगवान्
हा राज्य करितो,
तेज देदिप्यमान
तो अंगीं घालितो.
तें तेज असें अनिवार,
जनांला नाहीं सोसणार.
२ देवाची गर्जना
जगाला भिववी,

पीडुनी दुर्जनां
तो न्याय दाखवी.
तो ज्याला प्रिय मानितो,
अत्यंत प्रेमें पाळितो.

३ अद्भुतें करितां
अत्यंत दिसे ज्ञान,
दुष्टांची धूर्तता
वेगानें मोडी, जाण.
सामर्थ्य त्याचें कळेना,
न चुके त्याची योजना.

४ हा असतां प्रताप,
तो किती ममताळ!
ह्मणे, "मी तुझा बाप,
कैवारी सर्वकाळ."
सुवंद्य त्याचें प्रिय नांव,
स्तवीन त्याचा प्रेमभाव.

---

25. God's Sovereignty.

"Keep silence, all created things."

## २५. ईश्वराचें प्रभुत्व.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ सर्व जनानो, नम्र व्हा,
देवाला द्याहो मान,
देवाची स्तुति वाढवा,
तो राजा तेजवान्.

२ आकाश, भूमि, व पाताळ
हीं त्याचे तावेदार,
तो राज्य करी सर्वकाळ,
सत्ता न सरणार.

३ देवाच्या आसनासमोर
वही गुंडाळली,
जनांची कर्मगति घोर
तिच्यांत लिहिली.

४ देवाच्या करणीकडून
ती गति कळती,
तो वही देतो उघडून
तेव्हां प्रगटती.

५ आकाशीं मुख्य देवदूत
लिखित पुसेना,
वहींत पुढलें अद्भुत
पाहाया धजेना.

६ हे देवा, त्यांच नेमिलें
मला जें लागणार,
जरी न मला कळलें,
चिंता न वाटणार.

७ तूं माझें नांव लिही तर
जीवनी पुस्तकीं,
ही चिंता आहे खरोखर
न मागें अणखी.

---

26. God is King. Rev. 19: 6.

"The Lord is King, lift up thy voice."

## २६. ईश्वर राजा आहे. प्रग. १९:६.

L. M. ८ अक्षरी.

१ ईश्वर राज्य करितो,
सृष्टीची सत्ता धरितो,
सर्वांनीं व्हावें हर्षवान्,
प्राणीमात्रांनी द्यावा मान.

२ ईश्वर राज्य करितो,
तो पूर्ण न्याय राखितो,
दुष्टांला दंड ठरवील;
तयाला कोण आडवील?

३ ईश्वर राज्य करितो,
दीनांला पुत्र ह्मणतो,
भक्तानो, स्तुति वाढवा,
बापाचे नाम गाजवा.

४ बापाची सत्ता सरेना,
बापाची प्रिति फिरेना,
सुवंद्य होवो भगवान्,
तो सर्व सत्ताधारी, जाण.

---

## 27. God is Judge. Ps. 7: 8-10.

"The Lord is Judge, before His throne."

### २७. ईश्वर न्यायाधीश. स्तोत्र ७:८-१०

L. M. ८ अक्षरी.

१ देव निवाडा करितो,
तो सदा न्याय राखितो,
मनुष्य त्याला नमतील,
निवाडा खरा मानतील.

२ ईश्वर पाही सर्व जन,
पारखितो सर्वांचें मन,
दुष्टांचा करितो धिक्कार,
पीडील त्यांस अनिवार.

३ ईश्वर जाणे सज्जनां,
तो पाही त्यांच्या भावना,
प्रेमाने करी प्रतिपाळ,
उद्धार देई सर्वकाळ.

## 28. God's Condescension. Is. 57: 15-16.

"Thus saith the High and Lofty One."

### २८. ईश्वराची मेहर. यशा. ५७:१५,१६

L. M. ८ अक्षरी.

१ ईश्वर स्वतां ह्मणतो,
"मी आकाशांत राहतों,
पवित्र देव परात्पर,
तो मी अनादि व अमर.

२ तरी येऊनी खालतीं
मी राहें जनांसंगतीं,
जो नम्र लीन दैन्यवान,
त्याठायीं माझें प्रिय स्थान.

३ दीनांला देतों मी जीवन,
खिन्न पाप्याला शांतवन,
ज्यांचें फुटलें हृदय,
त्यांस होतों मी आश्रय."

४ हे देवा, तूं कृपाळू फार,
सर्व प्रसंगीं हो आधार,
आह्माला तुझे लोक मान,
तरी होईल समाधान.

## 29. God's Providence.

"God moves in a mysterious way."

### २९. ईश्वरी सूत्र.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ अनंत कर्में ईश्वरी
तीं मोठे चमत्कार,
तो बसे वादळावरी,
समुद्र ताबेदार.

२ अचाट सूत्र ईश्वरी,
अतर्क्य त्याचें ज्ञान,
जें योजी तें तो सत्वरी
सिद्धीस नेतो, जाण.

३ दीनांनो, नका धरूं भय,
जे ढग आले घोर,
ते तुह्मासाठीं यशोमय,
देती प्रसाद थोर.

४ प्रभु विरोधी भासला,
तरी वंदावें नांव,
बाहेर मात्र रुसला,
अंतरीं प्रेमभाव.

५ देवाचे बेत प्रगटून
सुवेळीं कळतील,
कडूहि कळ्या उमलून
सुपुष्पें निघतील.

६ अभाविकाला कळेना
ईश्वरी मर्मसार,
देव साधील योजना
तो उलगडणार.

## 30. God's Condescension. Ps. 8.

"O Lord our Heavenly King."

### ३०. ईश्वराची मेहरबानी. स्तोत्र ८.

S. M. ६,८ अक्षरी.

१ हे देवा ममताळ,
सुवंद्य तुझें नाम,
त्वां जग निर्मिलें विशाळ
आकाश तुझें काम.

२ मी वर पाहतां
आश्चर्य वाटे फार,
तो चंद्र तेज पाडितां
निवारितो अंधार.
३ ते तारे अगणित
त्वां सर्व निर्मिले,
ते तुझ्या हातें हो आश्रित
अधांत्रीं ठरले.
४ तूं कर्त्ता अति थोर
आकाशीं राहतोस,
मनुष्य काय तुजसमोर
कीं तूं आठवितोस ?
५ अत्यंत ममता
तयाला दाविसी,
जगावरी संस्थापितां
तूं त्यां गौरविसी.
६ जनानो, स्तवा फार
हीं कृत्यें ईश्वरी,
अनंत त्याचे उपकार,
माना हो अंतरीं.

---

31. God's Condescension. Ps. 113.
"Ye that delight to serve the Lord."

३१. देवाची मेहरबानी.

L. P. M. ८,८,८ अक्षरीं.

१ देवाला स्तवायाला या,
सर्वांनो, त्याला मान द्या;
धन्यवादित त्याचें नांव;
तें गाजवा जगवतीस,
तें कळवा मावळतीस,
सांगा देवाचा प्रेमभाव.
२ देवासीं तुल्य आहे कोण ?
तरी उच्छ्रित हो असून
तो माणसांला पाहतो;
तो उठवितो खंगल्यांस,
तो चालवितो दुबळ्यांस,
दीनांला प्रेमें पाळितो.

32. God's Goodness. Ps. 34.
"Through all the changing scenes of life."

३२. ईश्वराची दया. स्तोत्र ३४.

C. M. ८, ६ अक्षरीं.

१ गाईन माझ्या ममताळ
देवाचा प्रेमभाव,
सुखदुःखांत सर्वकाळ
स्तवीन त्याचें नांव.
२ देवानें दिधला आश्रय,
आनंद झाला थोर,
दीनानो, ऐका, व्हा निर्भय,
नकाहो करूं घोर.
३ जाऊनी त्याच्या जवळी
मानीन उपकार,
कां त्याला हाक मारिली
तों पावलों उद्धार.
४ दीव्य दुतांचा पाहरा
भक्तांला राखितो,
देवाच्या प्रिय लेंकरां
निर्भय ठेवितो.
५ तुह्मी घेऊनी पाहा चव,
देवाचा कितीं प्रेम !
जे घेती त्याचा अनुभव
अत्यंत त्यांचें क्षेम.
६ भक्तानो, तुह्मी त्याला भ्या,
तो करितो निर्भय,
प्रीतीने त्याला मान द्या,
तो सर्वदा आश्रय.

---

33. God's Goodness. Ps. 145.
"Sweet is the memory of Thy grace."

३३. ईश्वराची दया. स्तोत्र १४५.

C. M. ८,६ अक्षरीं.

१ हे देवा तुझी ममता
व कृपाहि अपार.
सर्वांनी तुला स्तवितां
मानावे उपकार.

२ आकाशीं देव राहतो
अनंत तेजवान्,
तरी जनांला पाहतो,
व करी तृप्तिमान्.
३ संपूर्ण प्राणी त्याजसीं
आहार मागती,
तें सर्व प्रतिदिवसीं,
पुरावा पावती.
४ देवाची किती ममता,
तो फार दयावान.
रागाला मंद असतां
वेगानें सोडी, जाण.
५ प्राणीमात्रांनो, गाजवा
देवाचे उपकार,
ख्रिस्त्यांनो, तुम्ही कळवा
कृपेचा जो उद्धार.

34. God our Protector. Ps. 121.
"Upward I lift mine eyes."

## ३४. ईश्वर आमचा आश्रय. स्तोत्र १२१.

H. M. ६,६,८ अक्षरी.

१ मी लक्ष देतों वर,
देवाच्या ठायीं भाव,
तो कर्त्ता परात्पर,
समर्थ त्याचें नांव.
तो माझा पूर्ण सदाश्रय,
अखंड ठेवितो निर्भय.
२ कदापि माझा पाय
नाहीं निसरणार,
हे देवा, तूं सहाय,
तूं माझा पूर्णाधार.
झोंप न घेतां, सर्वकाळ
भक्तांचा करिसी सांभाळ.
३ कडक लागो ऊन,
कीं रात्रीं वारा गार,
तूं जवळी असून,
कांहीं न बाधणार.
उन्हांत छाया करिसी,
निवारा रात्रंदिवसीं.
४ तूं मला राखसील,
हा माझा पूर्ण भाव,
कधीं न टाकसील,
कां सत्य तुझें नांव.
मी जातों येतों हो निर्भय,
कां जन्मवरी तूं आश्रय.

35. God's Compassion. Ps. 103.
"My soul, repeat His praise."

## ३५. ईश्वराची दया. स्तोत्र १०३.

S. M. ६, ८ अक्षरी.

१ हे जिवा, स्तुति गा,
देवाची दया फार,
तो तुझी क्षमा करितो,
अनंत उपकार.
२ तो पूर्ण दयावान्
पापी लोकांवरी,
त्वरेनें राग सोडुनी
दीनांला उद्धरी.
३ आमची दुर्बुद्धि घोर
कृपेनें मोडितो,
अनंत भारी पातकें
तो दूर करितो.
४ बापाची ममता
जसी मुलांवरी,
तसी देवाची करुणा
खऱ्या भक्तांवरी.
५ आयुष्य मानवी
त्वरेनें सरतें,
तें रानफुलासारिखें,
जें क्षणें वाळतें.
६ प्रभूची करुणा
अनंत राहती,
सर्वांला त्याचीं वचनें
सत्य सांपडती.

36. GOD ALL IN ALL. Ps. 73: 25.
"My God, my life, my love."

३६. ईश्वर दिनाला प्रिय.
स्तोत्र ७३:२५.
S. M. ६,८ अक्षरी.

१ हे प्रिय भगवान,
हे माझ्या जीवना,
तूं सोडितां मी मरें, जाण,
करावी करुणा.

२ तूं दया करितां
प्रकाश पडे फार,
व तुझा राग लागतां
चहुंकडे अंधार.

३ तूं होसी जवळीं
तों आकाशाचें सुख;
व तुझी कृपा सरली
तों नरकाचें दुःख.

४ आकाशीं चढल्यास
तूं तेथें नसणार,
तरी कदापि या मनास
हर्ष न वाटणार.

५ हें जग दर्शनीं
तें तुच्छ अवघें,
कां मला तुझ्यावांचुनीं
कांहींच नलगे.

६ हे प्रीय भगवान,
हे माझ्या जीवना,
तुझ्याने तृप्त माझा प्राण,
ही मोठी करूणा.

37. GOD OUR SHEPHERD. Ps. 23.

३७. ईश्वर आमचा मेंढपाळ.
स्तोत्र २३.
8, 7. ८, ७ अक्षरी.

१ देव माझा पाळणारा,
उणें नाहीं पडणार;
दुःखें तो निवारणारा,
पीडा नाहीं लागणार.

२ मला प्रेमें चालवितो
कोंवळ्याच कुरणीं,
शांत स्थळीं बसवितो,
देतो पाणी जीवनी.

३ मी सुमार्ग सोडितांना
तो माघारें आणितो,
मला हातें वळतांना
मोठी कृपा दावितो.

४ तो आधार मला देतां
कधीं लागेनाची भय,
मरणाच्या खिंडीं नेतां
तो जिवाचा पूर्णाश्रय.

५ सर्व जग होवो वैरी,
तोच माझा मेंढपाळ,
तो सामर्थ्यवान् कैवारी,
हर्ष देतो सर्वकाळ.

६ त्याची दया जन्मवरी
कधीं नाहीं सरणार,
स्तवितांना त्याच्या घरीं
सर्वदा मी राहणार.

38. GOD OUR PROTECTOR. Ps. 91.
"Call Jehovah thy Salvation."

३८. ईश्वर आमचा आश्रय.
स्तोत्र ९१.
8, 7. ८,७ अक्षरी.

१ ईश्वराच्या पंखांखालीं
सर्वकाळ वस्ती कर,
तुला आपल्यापासीं पाळी
तुझा देव परात्पर.

२ संकटेंही लागतांना
तो देईल पूर्णाश्रय,
भारी रोग चालतांना
निवारील तुझें भय.

३ रात्रीं चालणारी मरी,
उडणारा तीव्र बाण,

जें अरिष्ट घात करी,
तें न बाधे तुला, जाण.
४ तुझ्या सर्वहि बाजूंला
लाखों जरी पडतील,
क्लेश लागेनाची तुला,
दुष्ट नाश पावतील.
५ तूं परात्पराच्या ठायीं
प्रेमें करिसी आश्रय,
तोच तुला आपल्या पायीं
ठेवी सर्वदा निर्भय.
६ त्याला हाक मारूनिया
तूं उद्धार पावसील,
शांत मनें मरूनिया
आकाशांत पोंचसील.

---

39. SAFETY OF THE CHURCH.

"God is the refuge of his saints."

**३९. मंडळीचा सुरक्षितपणा.**

स्तोत्र ४६.

L. M. ८ अक्षरी.

१ सर्व समर्थ भगवान
भक्तांचा आहे पूर्णाश्रय,
क्लेशाच्या वेळीं तोच, जाण,
निवारी त्यांचें सर्व भय.
२ डोंगर जरी फुटले,
बुडाले खोल सागरीं,
जग थरारां कांपलें
तरी न भिऊं अंतरीं.
३ रागानें दुष्ट खवळोत
देवाच्या मंडळीसमोर,
लहरांवाणी ढवळोत,
आम्हाला न वाटेल घोर.
४ पवित्र नदी आहे, जाण,
जीवनी पाणी वाहवी,
भक्तांला सुख समाधान
ती या जगांत पुरवी.
५ ती नदी शास्त्र ईश्वरी,
हें चिंतना निवारितें,
सत्शांति देतें अंतरीं,
दिनांला शूर करितें.
६ देवाला भक्तमंडळी
बबुळावाणी प्रिय फार,
ती स्थिर पायीं स्थापिली,
कां तोच सर्वदा आधार.

---

40. GOD OUR REFUGE IN TROUBLE.

**४०. ईश्वर संकटीं रक्षणारा.**

गीत २३:४.

Hin. M. पद. (ब्याहाग-मांझ, एका).

ध्रु० भक्ता संगतिं तो जगपाळ,
आहे संकटिं हो.
१ व्यापी दारिद्रजें फार,
कष्टें करितांना संसार,
देतो हृदया धैर्य अपार,
सुखें अपार तीं दावी. ध्रु०
२ नाना दु:खें, नाना रोग,
तिडका जर्जर करितां भोग,
देई शुद्धात्मा उपभोग,
करि प्रयोग प्रेमाचा. ध्रु०
३ पापें होतां तळमळ, ताप,
सुटतां नीराशेचा कांप,
ह्मणतो ईश्वर मी तव बाप,
ख्रीस्तप्रताप पाहा तो. ध्रु०
४ येतां आरिष्टांचे स्वार
शस्त्रें करितां तीक्ष्ण प्रहार,
करितो स्वपंखांनि आधार.
प्रेमळ फार बोलुनिया. ध्रु०
५ जातां मृत्यूखिंडी पार,
तरि तो अरिष्टां न भिणार,
कारण संगें जगदुद्धार,
उघडिल द्वार स्वर्गाचें. ध्रु०

---

41. God's Works. Ps. 19.

"Great God, the heavens," &c.

४१. ईश्वराचीं कृत्यें. स्तोत्र १९.

L. P. M. ८,८,८ अक्षरी.

१ हे देवा, आकाशाचें काम
प्रसिद्ध करी तुझें नाम,
तेथें अद्भुतें दिसतीं;
असंख्य तारे तेजवान्,
असंख्य जगतें महान्
तुझें समार्थ्य दावितीं.

२ दिवसा सूर्यतेज फार,
रात्रीचा गाढ अंधकार,
हे देती ज्ञानसूचना;
ते शब्द नच बोलती,
तरी कर्त्याला वंदितीं,
उद्भवे भक्तिभावना.

३ तो सूर्य जसा कोणी वर
आला खोलींतुनी सुंदर,
चालाया शूर हिम्मती;
पृथ्वीस फेऱ्या घालितो,
न थकतांना चालतो,
उष्णता सर्वां भिनती.

४ असे देवाचे चमत्कार
दृष्टीला पडती अपार,
तेणें जगाला होतें ज्ञान;
विशेषें शास्त्र ईश्वरी
प्रकाशतें दिगंतरीं,
सर्वांनी त्याला द्यावा मान.

---

42. God's Works. Ps. 19.

"Behold the lofty sky."

४२. ईश्वराचीं कृत्यें. स्तोत्र १९.

S. M. ६,८ अक्षरी.

१ आकाश वरतीं
दावी कर्त्याचें काम,
तारे प्रसिद्ध करितीं
देवाचें वंद्य नाम.

२ दिवस तेजवान,
रात्रीचाहि अंधार,
हे दाखवितीं देवज्ञान,
व करिती उच्चार.

३ ती वाणी हो मधूर
जाई दिगंतरीं,
तेणेंच कळे देशीं दूर
माहात्म्य ईश्वरी.

४ सत्शास्त्रीं पाहतां
विशेष देवज्ञान,
तें दिसे त्याची ममता;
तो पूर्ण नीतिमान्.

५ ईश्वरी आज्ञा सार
शास्त्रांत लिहिला,
ख्रिस्तानें केला जो उद्धार
तो स्पष्ट दाविला.

६ मी तुला स्तवितों,
हे थोर ईश्वरा,
अनंत कृपा वंदितों,
हे दयासागरा.

---

43. God's Works on the Sea.

"They that toil upon the deep."

४३. समुद्रावरील ईश्वरी कृत्यें.

7s. ७ अक्षरी.

१ जन समुद्रावरी
तारवानी चालतात,
तेव्हां कृत्यें ईश्वरी
आश्चर्यानें पाहतात.

२ देव शब्द बोलतो,
तेव्हां वारा सुटे थोर,
सिंधू उचंबळतो,
लाटा गर्जती अघोर.

3 पाणी हो उंचावतां
ते आकाशीं चढतात
फिरूनी उतरतां
खोल स्थळीं बुडतात.

४ डगमग डुलतां
मद्यपीसे दिसती,
मोठी भ्रांति पावतां
सर्व आशा बुडती.

५ तेव्हां फार ओरडून
करितात प्रार्थना,
देव त्यांस सोडवून
दाखवितो करूणा.

६ तो वाऱ्याला शमवी,
लाटा शांत करितो,
तोच देव गौरवीं,
सर्व सत्ता धरितो.

44. God's Word. Ps. 19.

"I love the volume of Thy word."

## ४४. ईश्वराचें शास्त्र. स्तोत्र १९.

L. P. M. ८,८,८ अक्षरी.

१ सत्‌शास्त्र मला आवडे,
लक्ष विशेष त्याकडे
अंधकाराच्या समयीं,
हे देवा, तुझें बोलणें,
तुझीं उत्कृष्ट वचनें,
हीं देती शांति हृदयीं.

२ शास्त्राचें करितांना ध्यान
मनांत बिंबे पूर्ण ज्ञान,
तें दीपावाणी तेजोमय;
तें मधोपेक्षां गोड फार,
सुवर्ण तुच्छ वाटणार,
कळेना मोल अतिशय.

3 उत्कृष्ट शास्त्रें सत्वरीं
सुबोध ठसे अंतरीं
दंडाचें भय सुचतें;
ख्रिस्ताचें शुभवर्त्तमान
येणेंनी तारणाचें ज्ञान,
दंडाचें भय टळतें.

४ आंतील पापें सगळीं
कोणाला कधीं कळलीं?
हे देवा, माझी क्षमा कर,
ऐकावी माझी प्रार्थना,
दे मला भक्तिभावना,
सद्गुण माझ्या मनीं भर.

45. Need of Revelation.

## ४५. शास्त्राचें अगत्य. स्तो. १९:७-१२.

Hin. M. अभंग. (बरुवा, त्रिवट).

१ शास्त्ररूप दिवा, देवानें दिधला;
वाट दावायाला, पाप्यांलागीं.

२ शास्त्राविण पाप्यां, कैसी दिसे वाट;
अंधकार दाट, जगदरण्यीं.

3 नि:शास्त्रवादी हे, सांगती कौतुक;
सदसद्विवेक, हेंचि शास्त्र.

४ तुझा आझा एक सदसद्विवेक;
मग कां अनेक, भिन्न मतें.

५ सदसद्विवेका, वाट दावायास;
शास्त्राचा प्रकाश, पाहिजेचि.

६ होउनिया नम्र, सोडा ऐसें मत;
पाहा कीं प्रचीत, सच्छास्त्राची.

46. The Bible Precious.

## ४६. सत्शास्त्र मोलवान आहे.

11s. ११ अक्षरी.

१ सत्शास्त्र, सत्शास्त्र निधान अमोल
देवाचें सद्वचन प्रत्येक बोल,
त्यापुढें सोन्याचा करावा धिक्कार,
त्या शास्त्रीं प्रगटला जनां उद्धार.

२ सत्शास्त्र,सत्शास्त्र,हें सत्याची खाण
आबालवृद्धांस तें देतें सुज्ञान,
तें मुलाला सांगे, कन्येला हो स्मर,
तारुण्यीं ख्रीस्ताचा आश्रय तूं धर.
३ सत्शास्त्र, सत्शास्त्र, तें प्रिय अपार,
तें सर्वांस सांगे, घ्यावा उद्धार,
शास्त्रांतील भाका हाकाटूं चाकेर,
सुज्ञानें भरावा पृथ्वीचा हा घेर.
४ सत्शास्त्र; सत्शास्त्र, स्वदेशा व दूर,
देवाची सत्कृपा गा स्वरें मधूर,
मैदानीं व डोंगरीं गाजवा फार,
कीं ख्रीस्तें सर्वांला मिळेल उद्धार.

---

47. Delight in the Scriptures.

"O how I love Thy holy law."

## ४७. शास्त्राची आवड.

स्तो. ११९:९७.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ सत्शास्त्र किती आवडे !
मी रोज करीं ध्यान,
देउनी लक्ष त्याकडे
पावतों समाधान.
२ मी प्रात:काळीं उठुनी
तें ध्याया लागतों,
तें ऐकायाला इच्छुनी
जीव लुळपतो.
३ सत्शास्त्र माझ्या अंतरीं
जोराने ठसतें,
तेणें या भवसागरीं
गायन सुचतें.
४ घरीं कीं रानीं असतां
मिष्टान्न तें अक्षय,
मधेच्या पेक्षां सर्वथा
तें गोड अतिशय.
५ याचाणी कोठें नाहीं धन,
उत्कृष्ट राशी थोर,
सोनें कीं रुपें शुष्क तृण
या निधानासमोर.
६ क्लेशाने मन गळतां
हें शास्त्र पूर्णाधार,
ईश्वरी वाक्यें स्मरतां
भय न वाटणार.

---

48. The Scriptures Excellent.

"Father of mercies, in Thy word."

## ४८. शास्त्राची उत्कृष्टता.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ देवाचें शास्त्र तेजवान
अत्यंत दिसतें,
तेणें आह्माला देवज्ञान
अमोल्य मिळतें.
२ तेणें संपत्ति अतिशय
गरीब पावतात,
जें धन सर्वदा अक्षय,
तेंच संपादितात.
३ ज्ञानाचें झाड तेजवान
तेथें उगवतें,
व त्याचें फळ रसवान
यथेच्छ मिळतें.
४ येशूचीं प्रिय वचनें
तेथें सांपडती,
तेणें स्तुतीचीं गायनें
मनांत सुचती.
५ या सत्शास्त्रांत माझें ध्यान
असावें सर्वकाळ,
हा खरा कल्पवृक्ष, जाण,
व दिवाहि तेजाळ.
६ हे प्रिय प्रभू गौरवी,
तूं मला लाव ओढ,
मनांत शास्त्र ठसवी,
तें फार वाटो गोड.

---

## 49. The Scriptures Precious.

"How precious is the Book divine."

## ४९. शास्त्र फार मोलवान.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ सत्शास्त्र सदात्म्याचें दान,
अमोल्य, गौरवी,
प्रकाशनें दिव्यासमान,
सुमार्ग दाखवी.

२ मनाची शांति करितें
या भवसागरीं,
दीनांच्या ठायीं भरितें
आनंद ईश्वरी.

३ या भवरात्रीं दिवा हाच
प्रकाश पाडितो,
व अंतकाळीं लागलाच
आकाश दावितो.

---

## 50. God's Works and Word.

"Behold the morning sun."

## ५०. देवाचीं कृत्यें व शास्त्र. स्तो. १९.

S. M. ६, ८ अक्षरी.

१ सूर्य दैदिप्यमान
सकाळीं चढुनी
देतो प्रकाश तेजवान
सर्वत्र भुवनीं.

२ त्यापेक्षां तेज फार
शास्त्राचें फांकतें,
मेलेले पावती उद्धार,
अंधांस दिसतें.

३ सत्शास्त्र ऐकतां
तें मला वाटे गोड,
हे देवा, मला प्रेरितां
मनाला वर्ते ओढ.

४ मी आपले गुप्त भ्रम
केव्हां समजणार?
परी हटानें अतिक्रम
मी नाहीं करणार.

५ तूं माझीं पापें दाव,
हे देवा, क्षमा कर,
म्या भरूं नये दुष्ट भाव,
सद्गुण मनीं भर.

६ या जगीं मीं उद्धार
गाईन सर्वकाळ,
तूं माझी स्तुति अंगीकार,
व मला सदा पाळ.

---

## 51. God's Works and Word.

"The heavens declare Thy glory, Lord."

## ५१. देवाचीं कृत्यें व शास्त्र. स्तोत्र १९.

L. M. ८ अक्षरी.

१ आकाश दावी तुझें काम,
प्रत्येक तारा दर्शवी,
परी, हे देवा, तुझें नाम
शास्त्रांत दिसे गौरवी.

२ सूर्यचंद्राचा गतिक्रम
तुझें सामर्थ्य दावितो,
परी शास्त्रांत तुझें प्रेम
व पुर्ण न्याय दिसतो.

३ तें सूर्य चंद्र फिरतां
सर्वत्र तेज पाडितात,
तसें सत्शास्त्र कळतां
सर्वत्र वाणी ऐकतात.

४ तें सर्व जग व्यापुनी
दिगंतरीं प्रकाशणार,
व ख्रीस्त राष्ट्रां तारुनी
सर्वत्र राज्य करणार.

५ हे प्रभू, जगज्जीवना,
जगावरी उदय पाव,

पाप्याला दे सद्भावना.
सर्वांला तुझ्या मार्गी लाव.
६ हीं तुझीं कृत्यें अति थोर,
जनांचा करिसी उद्धार.
सोडुनी पापदंड घोर
भक्तांला वर नेसी पार.

---

52. Preciousness of the Bible.
"Holy Bible, book divine."

## ५२. शास्त्र फार मोलवान.

7s. ७ अक्षरी.

१ देवशास्त्र मोलवान,
माझी आहे रत्नखाण,
कसा मी व कोठला
हें तें सांगे मजला.

२ शास्त्र पाप कळवी,
तारणारा दाखवी,
मला मार्गी लावितें,
पाप घोर दावितें.

३ जेव्हां आहें कष्टवान
तों तें देतें समाधान,
शास्त्र सर्वदा आश्रय,
अंतकाळीं देतें जय.

४ शास्त्र दावी दिव्य सुख
आणि नरकाचें दुःख,
हें सत्शास्त्र मोलवान
माझी आहे रत्नखाण.

---

53. God rebukes Idolatry.
Is. 45: 15–25.

## ५३. मूर्त्तिपूजेचा निषेध.

यशा. ४५:१५–२५.

L. M. ८ अक्षरी.

१ जगाचा कर्त्ता बोलतां
रागें निषेधी जगतां,
तो ह्मणे, "प्रभु एक मी,
सृष्टीचा राजा नेहमी.

२ हें जग म्याच निर्मिलें,
स्वगौरवार्थ घडिलें,
मी थोर प्रभु एकला,
दुजा नाहींच कळला.

३ जे मूर्त्ति हातें घडिती,
काष्ट पाषाणा भजिती,
ते किती हो अबुद्धिमान्!
पुढें होतील लज्जावान्.

४ मी तारणारा एकला,
जो आदिअंता वेगळा,
लोकांनो, तुह्मी लक्ष द्या,
उद्धार माझ्या हातें घ्या.

५ मी शपथेनें बोललों,
कधीं नाहींच फिरलों,
सर्वत्र मला भजतील,
माझ्या समोर नमतील."

६ हे प्रभू, तूंच तारणार,
कृपेचा मागतों उद्धार,
लाचार पायां पडतों,
तुझ्यानें हर्ष पावतों.

---

54. Folly of Idolatry. Ps. 115.

## ५४. मूर्त्तिपूजा करण्याचें मूर्खपण.

L. M. ८ अक्षरी.

१ आकाशीं देव राहतो,
तो सर्व जग पाहतो,
सिद्धिस नेतो योजना,
दिनांची ऐके प्रार्थना.

२ दुर्जन मूर्त्ति करिती,
ते त्यांच्या पायां पडती;
त्या सोनें रुपें असतां
कसें मानावें देवता?

३ मुर्तीला डोळे असुनी
कधीं दिसेना नयनीं,
मुखाचा असता विस्तार,
कदापि होईना उच्चार.

४ कानानी शब्द ऐकेना,
पायांनी किंचित् चालेना,
जनांहो, तिळा भजता
किती मूर्खत्व करितां !

५ प्रभूला द्यावा सर्व मान,
तो मात्र थोर भगवान,
दिनांच्या हाका ऐकतो,
भक्ताला प्रेमें राखितो.

६ आकाश हें देवाचें स्थान,
जनांला पृथ्वी दिल्ही दान,
सर्वांनो, नमा त्यासमोर,
तयाला मात्र माना थोर.

---

55. Doxology.

'Praise God from whom," &c.

५५. ईश्वरस्तवन.

L. M. ८ अक्षरी.

सुवंद्य देव परात्पर,
स्तवाहो त्याला खालीं वर,
तो बाप पुत्र आत्मा जाण,
ऐक्याला द्या अनंत मान.

---

56. Doxology.

"Let God the Father and the Son."

५६. ईश्वरस्तवन.

C. M. ८, ६ अक्षरी.

बापाची स्तुती वाढवा,
पुत्राला द्या सन्मान,
आत्म्याची कृपा गाजवा,
सुवंद्य भगवान.

---

57. Doxology.

"Ye angels round the throne."

५७. ईश्वरस्तवन.

S. M. ६,८ अक्षरी.

देवाला द्याहो मान,
सर्वांनो, खालीं वर,
तो बाप, पुत्र, आत्मा, जाण,
अनादि व अमर.

---

58. Doxology.

"To God the Father's throne."

५८. ईश्वरस्तवन.

H. M. ६, ६, ८ अक्षरी.

ईश्वर बाप थोर
अनंत स्तुतिमान,
नमा पुत्रासमोर,
आत्म्याला द्या सन्मान.
ऐक्याच्या ठायीं ठेवा भाव,
सर्वांनो, वंदा त्याचें नांव.

---

59. Doxology.

"Glory to the Father's name."

५९. ईश्वरस्तवन.

7s. ७ अक्षरी.

देवबापा गौरवा,
ख्रीस्तनाम गाजवा,
नमा सदात्म्यासमोर,
ऐक्य देवा माना थोर.

---

60. Doxology.

६०. ईश्वरस्तवन.

8, 7. ८, ७ अक्षरी.

१ अहो सर्व माणसानो,
तुह्मी स्तवा ईश्वरा,
अति बळवान् दुतानो,
वंदाहो परात्परा.

२ करा स्तुति ईश्वराची,
त्रैलोक्यांत गाजवा,
बाप पुत्र आत्मा यांची
मोठी कीर्ति वाढवा.

---

61. Doxology.

### ६१. ईश्वरस्तवन.

6, 4. ६, ४ अक्षरी.

बापा, जगत्कर्त्या,
पुत्रा, पापहर्त्या,
आत्म्या, शुद्धकर्त्या,
त्र्येक देवा;

करूं तुझी स्तुति,
वर्णू तुझी प्रीति,
वेंचुनिया शक्ति
करूं सेवा.

---

62. Doxology.

### ६२. ईश्वरस्तवन.

7s. ७ अक्षरी.

१ देवस्तुति गा अपार,
वर्णा त्याचे उपकार,
बाप अति ममताळ,
नित्य करी प्रतिपाळ.

२ ख्रीस्त कृपा करितो,
तो पाप्यांला तारितो,
आत्मा करी शुद्धता,
वर्णा त्याची ममता.

३ त्र्येकदेव भगवान,
याला द्याहो सर्व मान,
नमा ईश्वरासमोर,
तो अनंत राजा थोर.

---

## II. PRAISES OF CHRIST.

## २. ख्रीस्ताचीं स्तवनें.

63. Christ's Incarnation. John 1.
"Ere the blue heavens," &c.

### ६३. ख्रीस्त अवतारला. योहान्न १.

L. M. ८ अक्षरी.

१ देवाचा शब्द हो तेजाळ
प्रारंभीं होता वैभवी,
देवासीं राहे सर्वकाळ,
तो स्वतां देव गौरवी.

२ तो त्याच्या गौरवाचें तेज
व तत्वतेची प्रतिमा,
गुणांचें कळेनाची मेज,
देवासीं तुल्य महिमा.

३ जगाचा कर्त्ता तोच थोर,
तो सर्व सृष्टि वागवी,
जनानो, नमा त्यासमोर,
त्रिलोकीं सत्ता चाळवी.

४ तो शब्द अवतरला,
मनुष्यरूप धरिलें,
जनांसीं प्रेमें वर्त्तला,
ईश्वरी तेज दाविलें.

५ येशूचा पाहा चेहरा,
देवाचा तो एकुलता,
तो शोभतोची ईश्वरा,
कितीहो कृपा सत्यता.

६ आकाशीं दूत उतरून
ती कृपा प्रेमें शोधिती,
जनाला वार्त्ता कळवून
अत्यंत हर्ष पावती.

---

64. Christ's Appointment. Ps. 2.

### ६४. ख्रीस्त नेमला. स्तोत्र २.

L. M. ८ अक्षरी.

१ मनुष्य कां खवळती ?
देवाळा कसे रोधती ?

निरर्थक त्यांच्या योजना,
कांहीं उपाय चालेना.

२ देवाने राजा नेमला,
तो त्याचा पुत्र एकला,
जगांत राज्य करितो,
दिनांला तोच तारितो.

३ देवाने त्याला म्हटलें,
" मागावें जग सगळें,
तें तुझ्या वतनाचें घे,
वश करावें अवघें.

४ मी तुला सर्व सोंपितों,
पृथ्वीच्या सीमांपावेतों,
दीन भक्तांला दे उद्धार,
शत्रूंला यथान्याय मार. "

५ लोकानो, तुह्मी बोध घ्या,
राजानो, त्याला मान द्या,
पायां पडुनी धरा भय,
प्रभूचा करा हो आश्रय.

६ न मानितां तो रागावेल,
नाशाला किंचित्‌हि पुरेल,
प्रभूची आशा धरितीं,
ते मोठें सुख पावती.

65. Christ's Coming. Is. 61: 1-3.
"Hark the glad sound," &c.

६५. तारणारा आला. यशा. ६१:१-३.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ तो तारणारा आला, जाण,
सुवार्त्ता गाजवा,
सर्वांनो, त्याला द्या सन्मान,
स्तुतिहि वाढवा.

२ पवित्र आत्मा त्यावरी
अत्यंत राहतो,
दिनांला कृपा ईश्वरी
प्रसिद्ध करितो.

३ जे सैतानाचे बंदिवान
ते होती मोकळे,
बेड्या व पाश बळवान
तो तोडी सगळे.

४ अंधांला डोळे देउनी
पाहाया सांगतो,
मनाचा मळ काढुनी
प्रकाश पाडितो.

५ जे हृदयाचे फुटले,
तयांला शांतवी,
आत्म्याचे दीन खंगले
यांला तो हर्षवी.

६ हे प्रिय प्रभू दयावान्,
जनां ताराया ये,
व नांव गाजो कीर्तिमान्
जगत्रयामध्यें.

66. Christ's Birth. Luke 2.
"While shepherds watched," &c.

६६. ख्रीस्ताचा जन्म. लूका २.

C. M. ८,६ अक्षरी.

१ रात्रीं खिलारें हो राखीत
मेंढके बसले,
तों दूत येतां अवचित,
तेज प्रकाशलें.

२ ते अति भितां त्यासमोर,
तो बोले प्रेमवान्,
" जेणें सर्वांला हर्ष थोर
तें ऐका वर्त्तमान.

३ कां दावीदाच्या नगरीं
तारक जन्मला,
तो अवतार ईश्वरी
आज प्रगटला.

४ बाळाची, जाणा, हीच खूण
तुह्माला आढळे,

तें बाळेत्याने गुंडाळून
गव्हाणीं ठेविलें."

५ तों आली त्यांच्या देखतां
दुतांची मंडळी,
देवाला त्यांनीं वंदितां
स्तवनें गायिलीं.

६ "सुवंद्य होवो भगवान् ;
जगांत शांति फार,
ईश्वर अति कृपावान् ,
सर्वांनो गा उद्धार.

---

67. CHRIST'S BIRTH. Luke 2.

**६७. ख्रीस्ताचा जन्म. लूका २.**
8, 7. ८, ७ अक्षरी.

१ पाहा, प्रभा फांकतांना
दूत आला तेजवान्,
भयभीत मेंढक्यांना
तो ह्मणाला प्रेमवान् ;

२ "भिऊं नका, ऐका वार्त्ता,
आज ख्रीस्त जन्मला,
दावीदाच्या गांवीं आतां
गव्हाणींत निजला."

३ तेव्हां एकाएकीं त्यांना
दूतसैन्य दिसलें,
ते देवाला स्तवितांना
मेंढक्यानी ऐकिलें.

४ "ईश्वराची होवो स्तुति,
अति उंच वाढवा,
पृथ्वीवरी झाली शांति
देव कृपा गाजवा.

५ ख्रीस्त राजा जगद्गुरु,
तो उपाध्याहि महान,
नकाहो धिक्कार करूं,
माणसांनो, द्या सन्मान."

६ येशू जग तारायाला
घेता झाला अवतार,
असी वार्त्ता सांगायाला
दूत हर्षले अपार.

---

68. CHRIST IN THE MANGER.

**६८. ख्रीस्त गव्हाणींत.**
8s. (Abhang.) अभंग.

१ नीज, नीज, माझ्या बाळा,
भिऊं नको तूं कोणाला,
दिव्य दूत राखिताती,
सर्व दुःखें वारिताती.

२ तुला अन्न पुरविलें,
पाहिजे तें सर्व दिल्हें,
कांहीं नाहीं तुला कडू,
तरी आतां नको रडूं.

३ प्रिय प्रभु जन्मा आला,
तेव्हां फार दुःखी झाला,
गव्हाणींत निजविलें,
घर कोणी नाहीं दिल्हें.

४ जेथें बैलां दिल्हा चारा,
तेथें निजे तारणारा,
जरी होता दिव्य प्राणी,
तुच्छ केला माणसानीं.

५ तेव्हां मेंढके मिळाले,
हाच प्रभु हें कळालें,
दूतें त्यांस खुण दिल्ही,
ती सर्वांला कळविली.

६ पाहा बाळ प्रभु निजे,
तेव्हां व्याप्त होई तेजें,
जागा होई आणि हंसे,
तेव्हां मनोहर दिसे.

७ बाळा, तोच तारणारा,
पापदंड हरणारा,

जगीं आला वरुनीया,
दंड दिल्हा भरुनीया.
८ भाव ठेव त्याजवरी,
सदा त्याचे पाय धरी,
राहायाला त्याजपाशीं,
पुढें जावें त्वां आकाशीं.

---

69. STAR OF THE EAST. Matt. 2.
"Brightest and best of the sons," &c.

### ६९. पूर्वेकडील तारा. मात्थी २.
11, 10. ११, १० अक्षरी.

१ तेजवान् ताऱ्या, तूं ये उदयाला,
दूर करावा निबिड अंधार,
वाट येशूची दाखीव आह्माला,
दृष्टी पडावा तो जगदुद्धार.
२ जागा मिळेना त्या बाळ येशुला,
गव्हाणीं ठेविला कर्त्ता महान,
दूत येउनी समर्थ प्रभूला
स्तुति गातांना देताती सन्मान
3 आह्मी जगाच्या धन्याला अर्पाया
मोलवान् भेटी आणाव्याकींकाय?
प्रभु ख्रीस्ताची हो कृपा पावाया
कधीं चालेना द्रव्याचा उपाय.
४ सोनें कीं रत्नें हीं अर्पणें व्यर्थ,
प्रेम अपावा हें आवडे फार,
ख्रीस्ताच्या दृष्टीं हा श्रेष्ट पदार्थ,
दिनांच्या प्रार्थना प्रिय अपार.
५ तेजवान् ताऱ्या, तूं ये उदयाला,
दूर करावा निबिड अंधार
वाट येशूची दाखीव आह्माला.
दृष्टीं पडावा तो जगदुद्धार.

---

70. GOING TO BETHLEHEM.

### ७०. बेथलहेमास जाणें.
8s. (Abhang.) अभंग.

१ बेथलहेमीं आतां जाऊं,
थोर प्रभु तेथें पाहूं,
आकाशाला सोडुनिया
आला बाळ होऊनियां.
ध्रु० जो अनादि देव, त्याला
या जगांत जन्म झाला.
२ बेथलहेमीं आतां जाऊं,
प्रिय तारणारा पाहूं,
दंड करायाला नाहीं
परी क्षेम द्याया पाही. ध्रु०
3 बेथलहेमीं आतां जाऊं,
ख्रीस्त राजा तेथें पाहूं,
ज्ञानी पडतांना पायां,
संगें जाऊं मान द्याया. ध्रु०

---

71. CHRIST'S MIRACLES.
"Behold the blind their sight receive."

### ७१. ख्रीस्ताचे चमत्कार.
L. M. ८ अक्षरी.

१ अंधळे दृष्टि पावले,
लंगडे चालूं लागले,
मुक्यानीं स्तुति गायिली,
मेलेलीं प्रेतें उठलीं.
२ येशूचे असे चमत्कार,
येणें तो ठरे तारणार,
जेव्हां तो खावीं मारिला
तो देवपुत्र ठरला.
3 तो मरतां, पाहा अंधार,
तो उठतांना तेज फार,
अभ्रांत्रीं वर्त्ते चढला,
राजासनीं तो बसला.
४ मला हा कळला निश्चय,
कीं ख्रीस्त पुरता आश्रय,
मी त्याची आशा धरितों,
तो पातक्याला तारितो.

---

72. BLIND BARTIMEUS. MARK 10.

"Mercy, O thou son of David."

७२. अंधळा बार्तिमी. मार्क १०.

8, 7. ८, ७ अक्षरी.

१ "प्रभू ख्रीस्ता तारणारा,
मजवरी दया कर;"
असा बार्तिमी बिचारा
ओरडुनी मागे वर.

२ बहुतांनी केलें मना,
तरी हाक मारिली,
तों येशूने दिल्ही आज्ञा,
"आणा त्याला जवळी."

३ येका मागतसे भिक्षा,
तरी आतां नलगे,
येशू देई त्याजपेक्षां
तुच्छ द्रव्य अवघें.

४ "प्रभू मज अंधळ्याला
दृष्टि यावी एवढी;"
तेव्हां दृष्टि आली त्याला
पाहा, कृपा केवढी!

५ ऐका, तो प्रभूची स्तुति
सर्वांसीं करितो,
ह्मणे, "याची दया किती!
येशू कसा तारितो!"

६ अहो, सर्व अंधळ्यांला
कळवा ख्रीस्ताचें नांव,
दीन शरणागतांला
होई पुरता निभाव.

---

73. CHRIST'S VOICE.

"When power divine in mortal form."

७३. ख्रीस्ताची वाणी.

L. M. ८ अक्षरी.

१ समुद्रीं वारा सुटे थोर,
तेव्हां शिष्यांला वाटे घोर,
तों येशू बोले प्रेममय,
"मी आहें, नका धरूं भय.

२ जों दुःखें भयें वाढती,
व सर्व आशा बुडती,
आह्मांस बोले कृपामय,
"मी आहें. नका धरूं भय.

३ जों अंतकाळ लागतो,
जिवाला घोर वाटतो,
तेव्हां तो ह्मणे प्रेममय,
"मी आहें, नका धरूं भय."

---

74. THE SINNER'S FRIEND.

७४. पाप्यांचा सखा. लू० ७:३६-४७.

Hindu M. दिंडी.

१ एक परोशी प्रभुस हो ह्मणाला,
स्वामि यावें हो गृहा भोजनाला,
प्रभू बसला ह्या वेळिं भोजनाला,
तया वेळीं वृत्तांत काय झाला.

२ कोणि व्यभिचारिण बाइ तिथें गेली,
प्रभूमागें ती रडत उभी ठेली,
दोनि चरणें अश्रूनिं भीजवीलीं,
डोइवरच्या केशांनि हो पुसीलीं.

३ तिनें चुंबन उपरांत घेतियेलें,
तेल वरती सुगंध चर्चियेलें,
फार पापी जाणूनी असें केलें,
नम्रतेचें हें चिन्ह दावियेलें.

४ परोशी तें हृदयांत हें ह्मणाला,
कोण बाई हें कळत नाहीं याला,
प्रभू बोले जाणूनि परोशाला,
सांगतों मी दाखला प्रमाणाला.

५ सावकाराचे दोन कर्जदार,
कर्ज एकाला दुजाहुनी फार,
क्षमा केली दोघांस सावकारें,
करी प्रीती बहु कोण? सांग बारे.

६ परोशानें तें जाब दिला कैसा,
जया सोडिलें बहुत तोचि ऐसा,

प्रभु बोले त्वां ठीक ठरविलेंसी,
ह्मणुन संशय तूं व्यर्थ काय घेसी.
७ तसें इचिं पापें बहुत सोडियेलीं,
ह्मणुन हीनें बा प्रीति फार केली,
नाहीं आलों मी पतित मारण्यासी,
परी आलों असल्यास तारण्यासी.

---

75. Jesus in Gethsemane.
"Beyond where Kedron's waters flow."

### ७५. गेथसमनीमध्यें प्रार्थना.

8,6,8. ८,६,८ अक्षरी.

१ किद्रोन नदीपरता
येशूला पाहा चालतां
गेथसेमनीकडे,
तोंडाला तेज ईश्वरी,
अपूर्व दुःख अंतरीं.

२ जगाचीं पापें वाहतो,
दुःखानें तो ओरडतो
गेथसेमनीमध्यें,
"हे बापा, इच्छिसील तर
क्लेशाचा प्याला दूर कर."

३ त्या वेळीं किती नम्र तो?
बापाची इच्छा मानितो
गेथसेमनीमध्यें;
"मी तुझा पुत्र एकला,
दे आज्ञा, बापा, मजला."

४ बापें विनंती ऐकिली,
दुताने शक्ति दिधली
गेथसेमनीमध्यें;
धैर्यानें प्राण सोडिला,
विजयी पुन्हा उठला.

५ आह्माला क्लेश लागतां
भारीच दुःख पडतां,
गेथसेमनीकडे
जाऊनि पाहूं नमुना,
तसीच करूं प्रार्थना.

---

76. Christ our Example.
"Go to dark Gethsemane."

### ७६. ख्रीस्त आह्मांला कित्ता.

7s, 6 lines. ७ अक्षरी, ६ चरणी.

१ तुला मोह लागला,
तरी जा गेथसेमनीस,
प्रभु कसा झटला
आडवितां मोहनीस!
पाहा त्याच्या भावना,
तसी कर प्रार्थना.

२ संगें जा न्यायासनीं,
तेथें दंड ठरला,
त्याच्या अंतःकरणीं
अतिक्लेश भरला.
साहे थट्टा फटके,
सोस तूं त्यासारिखें,

३ खांब ते उभारिती
तेथें पाहा चमत्कार,
प्रभू ख्रीस्ता मारिती,
तैं तो साधितो उद्धार.
सोपितो बापाला प्राण,
आह्मी तसे मरूं, जाण.

४ थडग्यास जाउनी
पाहा कोठें निजला,
परी पुन्हा उठुनी
तो आह्मास भेटला.
प्रभू ख्रिस्ता गौरवीं
तूं आह्मास उठवी.

---

77. Christ on the Cross.
"I saw one hanging on a tree."

### ७७. ख्रीस्त खांबीं टांगला.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ खांबासीं एक टांगला,
तो सोसी दुःख घोर,
तो मला पाहूं लागला,
मी असतां समोर.

२ मी त्याचें तोंड पाहीं तों
तें खिन्न दिसलें,
तो मला दोष लावितो,
असेंच भासलें.
३ माझ्या मनानें खाउनी
दोष स्वीकारिला,
कां माझा दंड भरूनी,
तो खांबीं कण्हला.
४ "मी आतां कोठें लपणार?
घातक ठरलों;"
असें मनांत भितां फार
मी थरथरलों.
५ तों मजकडे पाहतां
प्रभुनें दिल्हा धीर,
ह्मणाला, "तुझ्याकरितां
गळलें हें रुधिर."
६ दारुण दंड सोसुनी
तो पाप दावी घोर,
पाप्याची क्षमा करूनी
दाखवी कृपा थोर.

---

78. Mary's Lament.

## ७८. मार्येचा शोक.यो·१९:२५.

Hindu M. साकी, (विलू, एका.)

ध्रु० कैसा दुःखांचा घाला
माझ्या बाळावरि आला!
१ सुत पाहतां खांबावरि जैं,
मार्या जवळी आली,
बहु दुःखानें रडतां रडतां,
कैसी वदती झाली. ध्रु०
२ हातीं पायीं बाळक खिळतां
जों जों लागति ठोके,
तों तों माझ्या अंतःकरणा
जसि जणु पडती भोकें! ध्रु०
३ आहा बाळा किति तगमगसी!
दुःख तुझें तुज ठावें!
काय करूं मी मज न पाहवे,
कोणिकडे म्यां जावें! ध्रु०
४ किति ममताळू सुपुत्र माझा,
खांबावरि जरि आहे,
शिष्या ह्मणतो माता तव ही,
रक्षण माझें चाहे. ध्रु०
५ मागत असतां पाडस पाणी
लोकां बहु विनवूनी,
पाणि न देतां आंब पिण्यासी
दिलें पित्तें मिसळूनी. ध्रु०
६ पाहा पाहा पूर्ण ह्मणुनि तो
जिव सोडीता झाला,
परि दुष्टांची तृप्ति न होतां
भोसकिला कुसि भाला. ध्रु०
७ यास्तव बाळा पूर्णच केलें,
बहु दुःखें सोसूनी;
परि माझ्या तरवार जिवांतुनि
गेली पार निघूनी. ध्रु०
८ द्राक्षीच्या वेलासी जैसा
घड लोंबे द्राक्षांचा;
तैसा त्या खांबासीं लोंबे
जिव माझ्या पक्षाचा. ध्रु०
९ पाडस चुकतां जसि हरणीची
तगमग तगमग होते,
तैसी गत मज झालि सख्यानो,
दुःख पहातां हो तें. ध्रु०
१० बाळपणापासून कधींहो
आज्ञा मोडलि नाहीं;
हरिसरसें धांवून येई,
न वर्णवे गुण कांहीं. ध्रु०

---

79. Christ on the Cross.

"Alas! and did my Saviour bleed."

## ७९. ख्रीस्त खांबीं टांगला.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ अहाहा! माझा प्रभु थोर,
तो खांबीं मारिला;

माझ्या पापाचा दंड घोर
तयाला लाविला.

२ दुष्टांनीं खिळे ठोकुनी
शरीर विंधिलें,
पाप्यांचा दंड लावुनी
देवानें पिडिलें.

३ तो माझ्या पापाकरितां
त्या खांबीं कण्हला,
अपूर्व प्रीति ममता!
तो माझा बदला.

४ सूर्यानें तेज झांकिलें,
तें शोभला अंधार,
कर्त्यानें क्लेश भोगिले
कराया जनोद्धार.

५ मीहि तो खांब पाहतां
तोंडाला झांकितों,
प्रभूचें दुःख स्मरतां
अत्यंत रडतों.

६ हे प्रिय प्रभू, तुजला
फेडाया करूं काय?
जीवात्मा पायीं टाकिला,
हा एवदा उपाय.

---

80. "ALAS! AND DID MY SAVIOUR BLEED."

८०. ख्रीस्ताचीं दुःखें. १ पेतर २:२.

Hindu M. भावा. (झिंजोटी, एका.)

ध्रु० आहाहा प्रभुरे, मजला तारायासी
कितीं दुःखें त्वां सोसिलीं जगवासी.

१ सृष्टीचा राजा असतांना तूं खरा,
जन्मतां तुजला थारा नाहीं जरा,
ह्मणुनी मीळाला गोठ्यांत आसरा,
काय जीणें हे माझ्या विश्वंभरा. ध्रु०

२ विव्हळही भारी मजसाठीं झालासी,
गेथसेमनि बागीं बहु शोक केलासी,
घामहि रक्ताचा किती पाडीलासी,
दुःखें पाप्यांचीं पाहुनी रडलासी. ध्रु०

३ रक्तहि अनिमोल तुझें बा वीकीलें,
किंमतरे तीस रुपये कीं घेतीले,
दुष्टांच्या हातीं तुजला गा सोंपीलें,
लूटाऱ्यावाणी बांधोनीया नेलें. ध्रु०

४ किरमीजी झगा अंगांत घातीला,
करूनिया थट्टा हातीं बोरू दिल्हा,
मुगुटहि कांट्यांचा मस्तकीं घातीला,
डोक्यांत तुझिया वेत तो मारीला. ध्रु०

५ धरूनिया तुजला फटके बा मारीले,
तोंडांत तुझिया माहूनी थुंकले,
हातां पायांत खीळेही ठोकीले,
लूटाऱ्यामध्यें तुजला खांबीं दिल्हें. ध्रु०

६ आंबहि पाजीली पित्तयुक्त तुजला;
ह्मणोनी पूर्ण प्राण त्वां सोडीला,
कुसिमध्यें तुझिया भाला भोंसकीला,
लोट रक्ताचा, पाण्याचा वाहीला. ध्रु०

७ अर्पीला प्राण पाप्यां तारायास,
याहून प्रीती नाहीं सांगायास,
ह्मणुनी जनानो ठेवा हो विश्वास,
आकाशीं सुख हो लाभेल तुह्मास. ध्रु०

---

81. CHRIST'S SUFFERINGS.

८१. ख्रीस्ताचीं दुःखें. यशा. ५३.

Hindu M. शोक गीत. (सोरठ, एका.)

१ प्रिय प्रभु येशू ख्रीस्ता
थारा मिळेना जन्मतां,
मालक सृष्टीचा असतां,
अरेरेरेरे.

२ किती विव्हळ तो झाला,
घाम रक्ताचा वाहीला,
बागीं किती शोक केला,
अबबबब.

३ रक्त त्याचें विकीयेलें,
बांधोनीया त्याला नेलें,
सर्व मनुष्यांनीं केलें,
थुथुथुथुथु !

४ मुगुट कांट्यांचा घातीला,
वेत मस्तकीं मारीला,
मार फटक्याचा दिल्हा,
छीछीछीछी,

५ त्याच्या तोंडांत वेतीलें,
खांबीं लुटाऱ्यांत दिल्हें,
हातीं पायीं खिळीयेलें,
अगगगग.

६ आंब पाजीयेली त्याला,
कुसीं भाला भोंसकीला,
लोट रक्ताचा वाहीला,
आहाहाहाहा.

७ पाहा हाची तारणारा
जगीं स्थापीयेला खरा,
सर्व मनुष्यांनो करा
जयजयहो.

---

82. Christ's Sufferings.

८२. ख्रीस्ताचीं दुःखें यशा. ५३:४,५.

Hindu M. पद. (परज, त्रिवट.)

ध्रु० प्रभु मजसाठीं हो दुःखी बहु झाला.

१ श्रमला, दमला, कण्हला, रडला,
प्याया न थेंब मिळाला. ध्रु०

२ सोसिलि छी थू, दुःसह फटके;
चपडाका किति गाला. ध्रु०

३ क्रूर खांबींचें मरण, खिळेंही,
अनुभविला कुसिं भाला. ध्रु०

४ बहुविध दुःखें सोसुनि दाविलि
प्रिति या पापि मनाला. ध्रु०

---

83. Christ's Sufferings.

८३. ख्रीस्ताचीं दुःखें.

मार्क १५:१५-३७.

Hindu M. दिंडी.

१ तुझें रक्त प्रभू कसें विक्रीयेलें,
तीस रुपये कीं मोल घेतियेलें,
तुला दुष्टांच्या हातिं सोंपियेलें,
लुटाऱ्यावाणी बांधुनिया नेलें.

२ झगा अंगीं जांभळा घातियेला,
करुनि थट्टा हातांत बोरु दिल्हा,
मुगुट कांट्यांचा डोई घातियेला,
वेत तुझिया मस्तकीं मारियेला.

३ तुला धरुनी फटकेहि मारियेले,
थुंकुनीया तोंडांत वेतियेलें.
हातिं पायीं वा खिळे ठोकियेले,
तुला चोरांमधिं खांबिं खिळीयेलें.

---

84. Christ Crucified.

"Glory to the bleeding Lamb."

८४. वधलेला कोंकरा.

Peculiar. निराळा प्रकार.

१ येशू खांबासीं टांगला,
वधलेला कोंकरा !
वंदूं त्या स्तुत्य प्रभूला,
वधलेला कोंकरा !

ध्रु० तो अति प्रिय कोंकरा !
येशू हें नाम हो मधुर,
ऐकुनी वाहे प्रेमपूर,
वधलेला कोंकरा !

२ पातक माझें वाहिलें,
वधलेला कोंकरा !
त्या नावें मला तारिलें,
वधलेला कोंकरा ! ध्रु०

३ पापांची क्षमा पावलों,
वधलेला कोंकरा !
आकाशीं आतां चाललों,
वधलेला कोंकरा ! ध्रु०

४ हीं भवदुःखें सरतां,
वधलेला कोंकरा !
गाईन सदा वंदितां
वधलेला कोंकरा ! ध्रु०

---

85. Christ on the Cross.
'When I survey the wondrous Cross."

## ८५. ख्रीस्त खांबीं टांगला.

L. M. ८ अक्षरी.

१ जगाचा राजा गौरवी
हा खांबीं कसा खिळला !
हे जिवा, तूं तें आठवी,
तो तुझ्यासाठीं मारिला.

२ डोक्याला कांटे रुततां
प्रभूनें क्लेश साहिले,
हातां पायांला खिळतां
रक्ताचे ओघ वाहिले.

३ जगाचा त्याला लागे भार,
जगाचीं पापें घेतलीं,
पाप्याचा साधितां उद्धार,
अपूर्व दुःखें सोसिलीं.

४ हे प्रभू, तुझ्याकरितां
अवघें तुच्छ मानितों,
तुझीच आशा धरितां
संपूर्ण जग टाकितों.

५ तुझी ती प्रीति स्मरूनी,
हे प्रभू तुला देतों प्राण,
ये माझ्या अंतःकरणीं,
मी तुझा दास प्रेमवान.

---

86. It is Finished!
"Hark! the voice of love and mercy."

## ८६. पूर्ण झालें.

8, 7, 4. ८, ७, ४ अक्षरी.

१ ऐका, येशू मरतांना
कसी हाक मारितो !
पाहा, भूमि कांपतांना
अंधकार पडतो.
"पूर्ण झालें."
असें तो ओरडतो.

२ "पूर्ण झालें" म्हटल्याने
सरतें अनंत दुःख,
पूर्णोद्धार साधल्याने
मिळे आकाशाचें सुख,
"पूर्ण झालें,"
भक्त, ऐका हो उत्सुक.

३ पूर्ण नेमशास्त्र, विधि,
यज्ञ, रीति, दाखले,
पूर्ण जें भविष्यवादी
प्रेरणेने बोलले.
"पूर्ण झालें,"
दंडभय सरलें.

४ स्तुति गाहो, माणसांनो,
ख्रीस्तनाम गाजवा,
आकाशाच्या आकाशांनो,
मोठी किर्ति वाढवा.
"हालेलूया,"
देवकृपा कळवा.

---

87. It is Finished!
"'Tis finished, so the Saviour cried."

## ८७. पूर्ण झालें.

7s. ७ अक्षरी.

१ "पूर्ण झालें" बोलुनी
येशू गेला मरूनी,
पूर्ण जय पावला,
पूर्णोद्धार साधिला.

२ पूर्ण झालें सगळें,
जें साधूनी म्हटलें,
भाका पूर्वीं दिधल्या,
ख्रीस्तें पूर्ण केलिया.

३ पूर्ण बलि अर्पणें,
पशुरक्त शिंपणें,
पूर्ण विधि दाखले,
नेमशास्त्र सगळे.

४ पूर्ण झाली खंडणी
ख्रीस्तें दिल्ही भरूनी,
तेणें पाप हरितो,
माणसांला तारितो.

५ पूर्ण दिसे ममता,
ईश्वराची सत्यता,
शत्रुशक्ति मोडिली,
जगीं शांति भरिली.

६ "पूर्ण झालें," कळवा,
सर्व देशीं गाजवा,
ख्रीस्त पूर्ण तारणार,
सर्व सत्ता धरणार.

---

88. Christ's Death.

"He was extended," &c.

## ८८. ख्रीस्ताचें मरण.

10, 7, 9. १०, ७, ९ अक्षरी.

१ तो माझा प्रभु, तो माझा प्रभु,
तो माझा प्रभु महान,
पाप्यांसाठीं मरुनी
रक्तें दिल्ही खंडणी,
मिळवाया उद्धाराचें दान.

२ टांगला खांबीं, टांगला खांबीं,
सोसिलें दुःख अघोर,
तेव्हां मान पडुनी,
प्राण दिल्हा सोडुनी,
जगा दाविली करूणा थोर.

३ अंधार पडे, अंधार पडे,
अंधार पडला दाट,
सूर्य तेज देईना,
तें कुकर्म पाहीना,
जगें अन्याय केला अचाट.

४ समर्थ प्रभु, समर्थ प्रभु,
समर्थ प्रभु महान,
मृत्युबंद तोडुनी
स्वर्गीं गेला चढुनी,
तेथें पावे अत्यंत सन्मान.

५ करी विनंती, करी विनंती,
करी विनंती बापास,
ह्मणे,"बापा मी मरून
दंड दिधला भरून,
आतां क्षमा करावी पाप्यास."

६ "क्षमा करीन, क्षमा करीन,"
ह्मणतो बाप प्रेमळ,
"जे जे घेती तुझें नांव
आणि धरिती सद्भाव
तरतील निश्चयें सकळ."

---

89. Christ's Resurrection.

"He dies, the Friend of sinners dies."

## ८९. ख्रीस्ताचें मरणें व उठणें.

L. M. ८ अक्षरी.

१ पाप्यांचा मित्र मरतो,
सभोंवतें ते रडती,
अंधार मोठा पडतो,
थरारां भूमि कांपती.

२ रडा हो पापी पाहतां,
पाप्यांचा मार सोडितो,
तो तुह्मासाठीं मरतां,
रक्ताचा ओघ वाहतो.

३ अघोर दुःखें सोसुनी
येशूनें प्राण सोडिला,
प्रभूला पाहा फिरूनी,
तो आतां पुन्हां उठला.

४ थड्याला सोडी जगवान्
तो चढला अधांतरीं,
दुतांचें सैन्य तेजवान्
देतें सन्मान ईश्वरी.

५ भक्तानो, नको रडणें,
पाप्यांचा तो कैवारी थोर,
करा हो मोठीं स्तवनें,
दुष्टाला करी दंड घोर.

६ हे येशू राजा तेजोमय,
जगाला त्वां उद्धरिलें,
हे मृत्यू, तुझें सर्व भय
ख्रीस्ताकडुनी सरलें.

---

90. MARY AT THE SEPULCHRE.

"Mary to the Saviour's tomb."

## ९०. थड्याजवळ मारया.

7s. ७ अक्षरी.

१ प्रात:काळीं मारया
वेगें आवे थडिया,
तेव्हां आंत पाहतां
प्रिय प्रभु नव्हता.
किंचित् उभी राहिली,
मोठें दु:ख पावली,
तेव्हां डोळे भरले.
अश्रु ओघ वाहिले.

२ परी ख्रीस्त बोलतां.
तिचें दु:ख सरतां.
मोठा हर्ष वाटला,
पाहा येशू उठला.
ख्रीस्तवाणी शक्तिमान्,
तेणें रात्र तेजवान्,
प्रभूसाठीं रडती
पुढें ते आनंदती.

---

91. MARY AT THE SEPULCHRE.

"Where hast thou laid Him?"

## ९१. मार्या माग्दालिणीचा धावा.

Hindu M. धांवा. (परज, एका.)

ध्रु० माझ्या प्रभुला ठेवियेलें कोठें,
माळी दादारे, माळी दादा.

१ क्रूर जनांनीं त्याला मारियेलें,
ह्याच थड्यांत त्याला ठेवियेलें,
काळ शाब्बाथि येथें नाहीं झालें झालें. ध्रु.

२ पाहूं गेलें रे थड्यामधिं जेव्हां,
प्रेतवस्त्रें व दूत होते तेव्हां,
प्रिय माझा तारक नेला केव्हां केव्हां. ध्रु०

३ दिव्य गौरव सोडुनियां आला,
श्रेष्ठ असूनि फार नीच झाला,
प्राण अर्पी लाजन तारायाला याला. ध्रु०

४ मोठ्या पहाटे उठलें रे आज,
आलें करूनि सारें काम काज.
कधीं भेटेल माझा महाराज राज. ध्रु०

५ तेल सुगंध आणिलें रे भाऊ,
आतां कोणाला लावायाला जाऊं,
सांग त्याला मी कोणिकडे पाहूं पाहूं. ध्रु०

६ आहा सद्गुरुविण सारें कडू,
कोण उद्धारि कोणा आड दडूं,
डोळे माझे शिणले रडूं रडूं रडूं. ध्रु०

७ माळी बोले कां रडतिस बाई,
कोणा शोधीसि फार घाई घाई,
मार्या बोले मी करूंगत काई काई. ध्रु०

८ तेव्हां माळी बोलला असे मार्या,
मार्या ओळखूनि ह्मणे गुरुवर्या,
भेट होतांच ह्मणेना मार्या मार्या. ध्रु०

९ प्रभु आग्रह, प्रिति, भाव पाही,
देइ अशास भेट लवलाही,
अशा शोधांत मन माझें राही राही. ध्रु०

---

92. CHRIST'S RESURRECTION.

"Christ the Lord is risen to-day."

## ९२. ख्रीस्ताचें पुन्हा उठणें.

7s. ७ अक्षरी.

१ पाहा, येशू उठला,
दिव्य देह धरिला,
हर्ष करा खालीं वर,
तोच राजा परात्पर,

२ ख्रीस्तें साधिला उद्धार,
दुःख सोसिलें अपार,
पूर्ण दंड भरला,
तारणारा ठरला.
३ व्यर्थ धोंड लोटिली,
व्यर्थ मुद्रा मारिली,
व्यर्थ पाहरेकरी
ठेविले थड्यावरी.
४ ख्रीस्तें बंद तोडिले,
मृत्युबळ मोडिलें,
शत्रुसैन्यें जिंकिलीं,
सर्व सत्ता धरिली.
५ सुभक्तांनो, पाहा वर,
प्रभु चढला अमर,
तेथें बसे जयवान,
दूत देती बहुमान.
६ आतां येशू जगतो
सर्वकाळ पावतो,
मरणाचें गेलें भय.
सर्व करूं जयजय.

---

93. Christ's Resurrection.
"Yes, the Redeemer rose."

## ९३. ख्रीस्ताचें पुन्हा उठणें.

H. M. ६, ६, ८ अक्षरी.

१ हो, प्रभु उठला,
थड्याला सोडिलें,
तो जय पावला,
स्वतेज दाविलें.
बिचारे पाहरेकरी,
ते पडले भूमीवरी.
२ दुतांचे समुदाय
येशूला भेटती,
ते धरितांना पाय
भजन करिती.
हर्षानें ते उतरले,
प्रेमानें त्याला वंदिलें,
३ फिरूनी चढतां
ते स्तविती अपार,
सुवार्त्ता सांगतां
वाखाणिती उद्धार.
ते ह्मणती, "जो मारिला,
तो येशू आज उठला."
४ लोकांनो, ख्रीस्तनाव
सर्वत्र गाजवा,
ठेवा हो पूर्ण भाव,
सुकीर्ति वाढवा.
जो ख्रिस्त खांबीं मारिला
अनंत राजा ठरला.
५ हे प्रभू जयवान्,
आह्माला तारिसी,
अनंत स्तुतिमान
सर्वत्र कळसी,
आह्माला तुझ्यासंगें घे,
तूं वश कर अवघें.

---

94. Mercy of Christ.

## ९४. ख्रीस्ताची दया.

7, 6. ७, ६. अक्षरी.

१ देवानें पाठविला
तारक प्रेमवान,
मसाठीं जीव दिल्हा,
व साधिलें कल्याण.
२ मी त्याला धिक्कारुनी
चिडवीं वारंवार,
तरी तो न टाकुनी
करी सत्प्रीति फार.
३ पाहुनी माझीं दुःखें
तो करी सांत्वन,
देई अवाच्य सुखें
व तृप्त केलें मन.
४ जो असें करणारा
ऐकावें त्याचें नाव,

तो ख्रीस्त तारणारा,
त्यावरी ठेवा भाव.

५ तो सर्व पातक्याला
ताराया इच्छितो,
जे कोणी येती त्याला
तो अंगीकारितो.

६ गाईन त्याची प्रीति
सर्व आयुष्यभर,
अखंड त्याची स्तुति
प्रेमें करीन वर.

---

95. HOSANNAS OF THE CHILDREN.

## ९५. लेंकरें होसान्ना गातात.

7, 6. ७, ६ अक्षरी.

१ येशू उद्धार देता
जो आला देवळीं,
त्यापाशीं मुलें येतां
वाखाणूं लागलीं.

२ तीं गाउनी होसान्ना
पाहात त्याकडे,
तें गाणें ऐकतांना
प्रभूला आवडे.

३ आतां तो तेजवंत
आकाशीं राहतो,
मुलांस तो अत्यंत
सुप्रिय मानितो.

४ आह्मी पडुनी पायां
ख्रीस्ताला देऊं मान,
तें नाम वाखाणाया
प्रेमानें अर्पूं प्राण.

५ केवळ बोलण्यानें
न व्हावीं स्तवनें,
संपूर्ण हृदयानें
करूंच वंदनें.

६ जरी आह्माकडुनी
स्तवनें न होतील,
धोंडे हे ओरडूनी
प्रभूला वंदितील.

---

96. CHILDREN SHOULD SING.

## ९६. लेंकरानीं गावें.

8, 7. ८, ७ अक्षरी.

१ लेंकरानीं स्तुति गावी,
येशू त्यांस तारितो,
तीं मुगुटीं रत्नें व्हावीं
असें प्रभु योजितो.
त्यांस दिल्हा गोड मन्ना
पाखराच्या सारिखा,
तीं शिकोत वंदायाला
प्रिय प्रभू तारका.

२ शुभ्र झगे घालुनिया
मुलें वर्ते स्तवितीं,
दूत त्यांचें ऐकुनीया
स्तब्ध उभे राहती.
त्यांचें गाणें ऐकायाला
सर्वां सुख वाटे फार,
एथें तेंच शिकायाला
झटलीं तीं वारंवार.

३ येशू जगीं राहतांना
करी प्रीति त्यांवरी,
वर्ते तक्तीं बसतांना
त्यांस प्रेमें पत्करी,
तर लेंकरानीं गावें
त्या प्रभूचे उपकार,
त्यानीं सुस्वरें ह्मणावें,
"वंद्य ख्रीस्त तारणार."

---

97. PRAISE TO THE REDEEMER.
"Mighty God, while angels bless Thee."

## ९७. ख्रीस्ताची स्तुति.

8, 7, 4. ८, ७, ४ अक्षरी.

प्रभू ख्रीस्ता शक्तिमंत,
दूत तुला वंदिती,

तारणाऱ्या दयावंत,
जन प्रेमें स्तविती.
तुझी स्तुति
सर्व जगीं वाढती.
२ आकाशाला सोडूनिया
घेतलासी अवतार,
दुष्ट जगीं वागुनिया
दाविलासी प्रेमा फार.
पापी यांचा
मोठा केलासी उद्धार.
३ तूं बागांत पडतांना,
मोठ्या दुःखें रडलास,
वधस्तंभ वाहतांना
मरायाला चाललास.
त्या खांबासीं
आम्हांसाठीं टांगलास.
४ चढुनिया बापापासीं
बससी राजासनीं,
तूंच योग्य ठरलासी,
राजा हो त्रिभुवनीं.
घे आम्हांला
आपल्या सिंहासनीं.

---

98. THE CROSS OF CHRIST.

"Ye saints, your music bring."

### ९८. ख्रीस्ताचा वधस्तंभ.

H. M. ६, ६, ८ अक्षरी.

१ भक्तानो, स्तुति गा,
येशूला माना थोर,
महिमा अवघा
वर्णा जगासमोर,
गाहो खांबाचीं स्तवनें.
येशूला करा वंदनें.
२ वधस्तंभाकडून
सैतान जिंकला,
तो वीजसा पडून
सत्तेला मुकला.
गाहो खांबाचीं स्तवनें,
येशूला करा वंदनें.
३ खांबाची शक्ति थोर,
तो जना तारितो,
मृत्यूचा हरी घोर,
सांत्वन करितो.
गाहो खांबाचीं स्तवनें,
येशूला करा वंदनें.

---

99. FITNESS OF THE ATONEMENT.

### ९९. योग्य प्रायश्चित्त.

Hindu M. अभंग.

१ पाप्याला जो दंड लागणार पाहा
ख्रीस्तें दिला आहा भरूनी तो.
२ सोसूनियां दुःख अर्पियेला प्राण,
प्रायश्चित्त जाण योग्य केलें.
३ पवित्र तो ख्रीस्त सर्वसमर्थही,
दुःख त्याचें नाहीं हलकें तें.
४ येणें ईश्वराचा न्याय झाला पूर्ण,
पाप्यावरी दीन, दया झाली.
५ यास्तव देवाच्या एकाही गुणाला
बाध न लागला कार्य झालें.
६ पाप्यासाठीं झाला खरा तरणोपाय
धरी ख्रीस्तपाय पाप्या आतां.

---

100. THE SAVIOUR PASSING BY.

"Jesus of Nazareth passeth by."

### १००. नाजोरी येशू चालला.

L. M. (6 lines.) ८ अक्षरी ६ चरणी.

१ "हा कोण मोठा समुदाय?
हे फार लोक! आहे काय?"
ते कां उत्सुक दिसती?
कां अशा वेगें चालती?
आरोळी झाली, "पाहिला?
नाजोरी येशू चालला."
२ "हा येशू कोण? कसा तो
लोकां सहज ओढितो,

प्रवासी दिसे, कसा यां
समर्थ तो मनावाया ?"
पुकारा हाचि ऐकिला
"नाजोरी येशू चालला."

३ येशूनें देह धरिला,
जनांचा भार वाहिला,
पुरवी शक्ति अशक्तां,
आरोग्य देई पीडितां.
हर्षानें ऐके अंधळा
"नाजोरी येशू चालला."

४ आतांहि जगीं राहतो,
अदृश्य एथें फिरतो,
पवित्र कर्मे घडलीं
तों जाणा आला जवळी.
सर्वांला ह्मणे "या, वळा,
नाजोरी येशू चालला."

५ हो कष्टी लादलेले, या
विसावा, क्षमा, शांति घ्या,
तूं फीर वेगें भटक्या,
बापाचे घरीं जावया.
ये केशा, मुक्ति तुजला,
"नाजोरी येशू चालला."

६ येशूची कृपा अति थोर,
स्वीकारा, नमा त्यासमोर,
ती कृपा तुच्छ मानिली,
न जागें, वेळ टळली,
तों पुढें तुझा धिःकारील,
तुझा सोडूनी तो जाईल.

---

101. PRAISE TO THE SAVIOUR.

"Come, every pious heart."

## १०१. तारणाऱ्याची स्तुति.

H. M. ६, ६, ८ अक्षरी.

१ सुभक्त, जें उद्धार
ख्रीस्तानें पावले,
प्रभूचे उपकार
वर्णाहो सगळे.
ख्रीस्ताची प्रीति गाजवा,
सर्वत्र कीर्ति वाढवा.

२ आकाश सोडुनी
खालीं उतरला,
अत्यंत सोसुनी
स्वजीव अर्पिला.
आह्मांला तारायाला, जाण,
तो कितीं झाला दैन्यवान.

३ तो जय पावला
थड्याला सोडिलें;
स्वजीव धरिला,
सामर्थ्य दाविलें.
आकाशीं गेला जयवान्,
तो ठरे प्रभु भगवान्.

४ हे येशू, सुचवीं,
कृपेचें फेडूं काय ?
हे प्रभू गौरवी,
पडुनी धरूं पाय.
तुलाची देतों अवघें,
तें किंचित् आहे तरी घे.

---

102. JOY IN THE LORD. Phil. 4: 4.

"Rejoice, the Lord is King."

## १०२. ख्रीस्तामुळें आनंद.

H. M. ६, ६, ८ अक्षरी.

१ जनानो, स्तुति गा,
येशू हा राजा थोर,
आनंद वाजगा,
उल्लासा त्या समोर,
भक्तानो, स्तवा ईश्वरास,
अखंड करा हो उल्लास.

२ येशूचा अधिकार
त्रिलोकीं स्थापिला,

कधीं न सरणार,
देवानें नेमिला.
भक्तांनो, स्तवा ईश्वरास,
अखंड करा हो उल्लास.

३ शत्रूला मारितां
तो सत्ता चालवी,
पापाला हरितां
जिवाला शांतवी.
भक्तांनो, स्तवा ईश्वरास,
अखंड करा हो उल्लास.

४ तेजानें उतरून
तो न्याय ठरवील,
दिनांला उद्धरून
अत्यंत गौरवील.
भक्तांनो, स्तवा ईश्वरास,
अखंड करा हो उल्लास.

---

103. CHRIST OUR REFUGE.

"Jesus, lover of my soul."

## १०३. ख्रीस्त आमचा आश्रय.

7s. ७ अक्षरी.

१ येशू प्रिय तारका,
आश्रयाच्या खडका,
वारा सुटे भोंवतीं,
लहरा उसळती.
येशू, मला हो आधार,
सर्व संकटें निवार,
पैलपार पोंचवीं,
जागा द्यावी गौरवी.

२ नाहीं दुसरा आश्रय,
तूंच करिसी निर्भय,
मला नको घालवूं,
पाठ नको फिरवूं.
माझी आशा सगळी
तुजवर ठेविली,
तुझ्या पंखें सर्वकाळ
कर माझा प्रतिपाळ.

३ येशू, कृपा मागतों,
तुझे पाय धरितों,
दीन रोगी आंधळा,
असा झालों खंगला.
तुझी पूर्ण सत्यता,
अति हो पवित्रता,
कितीं मी बिघडलों,
पातकांनीं भरलों.

४ तुला कृपा अतिशय,
क्षमा कर, हो आश्रय,
प्रभू, मला शुद्ध कर,
दे सदात्मा जन्मवर.
जीवनाच्या उगमा,
मोठा तुझा महिमा,
मजमध्यें वस्ती कर,
तेथें सदा सत्ता धर.

---

104. CHRIST OUR EXAMPLE.

"My dear Redeemer and my Lord."

## १०४. ख्रीस्त आह्मास कित्ता.

L. M. ८ अक्षरी.

१ हे प्रिय प्रभू दयावान्,
पवित्र, सत्य, नीतिमान्,
त्वां शास्त्र पूर्ण पाळिलें,
तेणें तात्पर्य दाविलें.

२ अनंत तुझी ममता,
सर्वांसीं मोठी नम्रता,
जनांचीं दुःखें वारिलीं,
देवाची इच्छा पाळिली.

३ तूं रात्रभर डोंगरीं
करीसी भक्ति ईश्वरीं,
परीक्षा होतां अतिशय,
तूं पावलासी मोठा जय.

४ हे प्रिय प्रभू तारका,
मी व्हावा तुझ्या सारिखा
तरीच न्यायदिवसीं
तूं मला अंगीकारिसी.

---

105. CHRIST NOT COVETOUS.

## १०५. ख्रीस्त निर्लोभी.

Hindu M. पद.

ध्रु० गुरु माझा निर्लोभी ख्रीस्त हा जाण.

१ बोध करी कीं कोणी द्रव्यलोभी
न पावे स्वर्गाचें स्थान. ध्रु०

२ सर्व धनाचा असतां स्वामी,
झाला गरिबासमान. ध्रु०

३ त्याची गरीबी भाविक शिष्यां
न करी धनाची वाण. ध्रु०

४ विश्वासावीण कांहीं न मागे,
ऐसा हा गुरू महान. ध्रु०

५ दास ह्मणे हा ख्रीस्त सद्गुरू,
पुण्याची विशाळ खाण. ध्रु०

---

106. CHRIST BLAMELESS.

## १०६. ख्रीस्त शुद्धाचारी.

Hindu M. पद.

ध्रु० ख्रीस्त गुरुला साजे नांव खरें,
शुद्धाचारीरे, शुद्धाचारी.

१ कामदृष्टीचें पाप सांगितलें,
पाप कांहींच कधीं नाहीं केलें,
नाहीं वैऱ्याला तोंड काढू दिल्हें.
दिल्हें. ख्री०

२ बाया कित्येक प्रभुपासीं आल्या,
नीति पाहुनी झाल्या त्याच्या चेल्या,
खऱ्या भक्तिणी होऊन त्या गेल्या.
गेल्या. ख्री०

३ पाठीं लागत होते बहु वैरी,
केलीं कुभांडें त्यांनीं नाना जरी,
नाहीं घेतले भाळ ऐशा परीं,
परीं. ख्री०

---

107. CHRIST OUR REFUGE.

"Rock of ages, cleft for me."

## १०७. ख्रीस्त आमचा आश्रय.

7s, 6 lines. ७ अक्षरी, ६ चरणी.

१ प्रभू ख्रीस्ता कृपामय,
मला तूंच हो आश्रय;
तुझी कूस खोंचली,
पाणी रक्त वाहिलीं;
तेणें मला तूं उद्धर,
पापें सोड, शुद्ध कर.

२ जरी रडें अनिवार,
जरी सुकृतें अपार,
येणें होईना उपाय,
बुडतों तुझ्याशिवाय,
प्रभू ख्रीस्ता मी लाचार,
तुझ्या रक्तें दे उद्धार.

३ जों मी श्वास टाकितों
तों मी कृपा मागतों,
पुढें प्राण सोडितां
तुजकडे चढतां,
प्रभू ख्रीस्ता कृपामय,
तुझ्या ठायीं दे आश्रय.

---

108. COMPASSION OF CHRIST.

## १०८. ख्रीस्त ममताळू.

Hindu M. पद.

ध्रु० ऐसा सद्गुरु ममताळू,
दुसरा कोठें हो!

१ ज्याचें वंदन करिती दूत,
ह्मणती धन्य अहा प्रभुसूत,

दुर्लभ ज्याचे चरण बहून,
तें अमृत जगिं आलें. ऐसा०
२ पाहुनी कळवळला पतितांस,
दु:खी, रोगी, व्यंग जनांस,
झिजला देहाभ्यानें ठास,
सुख द्यायास पाप्यांला. ऐसा०
३ ख्रीस्तें नाशाया जगपाप
म्हणुनी सोशियला बहु ताप,
घेउनि पाप्यांबद्दल शाप
ईश्वरबाप शांतविला. ऐसा०
४ मित्राकरितां द्यावा प्राण
याहुनि प्रीति श्रेष्ठ न जाण,
ख्रीस्तें स्वजिवाचें बलिदान
केलें जाण दुष्टार्थी. ऐसा०

---

109. CHRIST, MY SAVIOUR.

## १०९. प्रिय तारणारा.

१ यो. ३:१६.

Hindu M. अभंग.

१ ख्रीस्त माझा तारणार,
मला वाटे प्रिय फार.
२ ज्या ज्या वेळीं होतें दु:ख,
करितां धांवा देतो सुख.
३ किती नीच प्रभु झाला,
पापी जग तारायाला.
४ मातेपरी देतो धीर.
म्हणे आतां तरी फीर.
५ काय सांगू त्याचें प्रेम,
देई वारंवार क्षेम.

---

110. CHRIST, MY FERRYMAN.

## ११०. ख्रीस्त तारू. मा. २३:१०.

Hindu M. अभंग.

१ ख्रीस्त माझा तारणार,
मला पोंचवील पार.
२ पापरूप नदी मोठी,
परी ख्रीस्त माझ्या पाठीं.
३ धरीन मी त्याची कास,
दु:खें भयें होवो त्रास.
४ सर्व सोसीनां टिकेन,
शांति त्यासवें पावेन.

---

111. CHRIST, MY REFUGE.

## १११. ख्रीस्त आश्रय. यो. १४:६.

Hindu M. अभंग.

१ प्रभु ख्रीस्त माझा गुरु,
माझ्या जीवनाचें तारू.
२ प्रभु ख्रीस्त माझी नौका,
नसे आश्रिताला धोका.
३ ख्रीस्त माझा किल्ला गड,
थारा देतो येतां जड.
४ प्रभु ख्रीस्त माझी वाट,
जाती आकाशाला नीट.
५ ख्रीस्त माझा मेंढपाळ.
करी प्रीतीनें सांभाळ.

---

112. PRAISE FOR SALVATION.
"Salvation, O the joyful sound."

## ११२. तारणामुळें स्तुति.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ हे जगा, आतां घे उद्धार,
सुखाचा शब्द तो,
निवारी भय अनिवार,
दु:खाला नाशितो.
२ पापाच्या डोहीं पडलों,
नाशाच्या दारीं प्राण,
तों देवदया पावलों,
उद्धार ख्रीस्तें, जाण.
३ उद्धार शब्द गाजवा
दिगंतरीं अपार,

त्रिलोकीं शब्द वाढवा,
हे पाप्या, घे उद्धार.

113. CHRIST, MY JOY.

११३. ख्रीस्तामुळें आनंद.

Hindu M. अभंग.

१ झाला फारच आनंद,
ख्रीस्तचरणीं लागो छंद.
२ मला मिळाला उपाय,
धरीं ख्रीस्ताचे मी पाय.
३ चुके आतां नर्कदंड,
ख्रीस्तें भरीयेला खंड.
४ त्याजवरी माझा भाव,
तोची जीवनाची नाव.

114. PRAISE OF CHRIST.

"We bless the Prophet of the Lord."

११४. ख्रीस्ताची स्तुति.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ येशू सद्गुरु हो महान्,
तो कृपा दावितो,
आह्माला सांगे सत्य ज्ञान,
सुमार्गी लावितो.
२ येशू उपाध्या आहे थोर,
अत्यंत त्याचा प्रेम,
भरला त्याने दंड घोर,
आतांहि करी क्षेम.
३ येशू हा राजा गौरवी,
आह्मी वाखाणूं फार,
आकाशीं तोच पोंचवी,
भक्तांनो, गा उद्धार.

115. PRAISE OF CHRIST.

११५. ख्रीस्ताची स्तुति.

Hindu M. पद.

ध्रु० ख्रीस्ता थोर तुझे उपकार, ख्रीस्ता०

१ सोडून दिलें स्वर्गाचें सुख,
सोसिलें दुःख अपार. ख्री०
२ प्रायश्चित हें शुद्ध तुझेंची,
कैसा मी करूं धिक्कार. ख्री०
३ देऊनि प्राण घातला किंत्ता,
उत्तम दिसतो फार. ख्री०
४ येई मी शरण दास तुझाची,
जाऊं मी कोठें मोकार. ख्री०
५ पवित्र आत्मा देऊनि मजला,
उघड मनाचें द्वार. ख्री०

116. PRAISE FOR REDEMPTION.

"Plunged in a gulf of dark despair."

११६. उद्धाराविषयीं स्तुति.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ बुडालों आह्मी दुःखीं घोर,
बिचारे पातकी,
निराश झालों, पापी थोर,
जाणारे नरकी.
२ जनांची ही दुःखावस्था,
ख्रीस्ताने पाहिली,
मनांत आली ममता,
युक्तिहि योजिली.
३ तो आकाशाला सोडुनी,
हर्षाने धावला,
मनुष्यदेह धरुनी
स्वजीव अर्पिला.
४ जनांच्या बेड्या तोडितां
शत्रूला जिंकिलें,
अनंत दुःखें टाळितां
आह्माला तारिलें.
५ जो सैतानाचा अधिकार
तयाचा केला नाश
जे नरकाचे भागीदार,
ते पावले आकाश.

६ ही त्याची अति ममता,
सर्वांनो, गाजवा,
ख्रिस्ताची कीर्ति वाणतां
सर्वत्र वाढवा.

---

117. Joy in the Saviour.

"How heavy is the night."

११७. ख्रीस्तामुळें हर्ष.

S.M. ६,८ अक्षरी.

१ सर्वत्र अंधकार
जगांत व्यापला,
तों ख्रीस्त दिव्य अवतार
उदय पावला.

२ पाप्याला दंड घोर
शास्त्राने ठरला,
येशूचें पुण्य अति थोर,
येणें तो टळला.

३ अशुद्ध, भ्रष्ट फार,
बुद्धि व वर्त्तणें,
सदात्मा हीं सुधारणार,
अपूर्व साधनें.

४ जनांला घेरुनी
सैतानें धरिलें,
ख्रीस्तानें बेड्या तोडुनी
दिनांला सोडिलें.

५ हे प्रभु, तूं दयाळ,
वाखाणूं तुझें काम,
तूं तारणारा सर्वकाळ,
सुवंद्य तुझें नाम.

---

118. Peace through the Saviour.

११८. ख्रीस्ताचें दुःख शांतिदायक.

8s. (Abhang.) अभंग.

१ येरे, दाविदाच्या पुत्रा,
ऐक, दुःखितांच्या मित्रा,
मला समाधान द्यावें,
तुझें दुःख दाखवावें.
बागीं कसा पडलासी!
घाम कसा गाळलासी!
तेणें माझी मुक्ति होई,
शांति वाटे, भय जाई.

२ खांबीं तूं ओरडलासी,
मोठे कष्ट पावलासी,
म्या तें दुःख आठवावें,
तेणें मन शांत व्हावें.
प्रभू, ही विनंती ऐक,
मला तुजपाशीं राख,
तुला धरुनिया चित्तीं
सदा म्या करावी प्रिती.

---

119. The Blood of Christ.

"There is a fountain filled with blood."

११९. ख्रीस्ताचें रक्त.

C. M. ८,६ अक्षरी,

१ येशूच्या रक्तें भरलें
पुण्याचें कुंड जाण,
जे पापी त्यांत घातले,
ते होती शुद्धप्राण.

२ खांबासीं मरणारा चोर
त्यामुळें हर्षला,
तेणेंची माझा दोष घोर
पुसेल सगळा.

३ हे प्रभू, तुझें रक्तमोल
कधीं न सरणार,
देवाचें सर्व प्रिय कूळ
तूं तेणें खंडणार.

४ हा रक्तओघ वाहतां
म्यां भावें पाहिला,
तेथुनी स्तुति करितां
उद्धार गायिला.

५ सर्व आयुष्यपावेतों.
करीन स्तवनें,
व जेव्हां प्राण सोडितों
अनंत गायनें.

---

120. CHRIST OUR PEACE.

## १२०. ख्रीस्तावरून शांति.

Hindu M. अभंग. ( कालिंगडा.)

१ मरणाची भीति जाती,
होतां ख्रीस्तावरी प्रीति.

२ मृत्यु कांपे चळचळ,
ख्रीस्त वाटे जें प्रेमळ.

३ जगदुःखें गोड होती,
मनीं होतां ख्रीस्तवस्ती.

४ ख्रीस्ताविण मना शांति
होत नाहींच कल्पांतीं.

---

121. CHRIST PRECIOUS.

"How sweet the name of Jesus sounds."

## १२१. ख्रीस्त प्रिय.

C. M. ८, ६. अक्षरी.

१ येशूचें नाम गोड फार
दिनाला लागतें,
तें दुःखें भयें अनिवार
नाहींसीं करितें.

२ त्या नावें शांति भरती,
अत्यंत समाधान,
भुकेले तृप्ति पावती,
बिचारेहि कल्याण.

३ येशू हा माझ्या प्रार्थना
देवाला ऐकवी,
दुष्टाच्या सर्व योजना
बळानें घालवी.

४ येशू हा माझा मित्र, जाण,
पाठिंबा, मेंढपाळ,
गुरु, उपाध्या दयावान,
व राजाहि तेजाळ.

५ हे प्रभू, माझीं स्तवनें
अत्यंत हलकीं,
आकाशीं होतीं गायनें
महत्वासारिखीं.

६ आताहि तुझी ममता
सर्वत्र गाजवीन,
मी तुझ्या नावें, मरतां
जिवाला शांतवीन.

---

122. LOVING KINDNESS.

"Awake my soul, to joyful lays."

## १२२. येशूची कृपा.

L. M. ८ अक्षरी

१ हे माझ्या जिवा, हो तत्पर,
येशूची मोठी स्तुति कर,
सांगावी दया आवडी,
येशूची कृपा केवढी.

२ मला पतित पाहिलें,
तों त्यानें हातीं धरिलें,
तो चुकवितो दंड घोर,
येशूची कृपा अति थोर.

३ दारुण शत्रु हो विपूळ
जिवाला होतां प्रतिकूळ,
तो मला चालवी निर्भय,
येशूची कृपा अतिशय.

४ जेव्हां विपत्ति आली थोर,
जिवाला वाटे मोठा घोर,
तों त्यानें दिधला आधार,
येशूची कृपा अनिवार.

५ जरी बहुधा माझें मन
येशूची सोडी आठवण,
तो मजला विसरेना,
येशूची कृपा फिरेना.

६ पुढें मी प्राण सोडितां
गाईन ख्रीस्तममता,
करीन मोठा जयजय,
येशूची कृपा ही अक्षय.

---

123. CHRIST THE NECTAR OF LIFE.

**१२३. ख्रीस्त जीवनामृत.** यो. ६:६८.

Hindu M. पद (काफी, दीपचंदी.)

ध्रु० प्रभू हे जीवनामृता रे,
तुजवीण जाऊं कुठें?

१ जिवनाच्या गोष्टी तुजपासिं आहा,
तुजवीण सारें खुटे. ध्रु०

२ बहु यज्ञ केले, धन अर्पियेलें,
तरी पापदंड न सुटे. ध्रु०

३ अंत:करण हें बहु घट्ट पाहा,
तुजवीण कैसें फुटे? ध्रु०

४ जरि सर्व पृथ्वी धुंडाळिली म्या,
तरि शांति नाहीं कुठें. ध्रु०

---

124. THE CROSS OF CHRIST.

**१२४. ख्रीस्ताचा खांब.**

8, 6, 8. ८, ६, ८ अक्षरी.

१ येशूच्या ठायीं ठेवा भाव,
का दीनबंधु त्याचें नांव,
पाहा खांबाकडे;
जगाचीं पापें हरितो,
दिनाला प्रेमें तारितो.

२ आपत्ति दिसतां समोर,
जिवाला होतां मोठा घोर,
पाहा खांबाकडे;
प्रभुहि दु:ख सोसी फार,
तो तुला देई पूर्णाधार.

३ पापाचा मोह लागतां,
भवसमुद्रीं बुडतां,
पाहा खांबाकडे;
प्रभुचे क्लेश पाहुनी
घालीव सर्व मोहनी.

४ जों तुला येई अंतकाळ
व मृत्यु दिसे विक्राळ,
पाहा खांबाकडे;
प्रभूनें मिळविला जय,
तोच निवारी तुझें भय.

---

125. NOT ASHAMED OF JESUS.

"I'm not ashamed to own my Lord."

**१२५. येशूविषयीं लाज नाहीं.**

C. M. ८, ६ अक्षरी.

१ संपूर्ण जगादेखतां
ख्रीस्ताला धरितों,
प्रभूची वार्त्ता सांगतां
लज्जा न मानितों.

२ येशूचें नाम गोड फार,
तो माझा पूर्णाश्रय,
तो मला नाहीं टाकणार,
त्याठायीं मी निर्भय.

३ संपूर्ण त्याचीं वचनें
आकाशावाणी स्थिर,
लागोहि मला मरणें,
तरी तो देतो धीर.

४ जिवात्मा त्याला सोंपिला,
तो सदा रक्षणार,
न्यायाच्या वेळीं मजला
नाहींच सोडणार.

५ तो मला ईश्वरासमोर
प्रेमानें पत्करील,
आकाशीं माझा हर्ष थोर
अखंड वाढवील.

---

126. Meekness of Christ.

## १२६. प्रभु येशूची शांति.

Hindu M. पद.

ध्रु० प्रभु येशूला किती शांति,
शांति, शांति, शांति.
१ बहुत आळ घातले त्यावर
धरिली नाहीं भीति. प्रभु०
२ बहु बोलले वांकडें त्यासी,
दाविली त्यानें प्रीति. प्रभु०
३ वधस्तंभीं देणाऱ्या लागीं,
क्षमाही मागे वरती. प्रभु०
४ अशा सर्वच दुःखांत त्यानें
केलीच देवस्तुती. प्रभु०
५ पापी जनानो, ठेवाच भाव,
तुह्मांहि देईल शांति. प्रभु०

---

127. Christ Weeping. Luke 19:41.
"Did Christ o'er sinners weep."

## १२७. येशू रडला. लूका १९:४१.

S. M. ६,८ अक्षरी.

१ जो प्रभु आपला
सद्गुरू दयावान्,
तो पाप्यांसाठीं रडला,
आह्मीहि रडूं, जाण.
२ देवाचा पुत्र थोर,
तो अश्रू गाळितो,
हे जिवा, पाहा, खेद घोर
तुजसाठीं करितो.
३ आह्मी रडावें फार
स्वर्गा करितां,
आकाशीं नाहीं रडणार
निष्पापी सर्वथा.

---

128. Christ's Love.

## १२८. ख्रीस्ताची प्रीति.

7s. ७ अक्षरी.

१ कोठें आहे पांखरांस
बिळें सर्व खोकडांस,
जगीं जगज्जीवना
उश्या जागा मिळेना.
२ सर्वांपेक्षां तोच थोर,
तरी सोसे हाल घोर,
त्याचा हेतु हाच, जाण,
आह्मी व्हावें धनवान.
३ प्रिय प्रभु, माझें घे
धन मन अवघें,
माझा साधिला उद्धार,
कसा फेडूं उपकार ?

---

129. Christ a King.
"All hail the power of Jesus' name."

## १२९. ख्रीस्त राजा.

C. M. ८,६ अक्षरी.

१ येशूला तेज ईश्वरी,
दुतानो, माना थोर,
मुगुट घाला त्यावरी,
नमा ख्रीस्तासमोर.
२ भक्तानो, स्मरा अंतरीं
येशूचे उपकार,
मुगुट घाला त्यावरी,
अखंड गा उद्धार.
३ पाप्यानो, तुह्मी सत्वरी
येशूला द्याहो मान,
मुगुट घाला त्यावरी,
तो राजा बलवान.
४ सकल हो, दिगंतरीं,
नमा येशूसमोर,
मुगुट घाला त्यावरी,
ह्मणा, तो राजा थोर.

---

130. Christ a King.
"All hail the power of Jesus' name."

## १३०. ख्रीस्त राजा आहे.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ ख्रीस्ताला सर्व खालीं वर,
नमा हो त्यासमोर,

मुगुट घाला त्याजवर,
तो धन्य राजा थोर.
२ भक्तांनो, कृपा गाजवा,
भरिला दंड घोर.
सर्वत्र कीर्ति वाढवा,
तो धन्य राजा थोर.
३ पाप्यांनो, धरा त्याचे पाय,
का होतां हट्टखोर ?
भिडुनी त्यासीं फळ काय ?
तो धन्य राजा थोर.
४ प्राणीमात्रांनो, काढा स्वर,
गा स्तुति त्यासमोर,
मुगुट घाला त्याजवर,
तो धन्य राजा थोर.

---

131. CHILDREN PRAISE CHRIST.

### १३१. लेंकरें प्रभूला गातात.

L. M. 10 lines. ८ अ० १० च०

१ आलों, आलों, येशूचें नाम
स्तवावें हें उत्कृष्ट काम;
तो सार्वभौम राजा थोर
गाउनी नमूं त्यासमोर.
आनंदें करूं प्रार्थना
स्वयंभू जगज्जीवना;
तो बाळ होता पहिला,
मार्येच्या उरीं निजला,
आतां तो प्रभु जिवनी
कृपेचिया सिंहासनीं.

२ आलों, आलों, येशूचें नाम
स्तवावें हें उत्कृष्ट काम;
ख्रीस्ताची प्रीति दाखवूं,
अपूर्व कृपा कळवूं.
येउनी सोसी दंडभार,
पाप्यांचा साधिला उद्धार;
आकाशीं आह्मी जाउनी
प्रभूला स्तवूं मिळुनी;

दून आश्चर्य करतील,
हे गोड गाती, ह्मणतील.

---

132. PRAISE OF CHRIST. Ps. 117.
"O all ye nations, praise the Lord."

### १३२. ख्रीस्ताची स्तुति. स्तोत्र ११७.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ प्राणी मात्रांनो, गाजवा
ख्रीस्ताचें वंद्य नाम,
सर्व भाषांत कळवा
कृपेचें मोठें काम.
२ संपूर्ण जगीं ममता
तो दावी दयावान्,
अनंत त्याची सत्यता,
तो खरा भगवान्.

---

133. CHRIST A KING. Ps. 2.
"Now Christ ascends on high."

### १३३. ख्रीस्त राजा. स्तोत्र २.

S. M. ६, ८ अक्षरी.

१ ख्रीस्त हा चढला
बापाच्या जवळी,
दावुनी रक्त बोलला,
"दे पृथ्वी सगळी."
२ बापानें ऐकुनी
दिल्हा सर्वाधिकार,
ह्मणे, "जगाला जिंकुनी
तें कर ताबेदार."

---

134. JESUS THE LAMB OF GOD.
"Not all the blood of beasts."

### १३४. येशू देवाचा कोंकरा. यो० १: २९.

S. M. ६, ८ अक्षरी.

१ पशूनें यज्ञ फार
न देती शांतवन,

नेणें न सरे पापभार,
न जाई दुष्टपण.

२ देवाचा कोंकरा
हा पापें हरितो,
पसंत आहे ईश्वरा,
जगाला तारितो.

३ त्याच्या माथ्यावरी
मी हात ठेवितों,
घेऊनी पाप पदरीं
मी क्षमा मागतों.

४ त्वां मजकरितां
अत्यंत सोसिलें,
पापाचा दंड भरितां
त्वां मला खंडिलें.

५ तो दंड सरला,
यामुळें हर्षतों,
उद्धार मोठा साधिला,
ही कृपा स्तवितों.

---

135. Christ our Shepherd. Ps. 23.

"The Lord my Shepherd is."

### १३५. ख्रीस्त आमचा मेंढपाळ.

S. M. ६,८ अक्षरी.

१ दयाळू भगवान
तो माझा मेंढपाळ,
तो करी पूर्ण तृप्तिमान,
संभाळी सर्वकाळ.

२ तो मला चारितो
आकाशी कुरणीं,
जिवाला तोच पाजितो
तें पाणी जिवनी.

३ मी मार्ग सोडितां
तो पुन्हा आणितो,
मळा स्वनामाकरितां
सुमार्गी लावितो.

४ तो असतां आधार
जिवाला नाहीं भय,
मृत्यूचा पडतां अंधार
तो पुरता आश्रय.

---

136. Jesus our Shepherd.

### १३६. प्रिय मेंढपाळ.

6, 5. ६,५ अक्षरी.

१ कोंकरेच आम्ही,
येशू मेंढपाळ,
जवळी नेहमी
वारी दुःख हाल,
काळजी सोडुनी
टेंकू त्यावरी,
कुरणीं कीं रानीं
चालूं सत्वरी.

ध्रु० येशू प्रिय मेंढपाळ
करी प्रीति सर्वकाळ.

२ गोड त्याची वाणी,
ऐकूं तो स्वरें,
हर्ष होई मनीं
त्याच्या सुस्वरें.
चुकूं न देतांना
नित्य बोलावी,
प्रेमें करी मना,
मार्गी राहवी. ध्रु०

३ कोंकरां तो तारी
जीव देउनी,
त्यांला शुद्ध करी
रक्त लावुनी.
मरणाच्या खिंडीं
हातहि देणार,
कधीं त्यां न सोडी,
पोंचवील पार. ध्रु०

---

### 137. Christ our Refuge.

"My faith looks up to Thee."

### १३७. ख्रीस्त आमचा आश्रय.

6, 4. ६, ४ अक्षरी.

१ हे येशू कृपावान्,
तारका तेजवान्,
अति उदार;
ऐकावी प्रार्थना,
करावी करुणा,
दे भक्तिभावना,
तूं मला तार.

२ मला पवित्र कर,
सद्गुण मनीं भर,
दे प्रेमभाव;
तूं मजकरितां
त्या खांबीं मरतां
केली जी ममता
ती मला दाव.

३ विपत्ति येतां थोर
जिवाला वाटे घोर,
तों चालवी;
अरिष्ट तूं निवार,
संपूर्ण दुःखें सार,
जिवाला हो आधार,
तूं शांतवी.

४ आयुष्य सरतां
हा जीव मरतां
तूं हातीं धर;
त्या वेळीं हो आश्रय,
दूर करावें भय,
कृपेनें दे विजय,
घे मळा वर.

---

### 138. Hiding Place.

"Hail sovereign Love, that first began."

### १३८. पाप्यांचा सदाश्रय.

L. M. ८ अक्षरी.

१ देवाची स्तवा करुणा,
सांग उद्धारयोजना,
पाप्यांसीं होतां कृपामय
देवानें केला सदाश्रय.

२ मी मोठा पातकी अघोर,
देवासीं झालों हट्टखोर,
कठीण करितां हृदय
धिक्कारिला तो सदाश्रय.

३ पापानें व्याप्त असतां,
अंधार गोड मानितां,
कुमार्गीं चाललों निर्भय,
म्यां तुच्छ केला सदाश्रय.

४ तरी देवाची करुणा
ही मला बुडूं देईना,
जिवाला लागे दंडभय,
दिसेना मला सदाश्रय.

५ टाळाया क्रोध ईश्वरी
पळालों सिना डोंगरीं,
तों वाणी ऐकिली निर्दय,
"एथें न मिळे सदाश्रय."

६ त्यापुढें प्रभा दिसली,
आकाशवाणी ऐकिली,
"येशू हा तारितो निश्चय."
तो माझा झाला सदाश्रय.

---

### 139. Christ a Sure Friend.

"Poor weak and worthless though I am."

### १३९. ख्रीस्त अखंड मित्र.

L. M. ८ अक्षरी.

१ मी जरी नीच, दुबळा,
निरुपयोगी, दैन्यवान,

श्रीमंत मित्र मजला,
तो येशू सर्वशक्तिमान.

२ येशूनें जीव देउनी
माझ्या जिवाला खंडिलें,
बहकतांना पाहुनी
स्वकळपांत घेतलें.

३ परी हे सर्व उपकार
म्या तुच्छ करुनिया, जाण,
उलट केले अपकार,
मी कसा मित्र बेइमान.

४ तो मजला बोलावूनी
ह्मणे, "तूं माग, मी देईन,"
परी ते कष्ट मानुनी
मी दूर राहीं प्रेमहीन.

५ म्या दुष्ट जगानें खनां
येशूची लाज धरिली,
जनांची स्तुती चाहतां
येशूची आज्ञा मोडिली.

६ खरा मी दुष्ट लज्जमान
कीं त्याला असें फेडिलें,
तो खरा देव कृपावान
कीं मला न धिक्कारिलें.

---

140. JESUS, OUR FRIEND.

"What a Friend we have in Jesus."

## १४०. येशू मित्र.

8. 7. ८, ७ अक्षरी.

१ कोण मित्र येशूवाणी.
आमचें ओझें वाहाया !
सर्व दु:खें तो ऐकुनी
साह्य करी सोसाया.
कधीं त्याकडे न जातां,
आह्मी अवमानितों,
मनशांति हरवितां,
किती शोक करितों,

२ मोह असले कीं चिंता,
कांहीं झालें त्रासाया,
धैर्य न सोडुनी देतां,
जा प्रभुला सांगाया.
आह्मां दुबळ्यां तो पाहे,
मनोवृत्ती जाणतो,
जसा प्रिय मित्र आहे,
हात द्याया इच्छितो.

३ जरी कष्टीं भागलेले,
खांद भारी वाहाया,
त्यालाहि उपाय केले,
जा प्रभूला सांगाया.
जरी मित्र तुच्छ मानी,
जा प्रभूला सांगाया,
सखा तोचि सर्वांहुनी,
सिद्ध अंगीकाराया.

---

141. CHRIST, OUR HELPER.

"I lay my sins on Jesus."

## १४१. ख्रीस्तावर भार.

8, 7. ८, ७ अक्षरी.

१ मी प्रभु ख्रीस्तावरी
पापाचा टाकीं भार,
तो मला मुक्त करी,
मजसाठीं वाहणार.
मी आणीं ख्रीस्तापासीं
अन्याय सगळे,
तों त्यानें खोडायासीं
स्वरक्त लाविलें.

२ ख्रीस्ताकडे मी येईं
गरजा सांगाया,
तो मला तृप्ति देई,
संपत्ति सर्व त्या.
त्यापासीं आणीं चिंता,
व दु:खें मनस्वी,

तो समदु:खी होता
मनाला शांतवी.

3 मी ख्रीस्तापरी व्हावें
सद्गुण भरूनी,
मी मुलसें ठरावें,
बापाला मानुनी.
त्यापासीं मी राहावें
आकाशीं जाउनी,
तें ख्रीस्तनाम गावें
दुतांसीं मिळुनी.

---

142. THE COMPASSIONATE FRIEND.

## १४२. मायाळू मित्र.

Peculiar. निराळा प्रकार.

१ प्रिय प्रभु मित्र कसा!
अति मायाळ!
सखा भाऊ नाहीं तसा,
अति मयाळ!
अन्य मित्र फसविती
विपत्काळीं दगा देती,
ख्रीस्त सदा करी प्रीति,
अति मायाळ!

२ त्याची प्रीति तुह्मी जाणा,
मायाळू तो!
मोठ्या प्रेमें त्याला माना,
मायाळू तो!
पापें तो नाहींसीं करी,
सर्व संकटें निवारी,
भक्तां मोठ्या प्रेमें तारी,
अति मायाळ!

3 त्या प्रभूची प्रीति करा,
मायाळू तो!
सदा त्याचे पाय धरा,
मायाळू तो!
भय टाकुनीया यावें,
त्याचें जूं आनंदें घ्यावें,
त्याच्या पाठीमागें यावें,
मायाळू तो!

४ प्रभुपासीं क्षमा मागा,
मायाळू तो!
संकटें हीं त्याला सांगा,
मायाळू तो!
मोठे आशीर्वाद देई,
सौम्य हातें वाटे नेई,
शेवटीं आकाशीं घेई,
अति मायाळ!

---

143. CHRIST, THE BEST FRIEND.

"One there is above all others."

## १४३. ख्रीस्त पापी लोकांचा मित्र.

8. 7. ८, ७ अक्षरी.

१ पाहा, येशू मित्र कसा!
सर्वांपेक्षां ममताळ,
सखा भाऊ नाहीं तसा,
प्रीति करी सर्वकाळ.
आह्मा पाप्यां तारायाला
कोणी मित्र मरे काय?
ख्रीस्तें अर्पूनी जिवाला
केला पुरता उपाय.

२ तो जगांत तुच्छ केला,
दीनबंधु त्याचें नांव,
आतां आकाशांत गेला,
तरी त्याचा तोच भाव.
तो भक्तांचे ऐकतांना
त्यांला देतो पूर्णाधार,
संकटांत पाहतांना
प्रेमें करितो उद्धार.

3 प्रभू, जसा प्रेमा व्हावा
तसा आमचा वाढवी,

आम्ही कां हो विसरावा
येशू मित्र गौरवी?
आकाशांत जेव्हां जाऊं,
तेव्हां न विसरणार,
तुझी कृपा तेथें गाऊं,
सर्वकाळ स्तवूं फार.

---

144. CHRIST, THE BEST FRIEND.

## १४४. प्रेमळ मित्र. रोमे. ५:६-८.

Hindu M. गजल.
(काफी-मांझ, एका.)

ध्रु० पाहा येशू मित्र कसा!
सर्वांपेक्षां ममताळ.

१ पापी जन तारायासी
खालीं तो उतरला,
धनी सृष्टीचा असतां
गव्हाणींत निजला. ध्रु०

२ आशीर्वाद घ्यायासाठीं
लोक बाळा आणिती,
शिष्य धिक्कारितां पाही,
निषेधिलें त्यांप्रति. ध्रु०

३ मार्था, मार्या यांचा भाऊ
लाजारस जें मेला,
दुःखी होउनियां तेव्हां
कण्हूनीयां रडला. ध्रु०

४ शिष्य नम्र होण्यासाठीं
पाय त्यांचे धुतले,
रुमालानें पुसुनियां
उदाहरण दाविलें. ध्रु०

५ पाप्यांसाठीं दुःख निंदा,
पाठलाग सोसीला,
खिळे, भाला साहुनीयां
प्राण त्यानें सोडीला. ध्रु०

६ आतां आकाशीं असूनी
करितोहि रदबदली,
आम्ही लवकर फिरावें,
किती वेळ हो दिल्ही. ध्रु०

---

145. CHRIST, THE BEST FRIEND.

## १४५. ख्रीस्त मैत्रीचें आगत्य.

Hindu M. पद. (धनश्री, एका.)

ध्रु० प्रभु हा प्रिय तूं जोडुनि ठेव.

१ सुख दुःखाला, अडत्या वेळीं,
कामिं पडे ही ठेव. ध्रु०

२ पापमुळा तो नाहींसें करि,
परम पराक्रमि देव. ध्रु०

३ ह्या मित्रानें, स्वरक्त पाडुनि,
केलें तारण जेव. ध्रु०

४ मृत्युखिंडींतुनि नेऊनियां,
दाविल तुज तें पेव. ध्रु०

---

146. CHRIST MY BELOVED.

## १४६. प्रिय वल्लभ. शल०५:१६.

Hindu M. पद. (जोगी, एका.)

ध्रु० माझा वल्लभ पाहा हाच,
किती हो ममताळू.

१ होतें भडकत रानोरान,
ग्रासित होता मज सैतान,
प्रीयें लगबग धावुनि जाण,
देउनि प्राण सोडविलें. ध्रु०

२ आणिलें पोटीं धरुनि घरांत,
मूर्च्छित पाहुनि रडला कांत,
धुउनि जखमा त्या समयांत
फिरवी हात मजवरतीं. ध्रु०

३ शुद्धी आल्यावर मज, कांत
स्नानहि घाली स्वरुधीरांत,
घेउनि आत्मिक वज्रि हातांत,
आतोनात मळ काढी. ध्रु०
तारणवस्त्रें झांकुनि अंग,
फेडुनि जन्माचाही पांग,

मजविण लागे कैसा थांग!
ह्मणतो सांग ममप्रीये. ध्रु०

५ प्रियाठायीं ठेविन भाव,
मी ना घेईन दुसरें नांव
अक्षय जीवनि देइल ठाव,
ख्रीस्तच राव, मजलागीं. ध्रु०

---

147. THE SWEETEST NAME.

**१४७. सर्वांपेक्षां गोड नाम.**

Peculiar.- निराळा प्रकार.

१ जगांत प्रभु जन्मला
ते वेळीं नाम दिलें,
त्या अर्थीं कष्ट सोसिला
व त्राण साधियेलें.

ध्रु० ह्मणून गा. गाऊं लागा.
ह्मणा "सुवंद्य येशू."
गोड ध्वनि त्रिभुवनीं,
त्याहुनी गोड "येशू."

२ तें नाम खांबींहि देतां
वरती लिहविलें,
कीं मानवांस, पाहतां,
अत्यंत प्रेम मिळे. ध्रु०

३ आतां राजासनावरीं
तेजांत बसलेला,
तें नाम शोभतें तरी,
उद्धार पुर्ण केला. ध्रु०

---

148. BELIEF.

"I do believe, I now believe."

**१४८. भाव.**

C. M. ८, ६ अक्षरी.

१ येशू हें नाम आवडे;
तें भय वारितें.
तें गोड, प्रिय केवढें!
तें शांत करितें.

ध्रु० येशूने मला तारिलें,
असें विश्वासलों;
स्वर्क्के त्यानें खंडिलें;
मी मुक्ति पावलों.

२ येशू आकाश सोडुनी
खालीं उतरला;
अशक्तपणा सोसुनी
दावी कळवळा. ध्रु०

३ येशू मध्यस्थी करितां,
दुष्टांच्या बदली,
जीं कधीं न वर्णवतां
तीं दुःखें साहिलीं. ध्रु०

४ येशूने मृत्यु जिंकुनी
देहाला धरिलें;
तो आह्मांहि उठवुनी
करील मोकळें. ध्रु०

---

149. PRAISE OF CHRIST.

"Come thou Fount of every blessing."

**१४९. ख्रीस्ताची स्तुति.**

8, 7. ८, ७ अक्षरी.

१ तुझा स्तव करूं द्यावा,
हे सुखाच्या उगमा,
वर्णायाला सुचवावा
तुझा कृपामहिमा.
जसे दूत वाढविती
तुझी कीर्ति गौरवीं,
तसी मला देवप्रीति
वंदायाला शिकवी.

२ मला भ्रष्ट पाहुनिया
प्रभु ख्रीस्तें शोधिलें,
तारायाला योजुनिया
आपलें रक्त दिधलें.
देवा, तुझ्या प्रेरणेनें
सुखी आलों एथवर,

तुझ्या मोठ्या करुणेने
मला पोंचवावें वर.

3 रोज मार्गी चालायाला
तुझें साह्य लागतें,
माझ्या अंत:करणाला
प्रेमें ओढ वरतें.
मार्ग सोडूं न देतांना
माझें मन स्थिरावी,
मला शिक्षा मारितांना
तुझा असा ठरवी.

---

150. Seeking Christ.

## १५०. ख्रीस्ताला शरण जाणें.

6, 4. ६, ४ अक्षरी.

१ याहो पापी भ्रष्ट,
जे दुष्कर्मी नष्ट,
ख्रीस्त प्रभु श्रेष्ठ
तुह्मा तारी;
आहे शक्तिमंत,
मोठा दयावंत,
क्लेशी जे अत्यंत
त्यां उद्धारी.

२ होता तो आकाशीं,
सूर्यवत् प्रकाशी,
ताराया जनासीं
खालीं आला;
देह धरूनिया,
दु:खें सोसुनिया,
जीव अर्पुनिया,
दंड दिल्हा.

3 वधस्तंभीं गेला,
पाप्यांसाठीं मेला,
बेत सिद्धी नेला,
तारण्याचा;
झाला हो जीवंत,
ठरे भगवंत,

गाजवूं अत्यंत
प्रेमा त्याचा.

४ त्याजपासीं यावें,
पाप पत्करावें,
त्याला मान्य व्हावें,
द्या उद्धार;
तो तुह्माला घेई,
दिव्य सुख देई,
अंतीं तोच नेई
वरतें पार.

---

151. Astonishing Mercy.

"Depth of mercy," &c.

## १५१. थोर कृपा.

7s. ७ अक्षरी.

१ ख्रीस्त कृपेचा उपाय
मजसाठीं आहे काय?
देवा राग सोडवेल?
मज पाप्या तारवेल?

ध्रु० थोर कृपा ही, अपार,
मज पाप्या तारणार,
मज पाप्या येशू तारणार.

२ किती मी अव्हेरिलें,
कितीदां चिडविलें,
त्याची आज्ञा ऐकेना,
दु:ख देतां राहीना. ध्रु०

3 आतां शोक अंतरीं
कीं मी असा फितूरी,
जावो गोडी पापाची,
आशा लागे कृपेची. ध्रु०

४ बाप कळवळतो.
माझा खेद पाहतो,
ह्मणे "कसें टाकूं या,"
मान्य होई ताराया. ध्रु०

५ ख्रीस्त उभा राहतो,
हात कूस दाविनो,

त्याची प्रीति कळली,
कृपा अनुभवली. ध्रु०

---

152. Praise of the Saviour.

१५२. ख्रीस्ताची स्तुति.

6, 4. ६, ४ अक्षरी.

१ हे प्रभु तेजवान्,
अनंत शक्तिमान्,
स्तवीन नांव;
सद्गुरु माझा तो,
संभाळ करितो,
कृपेने तारितो,
त्या ठायीं भाव.

२ हे येशू ईश्वरा,
हे दयासागरा,
प्रिय अपार;
त्वां प्राण दिधला,
फिरुनी धरिला,
उद्धार साधिला,
तूं मला तार.

३ भावानो, सोडा घोर,
कैवारी अति थोर,
तो ख्रीस्त, जाण;
आज्ञाला चालवी,
सामर्थ्य पुरवी,
तो राजा गौरवी.
करा हो मान.

४ पाप्यानो, परता,
का तुह्मी मरतां?
सुबोध घ्या;
शरण जाइजे,
येशूला धरिजे,
उद्धार घेईजे,
या, आतां या.

---

153. Praise to Christ.

"Come all ye saints of God."

१५३. ख्रीस्ताची स्तुति.

6, 4. ६, ४ अक्षरी.

१ भक्तांनो, सिद्ध व्हा,
सर्वत्र गाजवा
येशूचें काम;
वर्णा हो ममता,
वाखाणा सत्यता,
मोठ्याने स्तविता
गा ख्रीस्तनाम.

२ सोडावा सर्व घोर,
करावा हर्ष थोर,
झाला निभाव;
स्तवा हो ईश्वरा,
वाणा परात्परा,
सुवंद्य कोंकरा,
गा त्याचें नांव.

३ येशूला वरतीं,
अखंड वंदिती,
मोठा उत्साव;
अह्मीहि जाउनी,
येशूच्या आसनीं
कृपेने बसुनी,
वाखाणूं नांव.

---

154. Love to Christ. 1. Pet. 1: 8.

"Not with our mortal eyes."

१५४. ख्रीस्तावर प्रीति.

१ पेत्र १:८.

S. M. ६, ८ अक्षरी.

१ या चर्मनयनीं
प्रभू न पाहिला,
तथापि नांव ऐकुनी
संतोष भरला.

२ जिवाचा तारिता
एथें न दिसतो,

तथापि भाव ठेवितां
अत्यंत हर्षतो.

३ प्रभूची प्रीति फार,
हीं अनुभवितां,
संतोष वाढे अनिवार
सत्सुख भोगितां.

---

155. Praise of Christ.

**१५५. ख्रीस्ताची स्तुति.**

6, 4. ६, ४ अक्षरी.

१ हे देवाच्या पुत्रा,
पतितांच्या मित्रा,
आह्मा दंडपात्रां
देसी मुक्ती;
धन्य धन्य ह्मणूं,
तुझी कृपा वर्णूं,
महिमा वाखाणूं
यथाशक्ति.

२ पापदंड घेतां
आपलीया माथां,
वधस्तंभीं जातां
टांगलासी;
हातां पायांतुनी
रक्त ओघळुनी
प्राण त्वां टाकुनी
दिधलासी.

३ दूत तुला गाती,
कर्मे वर्णिताती,
नित्य स्तवितात,
तुझी प्रीति;
तोंड झांकुनिया,
तुला नमुनिया,
वंद्य ह्मणुनिया
मान देती.

४ तुझ्या येण्या आदीं
जे भविष्यवादी,
आतां ते आल्हादीं,
स्तविताती;
भाका पूर्ण झाल्या,
काहीं न गळाल्या,
असें तारलेल्यां
सांगताती.

५ तुझ्या प्रेषितांची
व सुवार्तिकांची
मंडळी, प्रेमाचीं
गीतें गाती;
तुझ्या साठीं मेले,
साधु वधलेले,
वस्त्रें पोंचलेले,
वंदिताती.

६ जगीं तुझे भक्त
भजनीं आसक्त,
तुझें प्रिय रक्त
गाती फार;
कोंकरा देवाचा,
राजा तूं जगाचा,
आह्मा पतितांचा
हो आधार.

---

156. Worthy the Lamb. Rev. 5: 12.

"Glory to God on high."

**१५६. कोंकरा योग्य. प्रग० ५:१२.**

6, 4. ६,४ अक्षरी.

१ देवाला स्तवा फार,
वर्णा हो उपकार,
गा ईश्वरा;
नमा ख्रिस्तासमोर,
भरला दंड घोर,
त्रिलोकीं वंद्य थोर
तो कोंकरा.

२ सर्वांनो, खालीं वर,
काढा हो उंच स्वर,

गा ईश्वरा;
रक्तानें मोलवान
उद्धार झाला, जाण,
त्रिलोकीं स्तुतिमान
तो कोंकरा.

3 आकाशीं स्तवितां
वाखाणूं ममता,
हे ईश्वरा;
येशू सुवंद्य फार,
अनंत अधिकार
त्रिलोकीं करणार
तो कोंकरा.

---

157. CHRIST A SAVIOUR.

"Let saints on earth their anthems raise."

## १५७. ख्रीस्त तारणारा आहे.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ भक्तानो, या प्रभूसमोर,
प्रेमानें गा उद्धार,
ख्रीस्ताची वर्णा कृपा थोर,
तो प्रिय तारणार.

२ आकाश त्यानें सोडिलें
धराया अवतार,
अमोल्य रक्त ओतिलें,
तो प्रिय तारणार.

3 सर्व प्रसंगीं धरा भाव,
तो करितो कैवार,
प्रभूचें ध्या सुवंद्य नांव,
तो प्रिय तारणार.

४ तूर्त टाळुनी पाप घोर
आकाशीं जाऊं पार,
तेव्हां भेटेल मित्र थोर,
तो प्रिय तारणार.

---

# III. INFLUENCES OF THE SPIRIT.

# ३. पवित्र आत्म्याच्या प्रेरणा.

158. REGENERATION BY THE SPIRIT.

## १५८. आत्म्याकडून पुनर्जन्म होणें.

यो० १: १3.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ मनुष्य साधनें करून
कोणी न तरणार,
सुकुळीं जन्मल्यावरून
न मिळे जीवोद्धार.

२ आम्हाला देव कृपावान
स्वपुत्र ठरवी,
तो आपल्या इच्छेनें, जाण,
फिरूनी जन्मवी.

3 सदात्मा वाऱ्यासारिखा
मनांत शिरतो,
तो फिरवुनी देहिकां
अति सुधारितो.

४ त्या प्रेरणेनें चेतुनी
जीवात्मे उठतात,
तों दिव्य सुख पावुनी
देवाला स्तवितात.

---

159. PRAYER FOR THE SPIRIT.

" Come, Holy Spirit, Heavenly Dove."

## १५९. पवित्र आत्मा मागणें.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ पवित्र आत्म्या, आतां ये,
आम्हाला जीववी,
तूं आम्हा संसाऱ्यांमध्यें
सत्प्रीति चेतवी.

२ विषयसुखीं बुडतां
जीवात्मे गुंतले,
देवाकडे न पाहतां
पापांत हतले.

३ देवाची भक्ति अर्चना
श्रमानें उर्कितों,
बापाची स्तुति प्रार्थना
निरर्थ घोकितों.

४ हे प्रभू, असें मरतां
नेहमी राहूं काय?
अनंत तुझी ममता
व आमची तीळप्राय.

५. पवित्र आत्म्या, आतां ये,
मृतांस जीववीं,
तूं आमचीं जड हृदयें
प्रीतिनें चेतवीं.

---

160. Prayer for the Spirit.

"Gracious Spirit, Love divine."

## १६०. पवित्र आत्मा मागणें.

7s. ७ अक्षरी.

१ हे सदात्म्या, तूं दयाळ,
मजमध्यें शक्ति घाल,
पापें भयें दूर कर,
प्रीति माझ्या मनीं भर.

२ ख्रीस्तकृपा दाखवीं,
माझें ओझें घालवीं,
ख्रीस्तरक्तें धुउनी
राहा अंत:करणीं.

३ दे तूं जीवनाचें दान,
कर माझें समाधान,
मला तुझा शिक्का मार,
तूं मुक्तीचा हो विसार.

४ सुमार्गांत चालवीं,
सर्व भ्रांति घालवीं,
दिव्य हर्ष मनीं भर,
मला राख जन्मवर.

---

161. Prayer for the Spirit.

"Come, gracious Spirit, Heavenly Dove."

## १६१. पवित्र आत्मा मागणें.

L. M. ८ अक्षरी.

१ कृपाळू आत्म्या, तूं उतर,
आह्मामध्यें प्रकाश कर,
सत्कृपा देतां सर्वकाळ,
तूं कर पूर्ण प्रतिपाळ.

२ सुमार्गीं सदा चालवीं,
पापाचे पाश चुकवीं,
शास्त्राचा अर्थ समजाव,
सदाचाराचे नेम दाव.

३ प्रकाश देतां सर्वकाळ
सद्बुद्धी हृदयांत घाल,
उद्भवूं दे देवाचें भय,
पापाचा द्वेष अतिशय.

४ मनाला तूं सुधारुनी
राहा हो अंत:करणीं,
ख्रीस्ताकडे आह्माला ने,
दाखीव त्याचीं कुरणें.

५ देवाकडे पोंचवितां
दर्शिव त्याची ममता,
आकाशी सुख गौरवी
आह्माला वर पाववी.

---

162. Operations of the Spirit.

"Eternal Spirit, we confess."

## १६२. पवित्र आत्म्याच्या प्रेरणा.

L. M. ८ अक्षरी.

१ सदात्म्या, तुझी कृपा थोर,
ती वर्णूं अवघ्यांसमोर.
पुत्र व बाप यांपासून
तूं क्षेम आणिसी वरून.

२ तुझा उजेड पडतो
तेव्हां अंधार हटतो,
तूं दाविसी पाप्याला भय,
तूं कळविसी सदाश्रय.

३ तूं करितांना प्रेरणा
जातात दुष्ट भावना,
पापाची सत्ता मोडती,
संपूर्ण बुद्धि फिरती.

४ तूं बोलतांना दुःखितां
आनंद होतो तुरता,
क्षणांत वारे शमती,
लहरा शांत राहती.

---

163. PRAYER FOR THE SPIRIT.

"Come, Holy Spirit, come."

**१६३. पवित्र आत्मा मागणें.**

S. M. ६,८ अक्षरी.

१ पवित्र आत्म्या, ये,
प्रकाश दाखवी,
आम्हा दिनांचीं हृदयें
कृपेनें शांतवी.

२ स्वपापें आठवून
आम्ही रडावें फार,
तों ख्रीस्तरक्त दाखवून
हे आत्म्या, दे उद्धार.

३ विश्वास चेतवी,
संदेह दूर कर,
आम्हामध्यें तूं पेटवी
ती प्रीति जी अमर.

४ दुर्भाव काढुनी
मनाला तूं सुधार,
संपूर्ण नवें करूनी,
हे आत्म्या, दे उद्धार.

५ तूं मुक्ति द्यावयास
आम्हांत वस्ती कर,
तों बाप, पुत्र, आत्मा, यास
वाखाणूं जन्मभर.

---

164. PRAYER FOR THE SPIRIT.

"Holy Ghost, with light divine."

**१६४. पवित्र आत्मा मागणें.**

7s. ७ अक्षरी.

१ हे सदात्म्या, ये सत्वर,
माझ्या मनीं तेज भर,
दुःखें भयें तूं निवार,
घालवी पापांधकार.

२ ख्रीस्तमुख पाहवी,
त्याची शोभा दाखवी,
त्याचीं गुणें मला दाव,
त्याचें रक्त मला लाव.

३ हे सदात्म्या परात्पर,
माझें मन शुद्ध कर;
पाप होई केंव्हां
माझ्या अंतरीं प्रबळ?

४ हे सदात्म्या गौरवी,
माझें दुःख शांतवी,
पापरोग तूं निवार,
तूंच माझा हो आधार.

५ हे सदात्म्या ईश्वरी,
राहा माझ्या अंतरीं,
घालवी दुर्बुद्धि घोर.
तूंच माझा राजा थोर.

---

165. PRAYER FOR THE SPIRIT.

"O Lord, thy weary churches wait."

**१६५. पवित्र आत्मा मागणें.**

C. M. ८,६ अक्षरी.

१ हे देवा, तूं दयाळू फार,
सदात्मा पाठवी,
मनुष्य नाश पावणार
हें त्यांस पटवी.

२ पाप्यांस दे सत्प्रेरणा,
तेव्हां ते फिरतील,
भरूनी भक्तिभावना
ते तुला वंदितील.

---

166. PRAYER FOR THE SPIRIT.

"Come, sacred Spirit, from above."

### १६६. पवित्र आत्मा मागणें.

L. M. ८ अक्षरी.

१ पवित्र आत्म्या तूं उतर,
पाप्यांच्या ठायीं प्रीति भर,
धिटांचें मन नमवी,
ईश्वरी शक्ति दाखवी.

२ तूं त्यांस देतां प्रेरणा
लागेल भक्तिभावना,
जे आतां करिती धिक्कार
ते मागतील जीवोद्धार.

३ बहूत पापी फिरूनी
येतील देवसदनीं,
प्रभुला प्राण अर्पितां
वर्णीत त्याची ममता.

---

167. GRIEVE NOT THE SPIRIT.

"Quench not the Spirit of the Lord"

### १६७. सदात्म्याला खेद देऊं नको.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ सदात्मा नको घालवूं,
कृपेचा आत्मा तो,
तयाला नको विझवूं,
तो शुद्ध करितो.

२ सदात्मा नको घालवूं,
मिळेनत सर्वकाळें,
तयाला नको चिडवूं,
हे पाप्या, तूं संभाळ.

३ सदात्मा नको घालवूं,
घे त्याची सूचना,
तयाला नको दुखवूं,
बाळग प्रेरणा.

४ सदात्मा नका घालवूं,
भक्तांनो, तुह्मी भ्या,
तयाला नका त्रासवूं,
प्रेमानें मान द्या.

---

168. PRAYER FOR THE SPIRIT.

"Great Father of each perfect gift."

### १६८. पवित्र आत्मा मागणें.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ हे बापा, सर्वदा उदार
तूं देसी श्रेष्ठदान,
आह्माला आस्था आहे फार,
तूं कर समाधान.

२ पवित्र आत्मा धाडुनी
आमच्या मनांत घाल,
प्रकाश तोच पाडुनी
प्रीतिचा लावो जाळ.

३ आकाशसुख पाववून
तो राहो अंतरीं,
देवाचे पुत्र ठरवून
तो देवो खातरी.

---

169. THE SPIRIT ENTREATED.

"Stay, thou insulted Spirit, stay."

### १६९. आत्मा राहावा, असें मागणें.

L. M. ८ अक्षरी.

१ उदार आत्म्या, दया कर,
तूं माझ्या ठायीं वस्ती भर,
म्या जरी केली हेळणा,
तूं काढूं नको प्रेरणा.

२ मी मोठा घोर पातकी,
खरा विश्वासघातकी,
हजारों पावें उपकार,
हजारों केलेहि धिक्कार.

३ तरी तूं नको घालवूं,
मजला नको बुडवूं,
तूं सत्य न्याय करितां
मी नाश पावें सर्वथा.

४ उदार आत्म्या, क्षमा कर,
तूं माझीं पापें दुःखें हर,
ख्रीस्ताची प्रीति दाखवीं,
तेणें मनाला शांतवी.

---

170. The Spirit entreated.
"O Lord, and shall our fainting souls."

## १७०. सदात्मा परत यावा.

L. M. ८ अक्षरी.

१ हे देवा, आम्ही दैन्यवान्,
सदात्मा आतां मागतों,
आम्हीच केला अपमान,
यामुळें तो दुरावतो.

२ हे आत्म्या, कृपें परतून
आम्हा दिनांला शांतवी,
मनांत सत्ता चालवून,
सुभावना तूं चेतवी.

३ आम्हांत तुम्हा भर स्थान,
तें तुझें होवो सर्वकाळ,
आम्हाला देतां कृपादान
तूं नित्य कर प्रतिपाळ.

---

171. Influences of the Spirit.
"As when in silence vernal showers."

## १७१. पवित्र आत्म्याच्या प्रेरणा.

L. M. ८ अक्षरी.

१ सुवेळीं वृष्टि पडतां
तेव्हां अंकुर फुटतां,
तसी आत्म्याची प्रेरणा
मनाला करी चेतना.

२ वृष्टीच्या योगें हिरवळ
व फुलें दिसती सोज्वळ,
तसें सदात्मा याकडून
मनीं उमटती सद्गुण.

३ हे देवा, कृपा दाखवीं,
जगाला आत्मा पुरवी,
सर्वांला दे सत्प्रेरणा,
मृतांस होवो चेतना.

४ तेणें हें ओसाडीचें स्थान
त्वरित होई आबादान,
हें सर्व जग नासकें
होई आकाशासारिखें.

---

172. Prayer for the Spirit.
"Come, divine and peaceful Guest."

## १७२. पवित्र आत्मा मागणें.

7s. ७ अक्षरी.

१ हे सदात्म्या, आतां ये,
राहा प्रत्येकामध्यें,
अवघ्यांला चेतवी,
खरी प्रीति पेटवी.

२ पापें दुःखें दूर कर,
आम्हामध्यें शांति भर,
तेणें हर्ष करूं फार,
प्रीति वाढो अनिवार.

---

173. Influences of the Spirit.
"Sure the blest Comforter is nigh."

## १७३. पवित्र आत्म्याच्या प्रेरणा.

L. M. ८ अक्षरीं.

१ सदात्मा कितीं हो सहाय !
तो माझा आहे पूर्णाधार;
तो नसतां मी करूं काय?
मनांत पडतो अंधार.

२ तो देवप्रीति दावितो,
कृपेचा देतो अनुभव,
मनांत शांति भरितो,
दिव्य सुखाची देतो चव.

3 दयाळू देवा, दया कर,
आत्म्याचा मला दे आधार,
तेणें मनांत हर्ष भर,
मुक्तीचा पुरे तो विसार.

---

174. The Spirit grieved by Strife.
"The Spirit like a peaceful dove."

### १७४. सदात्म्याला भांडण सोसत नाहीं.

L. M. ८ अक्षरी.

१ सदात्मा शांत आहे फार,
सौम्य खबुत्रावाणी, जाण,
कोल्हाळ नाहीं सोसणार,
आवडतें शांतीचें स्थान.
२ भक्तानो, त्याला बाळगा,
भांडुनी नका देऊं खेद,
आवेश टाका अवघा,
परस्परांसीं नसो भेद.
3 भावांची करा ममता,
तुह्मी सर्वांसीं व्हा मायाळ,
कां तसा ख्रीस्ताकरितां
आह्मांसीं देवहि दयाळ.

---

175. Fruits of the Spirit.

### १७५. सदात्म्याचीं फळें.

गाल. ५: २२.

S. M. ६, ८ अक्षरी.

१ सदात्मा बाळगून
जो नित्य चालतो,
तोच सर्वस्वीं पालटून
सुभक्त ठरतो.
२ आत्म्याचीं फळें हीं,
सत्प्रीति, नम्रता,
आनंद, दया, क्षमाहि,
विश्वास, सत्यता.
3 हे श्रेष्ठ हो सद्गुण
ज्या ठायीं राहती,
तो ईश्वराला ओळखून
जाईल वरतीं.

---

176. The Spirit's Work.
"'Tis God the Spirit leads."

### १७६. आत्म्याची प्रेरणा.

फिल. २: १३.

S. M. ६, ८ अक्षरी.

१ सदात्मा हा आह्मास
सुमार्गीं चाळवी,
कर्त्तव्य जें तें करण्यास
तो शक्ति पुरवी.
२ तो नित्य प्रेरितां
आह्मी न थकतों,
आकाशीं चित्त लावितां
सदाशा धरितों.
3 इच्छा व करणें
दोन्ही तो करवी,
आत्म्याचीं करा स्तवनें,
गा नाम गौरवी.

---

177. The Witnessing Spirit.
"Why should the children of a King."

### १७७. सदात्मा शिक्का मारितो.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ पवित्र आत्मा दयावान
ज्या ठायीं राहतो,
तो खरा भक्त आहे, जाण,
उद्धार पावतो.
२ सदात्मा वस्ती करितो
भक्तांच्या अंतरीं,
तो त्यांला शिक्का मारितो,
ते पुत्र ईश्वरी.
3 हे आत्म्या, मला पटवी
कीं क्षमा पावलों,
प्रमाण तूंच पुरवी
कीं पुन्हां जन्मलों.

४ तूं माझ्या ठायीं राहुनी
मुक्तीचा दे विसार,
स्वरक्तें वर नेउनी
पावीव पूर्णोद्धार.

---

178. THE SPIRIT GRIEVED.
"Say, sinner, hath a voice within."

### १७८. आत्मा सदा यत्न करणार नाहीं.

L. M. ८ अक्षरी.

१ हे पाप्या, असी सूचना
मनात कधीं आली काय,
"सोडावी पापयोजना,
धरावे ईश्वराचे पाय ?"
२ ती जाण वाणी ईश्वरी,
सदात्मा तुला बोलला;
कीं यावें सुमार्गावरी,
त्वां ख्रीस्त ध्यावा आपला.
3 अव्हेरूं नको सूचना,
तूं आतां बोध घे, संभाळ,
सदा न होई करुणा,
न मिळे कृपा सर्वकाळ.
४ सदात्मा कठिणाला, जाण,
अखंड नाहीं ओढणार;
तूं करूं नको अपमान,
कदाचित् तुला सोडणार.
५ हे पाप्या रे, सदात्म्यास
तूं मान्य हो या दिवसीं,
कां त्याला खेद दिधल्यास
तूं नाश कसा टाळसी?

---

179. PRAYER FOR THE SPIRIT.
"O Thou that hearest prayer."

### १७९. पवित्र आत्मा मागणें.

H. M. ६, ६, ८ अक्षरी.

१ हे बापा दयावान
जो ऐके प्रार्थना,
त्वां आतां द्यावे कान,
करावी करुणा.
स्ववचनें तूं आठवी.
सदात्मा खालीं पाठवी.
२ मुलांचीं मागणीं
मनुष्य ऐकती;
त्यां प्रिय मानुनी
संतुष्ट करिती.
तसा तूं आमचें ऐकतां
आतां दाखीव ममता.
३ हे बापा, तूं दयाळ,
सदात्मा ईश्वरी
आह्मांत आतां घाल,
तो राहो अंतरीं.
सर्वांस होवो भक्तिभाव,
तेव्हां वाखाणूं तुझें नाव.
४ आत्म्याची प्रेरणा
लागोच सर्वकाळ,
तो देतां चेतना
प्रीतिचा लावो जाळ.
तूं घालवी पापांधकार,
आह्मा मृतांस दे उद्धार.

---

180. PRAYER FOR THE SPIRIT.
"Sovereign of worlds above."

### १८०. पवित्र आत्मा मागणें.

H. M. ६, ६, ८ अक्षरी.

१ हे थोर भगवान्,
हे बापा गौरवी,
अनंत शक्तिमान्,
तूं कृपा दाखवी.
भविष्यवाक्यें पूर्ण कर,
सदात्मा दे, जनां उद्धर.
२ तुला दिगंतरीं
त्वरित भजतील,

सर्वत्र सत्वरी
ख्रीस्ताला नमतील.
हे देवा, शक्ति आतां दाव,
सर्व वंदोत तुझें नांव.

---

# IV. HORTATORY HYMNS.

# ४. बोधप्रद गीतें.

181. GOSPEL INVITATION.

"Let every mortal ear attend."

## १८१. पाप्यांस बोलावणें.

यशा. ५५:१.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ सर्व जनानो, तुह्मी या,
ऐका बोलावणें,
संपूर्ण नष्ट पापियां
हीं देववचनें.

२ "भुकेले हो, कां भटकून
हिंडतां निरुपाय?
विषयसुखें यांकडून
तृप्ति होईल काय?

३ देवानें तुह्मांकरितां
पुरवलें मिष्टान्न,
त्यापासीं आतां मागतां
घ्या अन्न जीववान.

४ तान्हेले हो, कां भ्रमुनी
प्राणाला मुकतां?
जगिक सुख शोधुनी
जीवन टाकितां.

५ ख्रीस्ताच्या ठायीं पाणी फार,
नदी हो वाहती,
त्या पासीं मागतां उद्धार,
सत्कृपा मिळती.

६ काहींच मोल न देऊन
दूध व मध्र घ्या,
फुकटवारी तीं घेऊन
यथेच्छ तुह्मी प्या.

---

182. SINNERS ENTREATED.

"Sinners, the voice of God regard."

## १८२. पाप्यांस बोध. यशा. ५५:७.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ हे पाप्या, तूं देवाला मान,
तो दया दाखवी,
पापानें सत्य नाश, जाण,
तूं त्याला चुकवी.

२ बहुत हांवा भरतां
मनीं खवळतात,
हजारों नाग्या लागतां
तळतळावतात.

३ मूर्खांची दुष्ट वक्रता
तूं कां बाळगिसी?
दुःखाला तूं संपादितां
आयुष्य खर्चिसी.

४ देवाच्या पायां पडुनी
अनंत दया पाव,
ख्रीस्तानें दिल्ही खंडणी,
त्या ठायीं ठेव भाव.

५ करूनी ईश्वराचें ध्यान
संपूर्ण पापें टाळ,
तो पूर्ण धनी, त्याला मान,
शास्त्राच्या आज्ञा पाळ.

६ कळेना त्याचें कृपामोल,
दयाळू देव तो,
असंख्य पापें उंच खोल
तो क्षमा करितो.

---

183. SEEK SALVATION.

## १८३. तारणोपाय खरा.

Hin. M. पद (खमाज-मांझ, त्रिवट.)

ध्रु० श्रवण करा तुह्मी पतित जनानो,
तरणोपाय खरा हा हो.

१ तारण तारण निशिदिनिं ह्मणतां,
पारि घर मूळिंच चुकतां हो.
भ्रमतां भ्रमतां पारि न मिळे तें,
मरतां, दीन, अहाहा हो! ध्रु०

२ तारण ह्मणजे काय? कशाला?
होइल सत्य कशानें हो?
त्राता कैसा? कोण असावा?
हेंच विचारें पाहा हो. ध्रु०

३ प्रायश्चित्त यथोचित मनुजा
न घडे केलें प्रभुनें हो;
तें घ्या पश्चात्ताप करूनी,
प्रभुला सुमनें वाहा हो. ध्रु०

४ सर्व जगाचा स्वामी दावी
वाट, खरेंपण, जीवन हो;
हर्षें घ्या तें नरक चुकाया,
प्रभुसीं मिळुनी राहा हो. ध्रु०

---

184. Call to Repentance.

## १८४. पाप्यानीं पश्चात्तापी व्हावें.
Hindu M. अभंग.

१ पाप्यानें रडोनी पश्चात्तापी व्हावें,
शरण रिघावें देवबापा.

२ दुष्टाच्या नाशांत माझा तोष कांहीं
कालत्रयीं नाहीं ह्मणे देव.

३ त्यापेक्षां तयानें फिरावें, तरावें,
यांत मनोभावें संतोषें मी.

४ ख्रीस्तानें केलेल्या प्रायश्चित्तामुळें,
सर्व पापमुळें जाळील तो.

५ सदात्म्याकडुनी करील पवित्र,
ख्रीस्त पुण्यवस्त्र देईल त्या.

६ अंतीं आकाशांत जवळी घेईल,
पुत्रसें करील वतनदार.

७ प्रत्येक देव, भक्त पवित्र ते दूत
पाहतां अद्भुत वाटेल तें.

८ देव गूढ गोष्टी प्रगट करील,
कोण तो वर्णील सुखानंद.

९ प्रभूच्या प्रीतीची लांबी, रुंदी, उंची
वर्णाया बुद्धीची गती खुंटे.

---

185. The Message of Mercy.

"Sinners, will you scorn the message?"

## १८५. कृपेची सुवार्त्ता. यशा.५३:१.
8, 7, 4, ८, ७, ४ अक्षरी.

१ पाप्या, देवनिरोपाचा
किती करिसी धिक्कार?
हितबोध घे बापाचा,
कृपा दावितो अपार.
ऐक, पाप्या,
कृपा दावितो अपार.

२ कृपावार्त्ता अवघ्यांला
सुवार्त्तिक सांगती,
पश्चात्तापी पातक्यांला
ख्रीस्तें क्षमा मिळती.
किती कृपा!
ख्रीस्तें क्षमा मिळती.

३ ही सुवार्त्ता माणसांनीं
कितीदां धिक्कारिली!
मुक्ति तुच्छ केली त्यांनीं,
जरी ख्रीस्तें साधिली.
कां टाकावी?
ती ख्रीस्तानें साधिली.

४ एथें फिरतांना पापी
आकाशांत हर्ष फार,
तर या, व्हा पश्चात्तापी,
ख्रीस्तनामें घ्या उद्धार
पापी, याहो,
ख्रीस्तनामें घ्या उद्धार.

---

186. TURN, WHY WILL YE DIE?

" Sinners turn, why will ye die? "

## १८६. पाप्यांनीं फिरावें.

यहेज. ३३ : ११.

7s, double. ७ अक्षरी, ८चरणी.

१ अहो पापी, परता;
तुह्मी कां हो मरतां?
ज्याने तुह्मा निर्मिलें,
मोठ्या प्रेमें पाळिलें,
तो तुह्माला पुसतो,
दयावान् विचारितो;
त्याची प्रीति तोडितां
तुह्मी कां हो मरतां?

२ अहो पापी, परता;
तुह्मी कां हो मरतां?
ज्याने प्राण आपला
तुह्मासाठीं अर्पिला
तो तुह्माला पुसतो,
सर्व दुःखें दावितो;
त्यालाहि धिक्कारितां
तुह्मी कां हो मरतां?

३ अहो पापी परता;
तुह्मी कां हो मरतां?
जो सदात्मा येउनी
दावी मार्ग जीवनीं,
तो तुह्माला पुसतो,
मोठ्या प्रेमें ओढितो;
त्यालाहि अव्हेरितां
तुह्मी कां हो मरतां?

187. YE MUST BE BORN AGAIN.

## १८७. पुनः जन्मलें पाहिजे.

Hindu M. अभंग.

१ पुनर्जन्म झाल्याविना
गुरुकृपा त्या कळेना.

२ पापासाठीं रडतो अति,
पुनर्जन्माची उत्पत्ति.

३ खातां, पितां, वस्त्रें लेतां
शांति नसे त्याच्या चित्ता.

४ निजे, बैसे, चाले, बोले,
परी अंतर्याम लुलें.

५ वर्णवेना तैसी स्थिति,
भक्तां आहेच प्रचीति.

६ शांत होतें मन त्याचें,
धरितां पाय हो ख्रीस्ताचे.

188. MARKS OF REPENTANCE.

## १८८. पश्चात्तापाचीं चिन्हें.

Hindu M. अभंग.

१ पाहा पश्चाताप करी
पुनर्जन्माची तयारी.

२ पुनर्जन्म ज्याचा होतो,
कोण्या गुणीं वाढे हो तो.

३ प्रिय, नम्र, शांत होतो,
पापें जिंकीत चालतो.

४ शास्त्र प्रार्थनेचा चळ,
बोल बोले तो प्रेमळ.

५ पुनर्जन्म झाल्याविना
स्वर्गवास तो मिळेना.

189. BAD EFFECTS OF SIN.

## १८९. पातकांचीं दुःसह फळें.

Hindu M. दिंडी.

१ पुत्र असतां तो सर्व समर्थाचा,
पुढें झाला सैतानदास साचा,
कसा मुकला तो शांति सत्सुखाला,
पापसेवा करि टाकूनी पित्याला.

२ सुखें ऐहिक हीं टरफलांप्रमाणें,
तींहि पुरतीं ना लाभती श्रमानें,
सदा असुखी, अतृप्त, उदासीन,
निराश्रित तो बापडा कसा दीन.

३ देवबापाची प्रसन्नता, प्रीति,
सर्व सद्गुण,सुख,शांति,हर्ष,कीर्ति,
अशा मुकला तो सर्व चांगल्याला.
कसा अमृत टाकुनी विषच प्याला.

४ जगीं पाहतां पाप दिसे सारें,
खून, चोरी, व्यभिचार, गर्वदारें;
द्वेष, निंदा, अन्याय, लांच, भादी,
युद्ध, भांडणही, ठकविणें, लबाडी.

५ सर्व पृथ्वीवर दुःख, रोग पाहा,
त्रास,दारिद्र्यहि,मरण,शोक आहा,
घोर रात्रंदिन शस्त्र मना कांचीं,
कसीं दुःसह हीं फळें पातकांची.

६ सर्व मानव हो पातकांत मेले.
ईश्वराच्या ते कृपेंतुनी गेले,
दंड दुःखेंही पुढें नरक डोहीं
दुरावस्था मनुजाचि कसी हो ही.

---

190. None saved by his merit.

## १९०. स्वपुण्यानें तारण नाहीं.

Hindu M. आर्या.

१ न करावें तें केलें,
होतें कर्त्तव्य जें न तें केलें;
यास्तव पुण्य कशाचें,
परि जन पापांत सर्वथा मेले.

२ होतें कर्त्तव्यच जें
तें केलें त्यांत पुण्य काशाचें?
कोण असा परि आहे
मन कधिं चुकलें न ज्या मनुष्याचें.

३ कर्त्तव्य तें न करवे
तर मग कोठूनि पुण्य करवेल?
पुण्य घडे मत अनुचित,
पतित जनाला स्वतां न तरवेल.

४ कर्त्तव्य तें करोनी
दीन मुखें शेवटीं ह्मणा ऐसें,
हे दास निरुपयोगी
दुष्ट आह्मी निपजलों प्रभू कैसे.

५ कर्म पवित्र करी जो
पाप न करि नर असा नसे कोणी;
यास्तव पुण्य जनांचें
रेंदा घाणेरडा, नव्हे लोणी.

---

191. Turn ye, for why will ye die?
"O turn ye, O turn ye, for why will ye die?"

## १९१. फिरा, तुह्मी कां मराल?

11 s. ११ अक्षरी.

१ फिरारे, फिरारे, कां हो मरणार?
देवानें बोलविलें प्रेमें अपार,
सदात्मा व प्रभु हे ह्मणती, या,
पापाला सोडुनी उद्धार हो घ्या.

२ पाप्यांचा कैवारी व पूर्ण आधार
हा येशू जाणावा,तो न टाकणार;
दुर्गुणी, दुष्कर्मी, दुर्भाषी,कुटील,
येशूकडे या हो, तो सत्य तारील.

३ पापाचें जे मानिती हृदयीं दुख,
अशाला तो देतो आकाशाचें सुख,
प्रभूचें बोलावणें मानुनी घ्या,
सर्वांला तो ह्मणे, अहो पापी, या.

---

192. God's Plan for saving Sinners.

## १९२. पाप्यांस वळविण्याचीं सूत्रें

Hindu M. दिंडी.

१ पुत्र उधळ्या अनुतापि कधीं झाला.
चैनि असतां बांकडे काय आला?
परी दुःखें लागतां सुसाध्यानें
कसा धरिला गृहमार्ग मुकाट्यानें.

२ सुखीं असतां नाठवे दीनपाल,
छंदिं फंदीं मन राहि ताठ चाल,
परी पाहा अनिवार दुःखकालीं
कसा मानव घालितो मान खालीं.

---

### 193. God leads to Repentance.

### १९३. देव पश्चात्ताप करायास प्रेरतो.

Hindu M. अभंग.

१ पापी येतो शुद्धीवरी,
सूत्र साधन ईश्वरी.

२ शास्त्र, बोध कीं सत्संग,
इत्याद्यनेक प्रसंग.

३ दुःखें देखील प्रीतीनें,
देव लावितो नीतीनें.

४ येणें विचार सूचती,
दृष्टि पावे मंदमती.

५ पापी उघळ्या समान
घाली गुडघ्यांत मान.

६ मग जन पश्चात्तापी,
होती उद्धरती पापी.

---

### 194. True Repentance.

### १९४. खरा पश्चात्ताप.

Hindu M. अभंग.

१ खरा पश्चात्ताप ज्याचा
द्वेष करी तो पापाचा.

२ नम्र होई पाप सांगे,
पत्करूनी क्षमा मागे.

३ पाप विषप्राय वाटे,
सोडी नजाई त्या वाटे.

४ देवा दुःख होतें पापें,
पापा थरथरा कांपे.

५ लढे दुष्ट वासनांसीं,
जोडी सद्गुणांच्या राशी.

६ देवभक्तीकडे ओढ,
मेळा पवित्रांचा गोड.

७ ईश्वरेच्छा वंद्य त्याला,
झटे पूर्ण करायाला.

---

### 195. The broad Road.

"Broad is the road that leads to death."

### १९५. रुंद मार्ग. मात. ७:१३,१४.

L. M. ८ अक्षरी.

१ नाशाचा मार्ग मोठा, जाण,
हजारों त्यांत चालती,
सुमार्ग हा संकोचवान,
थोडेच जन धरिती.

२ "तू वधस्तंभ खांदीं घे,"
ही दृढ आज्ञा आठवा,
हें जग टाका अवघें,
दुर्बुद्धि बळें घालवा.

३ जो मित्रां मध्यें थकुनी
देवाचा मार्ग सोडितो,
तो दिव्य सुख टाकुनी
जिवाचा नाश करितो.

४ हे प्रभू, मला तूं उद्धर,
पापाचे पाश चुकवी,
तूं माझें मन नवें कर,
कृपेची आशा पुरवी.

---

### 196. Pleasing God.

### १९६. देवाला तोषवावें.

Hindu M. अभंग.

१ निर्मिलें देवानें विश्व जन सारें
किती उपकारें वेष्टिलें त्या.

२ परी जन सर्व होऊनी कृतघ्न,
आज्ञा केल्या भग्न ईश्वराच्या.

३ प्रीति न करितां दुःख दिलें अति
प्रिय देवाप्रति मानवांनीं.

४ तर दुष्टपणा जाणुनियां आतां
पश्चात्तापें ताता शरण जावें.

५ संवादावीं प्रीति तया तोषवावें
प्रेमें गौरवावें, कर्त्तव्य हें.

६ गौरव प्रभूचें ध्यान होतें साचें,
त्यांतच जनांचें सत्कल्याण.

197. Danger of Delay
"Haste, O sinner, to be wise."

१९७.उशीर न करावा.नीती२७:१.

7s. ७ अक्षरी.

१ पाप्या, तूं अगत्य फीर,
आज ईश्वराला मान,
करूं नकोरे उशीर,
आज पाव खरें ज्ञान.
२ कर आतां प्रार्थना,
आज माग तूं उद्धार,
उद्यां त्याची करुणा
न कदाचित् मिळणार.
३ आज तूं सुमार्ग धर,
करूं नको रे उशीर,
कोप जाणे कोठवर
भगवान् धरील धीर.
४ पाप्या, आतां मुक्ति पाव,
जीवात्म्याचा घे उद्धार,
ख्रीस्ताठायीं ठेव भाव,
दुजा नाहीं तारणार.

198. Christ's Invitation.
"Come hither, all ye weary souls."

१९८ ख्रीस्ताचें बोलावणें.
मात. ११:२८.

L. M. ८ अक्षरी.

१ "हो कष्टी श्रमी खंगले,
पापानें लादलेले, या,
मी दुःख मोडीं सगळें,
सुशांति देतों हृदया.
२ जे मजपासीं शिकती
आत्म्यानें होतां नम्र दीन,
तयांला शांति मिळती,
कां मी मनाचा नम्र लीन.
३ जो माझें जूं उचलतो
तें वाहतो खांद्यावरी,
तो दंडभय टाळितो
विसावा पावे अंतरी."
४ हे प्रभु, आह्मी येऊनी
अनन्य भाव धरितों,
जीवात्मे तुला सोपुनी
उद्धार मात्र मागतों.

199. Sinners invited.
"Come, ye weary souls oppressed."

१९९.पाप्यांस बोलावणें.मात.९:२७.

7s. ७ अक्षरी.

१ अहो कष्टी, आतां या,
ख्रीस्ताठायीं शांति घ्या,
ओझें टाका त्यावरी,
दुःखें जातीं सत्वरी.
२ देवकोपा भितां फार
ख्रीस्तरक्तें घ्या उद्धार,
दावीदाचा पुत्र तो,
हाका प्रेमें ऐकतो.
३ नग्न दुःखी अंधळे,
दीन दोषी खंगले,
असे येशूपासीं या,
उद्धाराची कृपा घ्या.

200. Christ's Invitation.
"Come, ye weary, heavy laden."

२००. पाप्यांस बोलावणें.
मात. ९: १३.

8, 7, 4. ८, ७, ४ अक्षरी.

१ अहो कष्टी लादलेले,
तुह्मीं ख्रीस्तापासीं या,
राहूं नका लाजलेले,
त्याची कृपा आतां घ्या.
संता नव्हे,
तो उद्धरी पापियां.

२ आह्मी स्वतां सुधरुनी
साधूं आपला उद्धार,
असें तुह्मी न ह्मणूनी,
ख्रीस्तालागीं सोपा भार.
दीन पाप्यां
नाहीं तो धिक्कारणार.

3 पाहा, वागीं पडतांना
प्रिय प्रभु कण्हला,
ऐका, खांबीं टांगतांना
कसा तो ओरडला!
"पूर्ण झालें,"
पूर्णोद्धार साधिला.

४ आतां वर्ने बापापासीं
तो सरक्त दावितो;
भाव ठेवा, जडा त्यासीं,
तो दिनांला तारितो.
येशू हाची
पातक्यां उद्धरितो.

---

201. Go and Tell Jesus.

## २०१. प्रभूकडे जाऊन सांगा.

11, 10. ११, १० अक्षरी.

१ अहो कष्टी प्राणी प्रभुकडे जा,
तयाला सर्व सांगा गरजा,
पाहा त्याकडे तो शांति पुरवील,
व भाव ठेवा, तुह्मा वांचवील.

भ्रु० प्रभूकडे जा हो तो शांति पुरवील.
प्रभूकडे जा हो तो तुह्मा वऱ्चील,
प्रभूकडे जा हो, प्रभूकडे जा हो,
प्रभूकडे जा हो तो शांति पुरवील.

२ असंख्य तुमचीं पापें जेव्हां उठतील,
कीं पर्वतां समान दिसतील,
ज्यानें प्राण दिला त्याला विनवा,
होऊनी नम्र क्षमा मिळवा. भ्रु०

3 तुमचीं तीं भयें प्रभु दुरावील,
तो ममतेनें अश्रुहि पुसील,
तो हातीं धरुनी घेईल जवळी,
देईल तो विश्रांति सगळी. भ्रु०

---

202. Invitation to the Weary.

## २०२. कष्टकरी यांस आमंत्रण.

6, 4. ६, ४ अक्षरी.

१ अहो कष्टकरी,
तुह्मी कोठवरी
नेतां ओझें भारी
पातकाचें?
ख्रीस्तापासीं यावें,
त्याला मान्य व्हावें,
कृपादान घ्यावें
तारणाचें.

२ प्रभु पाप्यां घेई,
तो विसावा देई,
सत्प्रेमानें नेई
सुमार्गांत;
त्याचे शिष्य व्हावें,
त्याचें जूं वाहावें,
त्याजकडे जावें
आकाशांत.

---

203. The Refuge in Affliction.

"Cast thy burden on the Lord."

## २०३. प्रभूवर ओझें टाकणें.

8 s. (Abhang.) अभंग.

१ प्रभु जाणे दुःख तझें,
त्याजवरी टाक ओझें,
आकाशाचा क्षय होई,
तरी तो आश्रय देई.

२ वादळाचा वारा सुटे,
आणि भक्ता भय वाटे,
तों प्रभूची वाणी ऐको,
"मीच आहें, भिऊं नको."

३ भाव ठेव त्याच्या ठायीं,
ओझें टाक त्याच्या पायीं,
सौम्यतेने तुला नेई,
मनीं मोठी शांति देई.

४ तुझें धैर्य जेव्हां जातें,
तो बळावी हृदयातें,
प्रभु जाणे दु:ख तुझें,
त्याजवरी टाक ओझें.

---

204. THE GOSPEL FEAST.

"Ye wretched, hungry, starving poor."

## २०४. खिस्ताची मेजवानी.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ पाहा ही मेजवानी थोर,
बिचारे खंगले,
राजाने तुमच्या समोर
मिष्टान्न वाढलें.

२ तो स्वतां उभा राहतां
जनां बोलावितो,
प्रेमा ताराया पुरता
सर्वांला दावितो.

३ येशूच्या अंत:करणीं
अपार करुणा,
दिनांला येतां पाहुनी
कोणाला टाकीना.

४ पाप्यांचा दंड त्याकडून
ईश्वर सोडितो,
भक्तांला प्रीति दाखवून
स्वपुत्र ह्मणतो,

५ घ्या तुह्मी भक्तांसंगतीं
श्रेष्ठ सुखाची चव,
पुढें होईल वरतीं
पुरता अनुभव.

६ तेथें हजारों मिळुनी
देवाळा गाती फार,
अपूर्व सुख पावुनी
वाखाणती उद्धार.

---

205. CHRIST'S INVITATION.

## २०५. ख्रीस्ताचें आमंत्रण.

Hindu M. ठुंबरी.

ध्रु० यारे यारे मजकडे यारे;
पतितानो येऊन घ्या जिवनाचें पाणी.
तुह्मी घ्या फुकट प्याच सारे. यारे०

१ पाणी तें जो पितो जें मी देतों,
त्याच्यांत तें वीहिर होऊन उफळतीं,
कधिही न लागे तृषारे. यारे०

---

206. "COME UNTO ME," &c.

## २०६. ख्रीस्ताचें आमंत्रण.

Hindu M. अभंग.

१ ख्रीस्तवाणी बोलाविती
काय जगासी ह्मणती.

२ अहो पापी कष्ट करी,
लादलेले ओझ्यापरी.

३ तुह्मी मजकडे याहो,
जिवा विसांवा हा घ्याहो.

४ बोलावणें हें ऐकतां,
धीर येतो माझ्या चित्ता.

---

207. THE SINNER'S DANGER.

"Sinner, art thou still secure?"

## २०७ पाप्याचें संकट.

7s, double. ७ अक्षरी, ८ चरणी.

१ पाप्या, कसा तूं निर्भय ?
भक्ति कां रे टाकसी ?
तुला कोणता आश्रय
मोठ्या न्याय दिवसीं ?
देवभुजीं शक्ति थोर,
त्याचा राग उठला,

तर पाप्या, त्यासमोर
पडसील दुबळा.

२ पाहा, त्याच्या देखतां
सर्व पृथ्वी कांपती,
कडे विरघळतां
जन थरथरती.
तेव्हां कोण टिकतील?
तुला, पाप्या, किती भय?
सर्व तत्त्वें जळतील,
कोठें मिळेना आश्रय.

३ प्रभू, आतां तूं उद्धर,
आह्मी क्षणें मरतों,
तूं दयाळू, कृपा कर,
तुझे पाय धरीतों.
आतां पाप सोडुनी
तुला प्रेमें देऊं मान,
जगसुख टाकुनी
आकाशांत ठेवूं ध्यान.

---

208. VANITY OF WORKS OF MERIT.

## २०८. व्यर्थ तळमळ.

Hindu M. तराणा.

ध्रु० कां रे तुह्मी हकनाक तळमळतां?
१ तीर्थ, यात्रा, स्नान, दान,
जप, तप, अनुष्ठान
करुनियां आयुष्याचे दिन घालवतां. ध्रु०
२ सूर्य, चंद्र, ग्रह, तारे,
पृथ्वी, आप, तेज, वारे
सोनें, रुपें, धोंडे, यांसी देव मानितां. ध्रु०
३ गोसावी, बैरागी, जोगी,
विप्र, जती, साधु, योगी
अशा पाप्यां आंधळ्याला गुरु करितां. ध्रु०
४ सद्दे, ताबूतहि, पीर,
दावलमलिकहि, बीर
मुर्दोला या, कबरीला कसे भजतां. ध्रु०

---

209. AWAKE THOU THAT SLEEPEST.

"Sinner, rouse thee from thy sleep."

## २०९. हे निद्रिस्था, जागा हो.

7s. ७ अक्षरी.

१ पाप्या, आतां उठुनी
झोंप वळें घालवी,
येशू कृपा करुनी
तुजला प्रकाशवी.

२ ऊठ मेलेल्यामधून,
जीवनाचा मार्ग धर,
मूर्खपणा तूं सोडून
सत्सुखाचा शोध कर.

३ सोड पापवासना,
वेळ नको घालवूं,
धर भक्तिभावना,
मुक्ति नको हरवूं.

४ आतां झोंप घालवी;
पापामुळें शोक कर,
येशू तुला बोलावी,
कृपा करी तुजवर.

---

210. SINS INNUMERABLE.

## २१०. अगणित पापें.

Hindu M. अभंग.

१ प्रभूने जें मना केलें तेंचि केलें,
जें का आज्ञापिलें तें वर्जिलें.
२ सर्व हृदयानें प्रीति देवावरी
केली नाहीं खरी जनावरी.
३ कायिक, वाचिक मानसिक पापें,
किती होती कांपे अंतर्याम.
४ क्षण, घडी, तास, दिस, मास वर्षे
रचितांनी हर्षे पातकाद्रि.
५ सर्व आयुष्यांत किती पापराशी
लागती आकाशीं असंख्यात.

३ प्रत्येक पापाचें योग्य परिमाण
सृष्टीचा निर्माणकर्त्ता जाणे.
७ ऐशा अगणित, अघोर पापांत
मनुष्या निभ्रांत बुडाळासे.

---

211. Effects of Sin.

## २११. पापाकडून खराबी.

Hindu M. अभंग.

१ तनु, मन, धन संपत्ति हीं कैसी
वाईट कामासी लावियेली.

२ काम, क्रोध, लोभ, मोह व मदादि
वाढविले हट्टीपणीकडे.

३ सदसद्विवेक बोथुनी टाकिला,
पशूहूनी झाला नीच नर.

४ उडविली ना ? ही संपत्ति बापाची,
असंख्य पापांची झाली रास.

५ कर्त्तव्य न केलें, वर्ज्य तेंचि केलें,
सर्वायुष्य गेलें पापामध्यें.

६ सद्गुणांची मंदी, दुर्गुणांची धुंदी,
माजलासे नंदी पोळ जैसा.

७ उपकार झाले अनंत जयाचे,
बंड केलें साचें त्यावरीच.

---

212. Christ offers Liberty.

"Prisoners of sin and Satan too."

## २१२. ख्रीस्त मुक्ति देतो.

L. M. ८ अक्षरी.

१ अहो पापाचे बंदिवान,
किती हो झालां कष्टवान !
तुम्हाला कृपा दावुनी
ख्रीस्ताने केली खंडणी.

२ तो आला मुक्ति द्यावयास,
सुटका गाजवावयास ;
तो दुःखितांला शांतवी,
निराश यांला हर्षवी

३ पाप्यांनो, कां हो मरतां ?
आश्रय कां अव्हेरितां ?
येशू दिनाचा तारणार,
त्यापाशीं जा हो, घ्या उद्धार.

४ जिवाला त्यानें अर्पिलें,
खाली हो क्लेश भोगिले ;
पाप्यांचा दंड भरूनी
स्वर्गी दिल्ही खंडणी.

---

213. Return. Luke xv : 17, 18.

"Return, O wanderer, now return."

## २१३. पाप्याने फिरावें.

L. M. ८ अक्षरी.

१ तूं फीर आतां, भटक्या,
बापाच्या लाग चरणीं ;
भेटीची इच्छा, पोरक्या,
तो देतो अंतःकरणीं.

२ तूं फीर आतां, भटक्या,
तो मोठी दया करितो,
तो वारी सर्व ठणक्या,
मनांत शांति भरितो.

३ तूं फीर आतां, भटक्या,
सदात्मा तुला जीववील,
तूं पायां पड, पातक्या,
येशू हा तुला उद्धरील.

४ तूं फीर आतां, भटक्या,
चुकीव दुःखें सगळीं,
कृपाळू बाप, पोरक्या,
बोलावी तुला जवळी.

---

214. Hearts of Stone.

"Hearts of stone, relent, relent."

## २१४. घट हृदयें.

7s, 6 lines. ७ अक्षरी, ६ चरणी.

१ घट पापी, पघळा ;
खालीं काय घडलें ?

पाहा येशू टांगला,
रक्त खालीं वाहिलें.
पाप्या, त्वां तें पाडिलें,
त्वां प्रभूला मारिलें.
२ त्वां त्याला धरून
खिळे हातीं ठोकिले,
कुसीं भाला भोसकून
काटे डोकीं खोंचिले.
पाप्यांसाठीं मरूनी
ख्रिस्तें दिल्ही खंडणी.
३ व्यर्थ न मराला तो;
पापी, कां हो बुडतां?
प्रेमें तो बोलाविता;
कृपा कां अव्हेरितां?
प्रभू, माझीं पापें फार,
मज दिना दे उद्धार.

215. The Way of Peace.
"Acquaint thyself quickly." &c.

## २१५. शांतीचा मार्ग.

इयोब २२:२१.

11s. ११ अक्षरी.

१ हे पाप्या, देवासीं तूं सत्वरी मीळ,
तो तुझ्या मार्गांत उजेड देईल,
मनांत सुशांति नदीच्या समान,
सुखाचें आयुष्य, अनंत कल्याण.
२ हे पाप्या, देवासीं तूं सत्वरी मीळ,
संपूर्ण दु:खांत तो साह्य करील,
अघोर प्रसंगीं होईल आश्रय.
तो मरतेवेळीं देईल विजय.

216. Seek the Sadguru.

## २१६. सद्गुरूचें आगत्य.

यो. १४:६.

Hindu M. पद. (काफी, दीपचंदी).

ध्रु० व्यर्थ खटाटोप सोडा,
सद्गुरूचरणीं जडा हो.

१ न्यायी प्रभु हा, अन्यायि तुह्मि हो;
बहु शोक करूनी रडा हो. ध्रु०
२ अति शुद्ध प्रभु हा, अपवित्र तुह्मि हो;
गुरु पुण्यवस्त्रीं दडा हो. ध्रु०
३ कर्माभिमाना सोडोनि अगदीं,
दया लीनतेचा धडा हो. ध्रु०
४ पतितार्थ गुरूनें अर्पूनि प्राणा,
केला रक्ताचा सडा हो. ध्रु०
५ सुविचार करूनी ख्रीस्तासि वंदा;
जळदीच भरतो घडा हो. ध्रु०

217. Christ the Sadguru.

## २१७. सद्गुरूचीं लक्षणें.

इब्री ७:२६,२७.

Hindu M. अभंग.

१ सद्गुरूवांचूनी तारण होईना;
मळ हा जाईना, हृदयाचा.
२ ह्मणुनी पाप्यांचें, ओझें वाहणारा;
मुक्त करणारा असावा तो.
३ निष्कलंक आणि दयाळू तो व्हावा,
समर्थ असावा, सर्व गोष्टीं.
४ नावांचे हे गुरु, होती गल्लोगल्लीं;
तारणाची किल्ली एका हातीं.
५ होउनियां नम्र, ठेवा पूर्ण भाव;
तारी ख्रीस्तराव, दास ह्मणे.

218. Need of the Sadguru.

## २१८. सद्गुरूचें आगत्य.

यो. १०:९.

Hindu M. अभंग.

१ सद्गुरूच्या पायांविना
पाप्यां उद्धार मिळेना.
२ बंद आकाशाचें द्वार,
त्यासी नाकारितां जर.
३ रोगी यासी बरेपण
कैसें होई वैद्याविण?

४ सद्गुरूची धरा कास,
तारी ह्मणे ख्रीस्तदास.

219. CHRIST THE ONLY SAVIOUR.

## २१९. ख्रीस्त हाच सद्गुरु.

मात. २३:८–१०.

Hindu M. अभंग.

१ नांवाचे हे गुरु फुंकिताती कान,
ख्रीस्त माझें मन फुंकितसे.
२ नांवाचे हे गुरु मागताती धन,
फुटलेलें मन ख्रीस्त मागे.
३ नांवाचे गुरूंची सुखांवर दृष्टी,
ख्रीस्त झाला कष्टी, पाप्यांसाठीं.
४ नांवाचे हे गुरु अशक्त व भ्रष्ट,
प्रभु ख्रीस्त श्रेष्ठ, पवित्र तो.
५ नका ह्मणूं तुह्मी मानवासीं गुरु
ख्रीस्त हेंची तारूं जीवनाचें.

220. SEEK THE REDEEMER.

## २२०. पुण्यशील गुरु करा.

Hindu M. पद.

ध्रु० करा करा मानवा गुरु करारे,
पुण्यशील पाहुनी भाव धरारे.
१ दया शांतीचा आहे ज्याला गुणरे
पापें क्षमा करूनी न्यायवानरे. करा०
२ तिन्हीं लोकांचें आहे ज्याला ज्ञानरे,
सर्व व्यापी असूनी भगवानरे. करा०
३ खरा गुरु तो अति शुद्धाचारीरे,
चमत्कार करूनी उपकारीरे. करा०
४ उंच नीचाचा कांहीं नसे भेदरे,
भक्ति भाव पाहुनी होई वैद्यरे. करा०

221. THE ACCEPTED TIME.
"All yesterday is gone."

## २२१. आतां प्रसन्नतेची वेळ.

S. M. ६, ८ अक्षरी.

१ गेलेंच गतदिन;
उद्यांचें जाणें कोण ?
पाप्यानो, तुमच्या स्वाधीन
ठेविला हाच क्षण.
२ उद्धार आज घ्या,
कां देव सुप्रसन्न,
उद्यां कदाचित् पातक्यां,
ह्मणेल, "जा, दुर्जन."

222. TURN TO GOD.

## २२२. ईश्वरप्रीती करण्याचें कारण.

Hindu M. अभंग.

१ बाळपण व्यर्थ गेलें,
मना वाटे तेसें केलें.
२ येतां तारुण्याचें मान
पापा नाहीं परिमाण.
३ ऐशा वेळीं फिरविलें,
गुरुचरण दाखविले.
४ दास ह्मणें मनाप्रति,
कर प्रभूवरी प्रीति.

223. WHAT WILL YOU DO AT LAST ?

## २२३. परिणामाचा विचार.

Hindu M. पद. (पिलू त्रिवट.)

ध्रु० शेवटिं काय करसीं ? काय करसी ?
विचार कर, कां मरसी ?
१ अवघ्या विद्या शिकून मग तूं,
मोठी चाकरी धरसी. ध्रु०
२ मोठ्या डौलें लग्न करूनी,
कुटुंबवत्सल होसी. ध्रु०
३ घरें व दारें उंच हवेल्या,
पांच ताळ चढवीसी. ध्रु०
४ मेजहि खुर्च्या जिकडे तिकडे,
झुंबर लावुनि देसी. ध्रु०
५ खाण्याची घरिं चैन पिण्याची,
वस्त्रें भरजरि लेसी. ध्रु०

६ चाकर, नोकर, बटकी, दासी,
ठेवशील सेवेसीं. ध्रु०

७ गाड्या, घोडे, लोड, बिछानें,
मर्जे मर्जे मिरवीसी. ध्रु०

८ रथीं पालखीमध्यें बसूनी,
वर चवऱ्या ढळवीसी. ध्रु०

९ हार, तुरे, मोत्यांचे गजरे,
कंठ्या, तोडा लेसी. ध्रु०

१० लेंक लेकिंचीं लग्नें करूनी,
भले ह्मणवुनी घेसी. ध्रु०

११ चारीं खंडांत किर्ति करूनी,
ज्ञानि ज्ञानी ह्मणवीसी. ध्रु०

१२ सर्व पृथ्विचीं राज्यें जिंकुनि,
भूपति तूं झालासी. ध्रु०

१३ मरणाच्या खिडींतुनि जातां,
मृत्यू मारिल तुजसीं. ध्रु०

१४ ख्रीस्त सद्गुरू धिक्कारूनि,
जीवन टाकुनि देसी. ध्रु०

१५ इतकें ऐकुनि उगाच बससी,
कां तूं बोलेनासी? ध्रु०

---

224. The Master's Call.

## २२४. ख्रीस्ताचें बोलावणें.

11, 8. ११, ८ अक्षरी.

१ प्रभु आला आतां, तुला बोलवाया,
ठोकी दारासीं हृदयाचे,
तसा न मिळे तुला सुमित्र व्हाया,
दूर कां त्यासीं लावायाचें?

ध्रु० ठोकितो, ठोकितो, प्रेमें बोलावितो
प्रभुच दारासीं हृदयाचे,
ठोकितो, ठोकितो, वाटहि पाहतो,
राहतो दारासीं हृदयाचे.

२ प्रभु आला आतां कृपा करावया,
त्याचे बोल ऐकुनी स्वीकार,
ह्मणे "तुजला मुक्ति, कां खंडिलें म्या
भाव ठेवुनी घे हा उद्धार." ध्रु०

३ प्रभु आला आतां तुला बोलवाया,
किती हर्ष तो मनीं देणार,
किती प्रेमें येई तुझी भेट घ्याया,
कसा कृपा कराया उदार. ध्रु०

४ आतां उभाच तो, प्रीति दाखवितो,
धर या क्षणीं तो सदाश्रय,
वर आकाशीं सुख भक्तांस देतो,
तसें तुलाहि देई अक्षय. ध्रु०

---

225. Repent now. 2 Cor. 6 : 2.

"Now is the accepted time."

## २२५. आज पश्चात्ताप कर.

S. M. ६, ८ अक्षरी.

१ आज सोईची वेळ,
प्रसन्नतेचा काळ;
पाप्यानो, तुह्मी केंवळ
ख्रीस्ताला अव्हेराल?

२ आज सोईची वेळ,
प्रभु बोलावितो;
उद्यांहि सोई सांपडेल,
हें कोण जाणतो?

३ आज सोईची वेळ,
सत्शास्त्र ह्मणे, या,
जागा निस्संशयें पुरेल
संपूर्ण पापियां.

४ हे देवा, कृपा कर,
तूं ओढ दुर्जनां,
ठेवोत भाव तुजवर,
लागोत भजना.

---

226. Come to Jesus.

## २२६. आज या. २ करिं. ६:२.

4, 6. ४, ६ अक्षरी.

१ याहो, याहो, ख्रीस्तापासीं,
ख्रीस्तापासीं या आज,

या आज ख्रीस्तापासीं,
ख्रीस्तापासीं या आज.
२ तुझा तारी, तुझा तारी,
तुझा तारी तो आज. इ०
३ त्यागूं नका, त्यागूं नका,
त्यागूं नका त्या आज. इ०
३ आहे सिद्ध, आहे सिद्ध,
आहे सिद्ध तो आज. इ०
५ भाव ठेवा, भाव ठेवा,
भाव ठेवा हो आज. इ०
६ थांबूं नका, थांबूं नका,
थांबूं नका हो आज. इ०
७ हालेलुया, हालेलूया,
हालेलूया, आमेन. इ०

---

227. Delay not.

## २२७. लवकर विचार करावा.

Hindu M. आर्या.

१ क्षणिक सुखें या जगिचीं
यांवर कां सर्व लावितां चित्त;
सत्सुख एथेंही प्रभु
देतो आत्मिक विसार हें वित्त.

२ करुनी विवेक आधीं
तारण मिळवावयास लगट करा;
नतरि अवचित मारिल
दुष्ट मरणएडका सलग टकरा.

---

228. What's the News?

## २२८. वार्त्ता काय ?

8,6. Peculiar. ८,६. निराळा प्रकार.

१ भेटुनी तुझी झणतां,
वार्त्ता काय ? वार्त्ता काय ?
सर्वांला हें विचारितां,
वार्त्ता काय ? वार्त्ता काय ?
उत्तम वार्त्ता सांगनों,
येशू हा कृपा करितो,
तो पापदंड हरितो,
वार्त्ता ही, वार्त्ता ही.
२ प्रभु खांबींच मारिला, वा.
उद्धार त्याने साधिला, वा.
प्रभूचें रक्त वाहिलें,
मरण प्रेमें साहिलें,
उठुनी शत्रू जिंकिले, वा.
३ संजीवनाचें चालें काम, वा.
पापी प्रभूचें घेती नाम, वा.
दंडापासूनि सुटले,
ते मोठा हर्ष पावले,
सर्वांला सांगूं लागले, वा.
४ मी मोठी दया पावलों, वा.
देवाचा पुत्र ठरलों, वा.
दुर्वासना तो घालवी,
कृपा मागाया शिकवी,
मनांत हर्ष भरवी, वा.
५ हा प्रभु तुलाहि तारील, वा.
तो तुझें मन पालटील, वा.
आतांच पश्चाताप कर,
व भाव ठेव त्याजवर,
तो कृपा करितो सत्वर, वा.
६ कोणी तुझा विचारिलें,
वार्त्ता काय ? वार्त्ता काय ?
सांगा कीं ख्रीस्तें तारिलें,
वार्त्ता हीच, वार्त्ता हीच.
आह्मा मिळाला मोठा जय,
जगानें टाकुनिया भय,
आकाशीं चालूं हा निश्चय,
वार्त्ता हीच, वार्त्ता हीच.

---

229. Youth Admonished.

"Now in the heat of youthful blood."

## २२९. तरुण्यांस बोध.

L. M. ८ अक्षरी.

१ हे नव्या तरुण्या, सत्वर
तूं आपला कर्ता याला स्मर,

आतांच खुशालीचा वेळ,
पुढें दुःखावस्था पोंचेल.

२ पाहा, तो वृद्ध पातकी
क्लेशित जातो नरकीं,
या जगीं पीडा झाली फार,
पुढेंहि दंड लागणार.

३ देह मातीसीं मिळतो,
आत्मा हा वर चढतो,
देवाकडून होई न्याय,
तेव्हां तो बुडे निरुपाय.

४ हे देवा, मला वाटो भय.
न लागो यातना अक्षय,
माझा होईल अंतकाळ
तेव्हां तूं मला कवंटाळ.

---

230. SEEK THE TRUTH.

**२३०. सत्याचा शोध.**

7, 6. ७, ६ अक्षरी.

१ तूं जा तरुणपणीं,
सत्याचा शोध कर,
अमोल्य तें मानुनी,
मिळेल तेव्हां धर;
मनांत ठसवावें,
न करी अनमान,
विषय नाकारावे,
का तेणें बुडे ज्ञान.

२ या वेळीं शक्ति मोठी,
मनाला हर्ष फार,
पुढें हीं सुखें खोटीं,
नाहीं आवडणार;
ह्मणून तूं झटूनी
सत्य शोधुनी घे,
द्रव्यहि दे टाकुनी,
व जग अवघें.

३ आतांच सत्य घ्यावें,
कां करिसी उशीर?
कधीं न जाऊं द्यावें,
सुमार्गीं चाल स्थिर.
आतां तरुणपणीं
सत्याचा शोध कर,
उत्पन्न कर्त्ता धनी
याला प्रेमानें स्मर.

---

231. THE SINNER'S RESOLVE.

"Come, humble sinner, in whose breast."

**२३१. पाप्यानें निश्चय करावा.**

C. M. ८, ६ अक्षरी.

१ हे दीन पाप्या, आतां ये,
अत्यंत तुला भय,
या घोर प्रसंगामध्यें
तूं कर हा निश्चय.

२ "मी ईश्वराकडे फिरेन,
कोणीहि भिववो,
मी त्याच्या अंगणीं शिरेन,
कोणीहि आडवो.

३ पडुनी पायां त्यासमोर
मी पापें पत्करीन,
सांगेन माझा मोठा घोर,
दुर्दशा कळवीन.

४ आतां जाईन जवळी,
दयाळू राजा तो,
तयानें कृपा दाविली
तर मी वांचतों.

५ कदाचित् मला दाखवील
अनंत करुणा,
तो जरी मला बुडवील,
करीन प्रार्थना.

६ कदाचित् मज पापियास
दावील क्रोध फार,
परी मी दूर राहिल्यास
निश्चयें बुडणार."

---

232. Christ is Ready.

### २३२. ख्रीस्त अंगीकारायास तयार.

Hindu M. पद.

ध्रु० स्वीकारी हरएक पाप्या,
जगपाल आहे तयार.
१ अनुताप करुनी, गुरु ख्रीस्तद्वारें,
जातां शरण तो उदार. ध्रु०
२ असला कितीही मोठा पतित तो;
तरि देव करि अंगिकार. ध्रु०
३ प्रभुख्रीस्तरक्तें, पापें तयाचीं,
पुसितो कृपाळू अपार. ध्रु०
४ शुद्धात्म यानें, गुरुपुण्यवस्त्रें,
भूषित करीं त्यास फार. ध्रु०
५ तर कां पतीता करसी प्रभूच्या
आमंत्रणाचा नकार. ध्रु०

---

233. Warning to the Young.
"My son, know thou the Lord."

### २३३. मुलांस बोध १काल.२८:९.

S. M. ६, ८ अक्षरी.

१ हे माझ्या लेंकरा
तूं ईश्वराला जाण,
तो तुझा करी पाहरा,
तूं त्याला प्रेमें मान.
२ तो दूर नसतां
तूं त्याचा शोध कर,
अनन्य भावें भजतां
तूं त्याचे पाय धर.
३ तूं जर अंतरी
देसील त्याला मान,
मिळेल कृपा ईश्वरी,
अनंत हें कल्याण.
४ परी बहकतां
कुमार्ग धरसील,
तरी तो तुला टाकितां
तूं सत्य बुडसील.

---

234. Repent.

### २३४. मागें फीर.

Hin M. पद.(ता०-आडाग,दीपचंदी.)

ध्रु० पुन्हारे मागें फीर,जाऊं नको धरी धीर.
१ धन मालमत्ता घेऊन जासी;
मन राहणार नाहीं स्थीर. ध्रु०
२ मजवीण करणा, येई न ममता;
होसील बहु दिलगीर. ध्रु०
३ स्वातंत्र्य ऐसें नाहीं सुखाचें;
होईल आड ना विहीर. ध्रु०
४ अनुताप याचा होईल तुजला;
शुद्धीवर ये, कां उशीर ? ध्रु०
५ करुण स्वरानें बोलावणें तूं;
धिःकारूं नको फीर, फीर. ध्रु०

---

235. Christ, my King.

### २३५. ख्रीस्त माझा राजा.

8s. (Abhang.) ८ अक्षरी.(अभंग.)

१ लेंकरानो, धैर्य धरा,
येशू मोठा तारणारा,
तो तुम्हाला कृपा देई,
सुमार्गांत हातें नेई.
ध्रु० प्रभु ख्रीस्त माझा राजा,
तारणारा नाहीं दुजा.
२ सैतानासीं तुम्ही लढा,
सर्व पापें बळें सोडा,
ख्रीस्तें तुह्मा जय मिळे,
त्याच्या नावें शत्रु पळे. ध्रु०
३ पुढें मृत्यु जेव्हां येई,
तेव्हां प्रभु वरें घेई,
तें कराल त्याची स्तुति,
समजाल त्याची प्रीति. ध्रु०

---

236. Advice to Children.

### २३६. लहानपणीं वर्त्तणूक.

8s. (Abhang). ८अक्षरी. (अभंग.)

१ माझ्या लेंकरानो, पाहा,
नेहमी प्रीतीनें राहा.

२ कधीं कज्जा नका करूं,
रागें कोणा नका मारूं.

३ कोंकरें हीं आईपासीं,
तसीं सौम्य व्हा सर्वांसीं.

४ जे तुह्माला शिकविती,
त्यांजवरी करा प्रीति.

५ चित्त देतां धडे शिका,
शाळेमाजी खेळूं नका.

६ आईबापां प्रिय माना,
प्रभु तारणारा जाणा.

---

237. Christ's Invitation.

"From the cross uplifted high."

## २३७. ख्रिस्ताचें बोलावणें.

7s, 6 lines. ७ अक्षरी, ६ चरणी.

१ येशू खांबीं टांगला,
अति क्लेशें पिडला,
तरी तेथें दावी प्रेम,
करी माणसांचें क्षेम;
ह्मणे नष्ट पापियां,
"या हो, कृपा घ्याया या.

२ म्या तुह्माला खंडिलें,
मोल पूर्ण दिधलें;
कां बंदांत राहतां?
कांहीं दंड साहतां?
पायां पडा, मुक्त घ्या,
या हो, कृपा घ्याया या.

३ बापेंहि बोलाविलें,
मोठें प्रेम दाविलें,
तुह्मा पुत्र ह्मणवील,
आपल्या पासीं राहवील;
तुह्मी त्याला मान द्या,
या हो, कृपा घ्याया या.

४ अंतकाळीं होतां भय,
मी देईन सदाश्रय,
आकाशांत नेउनी
ठेवीं देवसदनीं;
तें ह्मणेन, अहो या,
आतां अनुभव घ्या."

---

238. Believe and be saved.

"Not to condemn the sons of men."

## २३८. विश्वास ठेवावा.

L. M. ८ अक्षरी.

१ पाप्यांला दंड करण्यास
प्रभु न घेई अवतार,
न दावी क्रोध पातक्यांस,
हातीं न धरी तरवार.

२ देवाची किती करुणा!
अनंत कृपा दाविली,
प्रिय पुत्राला राखींना,
पाप्यांची मुक्ती साधिली.

३ पाप्यांनो, तोच सदाश्रय,
विश्वास ठेवा त्यावरी,
भक्तांला करितो निर्भय,
सत्सुख देतो अंतरीं.

४ जे त्याचा करिती धिक्कार
ते योग्य दंड पावतील,
ख्रीस्ताचा केला तिरस्कार
यामुळें क्लेश भोगतील.

---

239. The Penitent Thief.

"Sovereign grace hath power alone."

## २३९. पश्चात्तापी चोर.

7s. ७ अक्षरी.

१ ईश्वराचें कृपादान
गुणाकारी आहे, जाण,
कृपा जेव्हां मिळती,
घट्टहि पघळती.

२ प्रभूसंगें खांबीं घोर
दिल्हे होते दोघे चोर.

एक खीस्ता निंदी फार,
जरी प्राण सोडणार.

३ तसा थट्टा करुनी
क्लेशीं गेला मरुनी,
प्रिय प्रभु पाहिला,
तरी नाहीं मानिला.

४ त्याच वेळीं दुजा चोर
नाश पाहतां समोर
प्रेरणाच पावला,
तेव्हां भाव ठेविला.

५ ह्मणे, "प्रभु, मला स्मर,
जेव्हां चढसील वर;"
प्रभु सांगे, "आकाशीं
आज शांति पावसी."

६ हीच करुणा अपार
त्याला मिळे वेळेवार;
अहो कष्टी, ठेवा भाव,
खीस्त करितो बचाव.

---

240. CONFESSION OF SIN.
"O blessed souls are they."

## २४०. पाप कबुल करणें.

S. M. ६, ८ अक्षरी.

१ ते धन्य केवढे,
जे क्षमा पावले,
ज्या पापी दुर्जनांकडे
न्याय्यत्व मोजलें.

२ ते दोष आठवून
दुःखानें रडती,
मनाला नित्य आवरून
दुर्भाव सोडिती.

३ म्यां पाप झांकिलें,
तों दुःखें झुरलों,
तें पदरांत घेतलें
तों क्षमा पावलों.

४ दिनानो, प्रार्थना
कराहो सर्वकाळ,
हे पाप्या, भक्तिभावना
धरुनी नाश टाळ.

---

241. COMING TO CHRIST.

## २४१. खीस्ताला शरण जाणें.

Hindu M. पद.

ध्रु० मना तूं पाप सोड,
गुरुकृपा जरा तरी जोड.

१ गुरुवीण कवणा नाहींच सत्ता,
करील पापाचा मोड. ध्रु०

२ करुनी पश्चात्ताप ठेव विश्वास,
मानूं नको अवघड. ध्रु०

३ शरण खीस्ताला रीघ आतांची,
न धरीं जगाची ओढ. ध्रु०

४ शांति तो तुजला देईल सदा,
पडूं नेदी कांहीं नड. ध्रु०

---

242. SINNERS INVITED.
"The Spirit in our hearts."

## २४२. पाप्यांस बोलावणें.

S. M. ६, ८ अक्षरी.

१ सदात्मा अंतरीं
ह्मणे, पाप्यानो, या.
मंडळी खीस्तनवरी
सांगे, उद्धार घ्या.

२ जो कोणी ऐकतो
तो ह्मणो, सर्व या,
उद्धार ज्यांस लागतो,
ते तुह्मी आतां घ्या.

३ जे कोणी इच्छितो
ते तुह्मीं सुखें या,
कां खीस्त हाका मारितो
ह्मणें, या, पाणी प्या.

४ तो हेंहि ह्मणतो,
येईन मी सत्वर;
हे प्रभू, वाट पाहतों,
तूं ने आह्माला वर.

---

243. WILL YOU GO?

### २४३. येता काय?

8, 6. Peculiar. ८, ६. निराळा.

१ वरें घराला चालतों,
येतां काय? येतां काय?
प्रभू भेटाया इच्छितों,
येतां काय? येतां काय?
हजारों तेथें पोंचले,
अनंत सुख पावले,
हजारों वाटे लागले
येतां काय? येतां काय?

२ तेथें उजेड सर्वकाळ,
येतां काय? येतां काय?
नाहींच रात्र दुःख हाल,
येतां काय? येतां काय?
तेथें मुगुट घालुनी,
व जयध्वजा धरूनी,
वर्णू ख्रीस्ताचीं करणीं;
येतां काय? येतां काय?

3 आकाशमार्ग आहे नीट,
येतां काय? येतां काय?
सर्व पापाचा करा वीट,
येतां काय? येतां काय?
येशूच्याठायीं ठेवा भाव,
अन्याचें नका घेऊं नांव,
कां तोच जीवनाचा ठाव;
येतां काय? येतां काय?

४ मित्रानो, करा हो निश्चय,
तुह्मी या, अहो या;
जगाचें वाटूं नये भय,
तुह्मी या, अहो या.
नर्कात दंड यातना,
लागावें ख्रीस्तचरणा,
येशूची मोठी करुणा,
तुह्मी या, अहो या.

---

244. REST FOR THE SOUL.
"O cease, my wandering soul."

### २४४. आत्म्याला शांति कशी मिळेल.

S. M. ८, ६ अक्षरी.

१ हे जिवा, कोठवर
तूं व्यर्थ हिंडसी?
या जगीं विश्रांतीचें घर
कोठें न पावसी.

२ पाहा हें भक्तस्थान,
हें घर ईश्वरी,
उघडें आहे दार, जाण,
जा त्यांत सत्वरी.

३ तेथेंच तूं निर्भय
विसावा पावसील,
दिव्य सुखाचा तो आश्रय,
अति आनंदसील.

४ तरी तूं कोठवर
हे जिवा, हिंडसी?
या जगीं तूं शांतीचें घर
कोठें न पावसी.

---

245. LIFE AND DEATH.
"O where shall rest be found?"

### २४५. जीवन आणि मरण.

S. M. ६, ८ अक्षरी.

१ जिवाला विश्रांति
कोठेंरे मिळणार?
धुंडितां सर्व जगती,
नाहीं सांपडणार.

२ जगाचें श्रेष्ठ सुख
क्षणें गुजरतें.
मरणादिक भवदु:ख
त्वरित सरतें.

३ हा देह मरतां
जिवन मिळे वर.
कल्पांतीं तें न सरतां
प्रीतीचा होई भर.

४ मरण दुसरें
अनंत पीडामय,
अवाच्य त्याचे क्लेश रे,
दारुण अतिशय.

५ हे देवा, तूं दयाळ,
आम्हाला दे उद्धार,
तूं नको टाकूं सर्वकाळ;
तें कसें सोसणार?

---

246. The Gospel Jubilee.

"Blow ye the trumpet, blow."

## २४६. मुक्तीचें वर्ष. लुका ४:१९.

H. M. ६, ६, ८ अक्षरी.

१ तुतारी वाजवा
सर्व पृथ्वीवरी,
उद्धार गाजवा,
कळो दिगंतरीं.
मुक्तीचें वर्ष पोंचलें,
ख्रीस्तानें पाप्यां खंडीलें.

२ ख्रीस्ताला स्तवा फार,
वाखाणा कृपा थोर,
तो करुनी उद्धार
सोडितो दंड घोर.
मुक्तीचें वर्ष पोंचलें,
ख्रीस्तानें पाप्यां खंडीलें.

३ पापाचे दास दीन,
मुक्ति पावाया या,
टाका हें जग हीन,
ख्रीस्ताची कृपा घ्या.
मुक्तीचें वर्ष पोंचलें,
ख्रीस्तानें पाप्यां खंडिलें.

४ नमा येशूसमोर,
उपाध्या तो महान
भरिला दंड घोर,
तें साधिलें कल्याण.
मुक्तीचें वर्ष पोंचलें,
ख्रीस्तानें पाप्यां खंडिलें.

---

247. The Gospel Jubilee.

"Fair shines the morning star."

## २४७. मुक्तीची वेळ. लुका ४:१९.

H. M. ६, ६, ८ अक्षरी.

१ सुदिन आले, जाण,
तुतार्‍या वाजती,
मनुष्य हर्षवान
सर्वत्र गाजती.
झाले हो दास मोकळे,
मुक्तीचे दिन पोंचले.

२ भरली खंडणी
दंड निवारिला,
कां ख्रीस्त मरुनी
फिरुनी उठला.
पाप्यांनो, या, व्हा मोकळे,
मुक्तीचे दिन पोंचले.

३ तुह्माला खंडितां
सोनें न दिधलें,
स्वजीव अर्पितां
ख्रीस्तानें तारिलें.
स्वरक्तें केलें मोकळें,
मुक्तीचे दिन पोंचले,

४ पापाचे दास, या,
ऐका दिगंतरीं,

उद्धार प्रेमें द्या,
हीं कृपा ईश्वरी.
सर्वांनो, या, व्हा मोकळे,
मुक्तीचे दिन पोंचले.

---

248. Enough for All.

## २४८. तारणरूप अन्न भरपूर.

Hindu M. अभंग.

१ उधळ्याच्या बापा घरीं
होत्या भरपूर भाकरी.
२ तैसें अत्यंत श्रीमान
देवाघरीं कैची वाण.
३ वस्त्या सुंदर अपार,
जागा पुरती सोईवार.
४ त्रैलोक्याचा देव पति,
सर्व सौख्यें त्याच्या हातीं.
५ अहा तारणरूप अन्न
देतो प्रभु तो संपन्न.

---

249. Justice and Mercy.

## २४९. न्याय व दया सम झालीं.

Hindu M. आर्या.

१ आहाहा देवानें
जगावरी प्रीति एवढी केली!
कीं, त्यानें एकुलता
स्वपुत्र दिधला दया नहीं गेली.
२ आतां ख्रीस्त प्रभुकृत
तरणोपायच खरा कसा पाहा.
न्याय, दया सम राहुनी
परस्परां चुंबिती कसीं आहा.
३ याकरितां जो कोणी
त्यावर विश्वास ठेवितो भावें,
होऊं नये लय त्याचा,
जीवन त्या सर्वकाळचें व्हावें.
४ पापी एक परततो
तेव्हां स्वर्गांत तोष बहु होतो.
भक्त पवित्र दूतहि,
जगदीश्वर हर्षतो कसा हो तो.

---

250. Justice and Mercy.

## २५०. न्याय असतां क्षमा.

Hindu M. अभंग.

१ केली क्षमा पतिताला,
लागे कलंक न्यायाला.
२ केला खरा न्याय जर कां,
तर पापी जातो नरकां.
३ दंड पाप्यां लागणार
ख्रीस्तें घेतला तो भार.
४ पापी दंडमुक्त झाला,
न्यायी देवहि राहिला.
५ न्याय, दया समतोल,
ख्रीस्ततराजू अमोल.

---

251. Man Responsible.

## २५१. मनुष्यच पापाचा जबाबदार

Hindu M. साकी.

१ कर्ता पाप करविता देवच,
म्हणती जन रायाला;
परि शुद्ध प्रभु पातक न करी,
सांगे न करायाला.
२ रोज हजारों पावन असतां
त्या प्रभुचे उपकार,
मानव होउनि कृतघ्न त्याला
उलट करी अपकार.
३ त्या उधळ्या पुत्रासम पातक
केलें सर्व जनांनीं,
दुःख दिलें प्रिय ईश्वरबापा,
परिजन हृदयीं नाणी.
४ देव दयाळू समर्थ परि तो
न्यायी मोठा आहे,
क्षमा करील तर त्याच्या न्याया
लागे दूषण बा हें

५ दंड करिल तर योग्य परी मग
पतित कसे तरतील!
दया न दिसतां प्रभुची, दुःसह
नरकामधिं पडतील.

६ पातक मोचन, शुद्धि मनाची
झाल्याविण कोणाला,
स्वर्ग सुखाची प्राप्ति न होई.
सांगे देव जनाला

252. THE PRODIGAL SON.

"Behold the wretch whose lust and wine."

## २५२. उधाळ्या पुत्र. लुका १५.

L. M. ८ अक्षरी.

१ जो उधळ्या भटकला,
तो, पाहा, किती खंगला!
जें डुकरांला टाकिलें
तें खावें त्याला वाटलें.

२ तो येऊनी शुद्धीवरी
विचार केला अंतरीं,
"बाप बहुतां पाळितो,
आणि मी भूकें मरतों.

3 मी आतां त्याकडे जाईन,
पडुनी पायां विनवीन,
झणेन, मी दुष्कर्मी फार,
तरी, हे बापा, अंगिकार."

४ तेव्हां उठुनी चालला,
तो घराशीं पोंचला;
दुरुनी त्याला पाहतां
बापाला आली ममता.

५ धावुनी गळीं पडला,
प्रेमानें मुका घेतला;
सद्गद झाला उधळ्या,
स्मरुनी चेष्टा आपल्या.

६ तो बाप सांगे, "याचिया
आतांच काढा चिंधिया,
शुभ्र पोषाक लेववा,
अंगठ्या बोटीं घालवा.

७ आपण करूं महोत्साव,
अपूर्व झाला हो निभाव,
हा पुत्र होता गतप्राण,
तो आज झाला जीववान."

253. WORKS INSUFFICIENT.

## २५३. पुण्यानें तारण नाहीं.

Hindu M. दिंडी.

१ सदाचरणानें पुढें वर्त्ततांही
तरी पुर्वीचा दोष कमी नाहीं;
ज्ञान, विद्या, अधिकार, कुळ यांहीं,
किंवा द्रव्यानें मुक्ति नसे पाहीं.

२ प्रार्थनाही, स्तुति, भक्तिचा आवेश,
शास्त्र वाचनही, देवळीं प्रवेश,
पाप यांनींही जात नाहिं पाहा,
तुह्मी सुविचारें शोध करावा हा.

3 जसा उधळ्या सर्वस्वि नम्र झाला,
पाप पत्करुनी पित्या शरण आला;
कृपादानच हो फक्त इच्छियेलें,
नाहिं सुकृत वा पुण्य दावियेलें.

४ तसा पापी जाईल शरण देवा,
त्याचि इच्छा जाणुनि करिल सेवा;
कृपेवरतीं टेंकेल ईश्वराच्या,
करिल माफी तो पातकांचि त्याच्या.

५ पिता आज्ञापिल तेंच मी करीन,
मार्ग दाविल जो तोच मी धरीन;
हीच उत्कंठा मुख्य मनीं ज्याची,
देव बहु हर्षें क्षमा करिल त्याची.

254. WHAT IS SALVATION?

## २५४. तारण ह्मणजे काय?

Hindu M. पद. (धनाश्री, एका).

ध्रु० पतिता, तारण ह्मणजे काय?

१ स्वस्थ बसुनिया खाया मिळतां
आंखडतिल कर पाय ध्रु०

२ यद्यपि झाली सुवर्ण काया,
तरि हा शुद्ध अपाय. ध्रु०
३ भ्रष्ट हृदय तनु स्वर्गी न जाई,
व्यर्थ विमान सहाय. ध्रु०
४ शुद्ध मनाविण प्रभु भेटीचा
लाभ नसे तिळप्राय. ध्रु०
५ पापविमोचन, अंतरशुद्धिहि,
सत्सुख प्राप्तिशिवाय. ध्रु०

---

255. Pleasing God.

## २५५. प्रभूला तोषविणें.

Hindu M. पद.

ध्रु० प्रभूला तोषविण्यास झटावें
१ अगणित वेळा दुःख दिलें त्या,
अणखिहि कां उलटावें. ध्रु०
२ पश्चात्तापें शरण रिघावें,
हृदय तयास पटावें. ध्रु०
३ त्यजुनी पापें, शुद्ध मनाच्या
भक्तिस्थानें नटावें. ध्रु०
४ प्रभुची इच्छा जाणुनि करणें,
अक्षर हेंच घटावें. ध्रु०
५ तारण लोकां कळवावें, कां?
आत्मिक दुःख हटावें. ध्रु०
६ अनुपम केली प्रीति जयानें
कां न तया लगटावें. ध्रु०

---

256. Living Faith needed.

## २५६. सजीव विश्वास पाहिजे.

Hindu M. आर्या ( गीति. )

१ विश्वासा वांचुनिया
होतच नाहीं प्रभूस तोषविणें,
तैसें सुकरणीविण
होतच नाहीं सुभाव दाखविणें,
२ आत्म्याविना शरिर तें,
निर्जिव निर्जीव नासकें साचें,
तैसें सुकरणीविण
निर्जिव विश्वासकाय कामाचें.
३ दृढ विश्वास सुवर्त्तन,
प्रिति आग्रह पाहतां प्रभू सदय,
होऊनि वास तेथें,
करि कां त्या आवडे असें हृदय.

---

257. The Fruits of Faith.

## २५७. विश्वासाचीं फळें. इब्री ११.

Hindu M. अभंग.

१ विश्वासाचीं फळें जाणा,
प्रीति,आज्ञांकितपणा.
२ धैर्य, हौस, उत्तेजन,
प्रिय शुभवर्त्तमान.
३ पाप, जग, मृत्यु असे,
जय यांवरी होतसे.
४ सत्य विश्वासें उद्धार,
स्वर्ग प्रीति हा निर्धार.
५ ऐसा विश्वास पामरा
मज देई बा ईश्वरा.

---

258. Living in Love.

## २५८. प्रीतीनें राहणे.

Peculiar. निराळा प्रकार.

१ करावी सत्प्रीति,
असावें प्रेमळ,
कां मरुनी जाती
सुमित्र सकळ;
दुःखाचिया वेळीं
मना आठवेल,
कीं सत्प्रीति केली,
तों सुख वाटेल.
ध्रु० भलीं मुलें, धन्य मुलें,
करितां भावांवरी सत्प्रीति,
आणि प्रभु, प्रिय प्रभु,
यावरी सत्प्रीति फार.

२ न व्हावी चहाडी,
नको शिवीगाळ,
वर्जावी लबाडी,
नसावें टवाळ.
अखंड धरावा
प्रेमाचा स्वभाव,
मानांत न यावा
विकल्प कीं डाव. ध्रु०

३ मित्राला विपत्ति
एखादी लागेल,
तों मोठी आसक्ति
अधिक शोभेल.
करावी सत्प्रीति,
असावें प्रेमळ,
कां मरुनी जाती
सुमित्र सकळ. ध्रु०

---

259. How to Pray.

## २५९. प्रार्थना कसी करणें.

7, 6. ७, ६ अक्षरी.

१ एकांतीं जा सकाळीं,
दुपारी जाया स्मर,
जा पुन्हां संध्याकाळीं,
रात्रींहि तसें कर.
मनांतुनी टाकुनी
विषयी वासना,
व गुडघे टेंकुनी
करावी प्रार्थना.

२ जे तुझे प्रिय मित्र
त्यांसाठीं माग दान,
संपूर्ण द्वेषपात्र
यांसाठींहि कल्याण.
स्वपापें आठवुनी
ख्रीस्ताच्या पायीं लाग,
त्या नावें विनवुनी
तूं आशीर्वाद माग.

३ एकांतीं जरी जाणें
हें तुला होईना,
तरी देवाला मनें
करावी प्रार्थना.
ईश्वर प्रीति करी,
तो असेंहि ऐकेल,
तो कधीं न धिक्कारी,
शीघ्र तो सांपडेल.

४ केवढी मोठी कृपा,
ईश्वर दावितो,
कीं आह्मी जसें बापा
तयाला मागतों.
दु:खविपत्तिकाळीं
त्याची विनंती कर,
आणि सुखाच्या वेळीं
तूं त्याची कृपा स्मर.

---

260. Acceptable Prayer.

## २६०. आवडती प्रार्थना.

Hindu M. साकी. ( पिलू, एका ).

ध्रु० ऐसी विनती जरी थोडी,
प्रभुला प्रेमाची गोडी.

१ आलंकारिक शब्द विनंतित,
वाणी शुद्ध नसो कीं;
चिंता नाहीं प्रभुला त्याची,
प्रेमाचा परि शोकी. ध्रु०

२ बाहेरिल शोभेची विनती
प्रभुला लागति धूर;
प्रेमभरित विश्वासू विनती
प्रभुला फार मधूर. ध्रु०

३ विश्वासानें सद्बुद्धीनें
प्रभुला हृद्गत सांगे;

त्यावरी सत्ता कांहिं न करितां
नम्रपणानें मागे. ध्रु०
४ निर्मल अंत:करण करूनीं
भाविक वृत्ति धरावी;
बुद्धि धरूनिया क्षमेची मग त्या
प्रभुला विनति करावी. ध्रु०

---

261. Pray without ceasing.

## २६१. सतत प्रार्थनेचें अगत्य.

Hin. पद. (कल्याणी-मांझ,दिपचंदी).

ध्रु० प्रभुला प्रार्थीत जा वारंवार.
१ प्रभु हा दयाळू, अति श्रेष्ठ राजा,
द्यायाला संतुष्ट फार. ध्रु०
२ मागाच ह्मणजे, लाभेल तुह्मा;
ठोकाच उघडेल द्वार. ध्रु०
३ प्रिय पुत्र ज्यानें दिधला तुह्माला,
अणखि कां ना पुरविणार? ध्रु०
४ आत्माहि प्रभुचा शिकवील तुह्मा,
करुणास्वरानें अपार. ध्रु०
५ देवासिं तुमची मध्यस्थि करितो,
प्रिय ख्रिस्त हा तारणार. ध्रु०
६ सद्भक्त यांहीं, आली प्रचीती,
दिलिं उत्तरें बेसुमार. ध्रु०

---

262. Prevailing Prayer.

## २६२. अखंड प्रार्थनेचें अगत्य.

Hindu M. अभंग.

१ करा प्रार्थना अखंड,
नका पडूं देऊं खंड.
२ होतां प्रार्थना विश्वासू,
येतें अंत:करणा हांसू.
३ प्रार्थनेचें मोठें बळ,
नाशी संकटां समूळ,
४ प्रार्थनेनें देवमैत्री
होती जैसी पत्रोपत्रीं.
५ येतो प्रार्थनेचा त्रास,
होतां सैतानाचा वास.

---

263. Empty Sound.

## २६३. नादलुब्धी.

Hindu M. अभंग.

१ नादलुब्धी हो कथेस
जाती ह्मणती नाहीं रस.
२ लक्ष ताल सुरावरी,
देती नादलुब्धी भारी.
३ सार कथेचा पुसतां,
नाकें मोडिती बोलतां.
४ चव कोचि ज्वरितांसीं
देतां मिष्टान्न तयांसीं.
५ नादलुब्धी तैसे गाते
ख्रीस्तप्रीतींविण जे ते.

---

264. Important Suggestions.

## २६४. अगत्याच्या कित्येक सूचना.

Hindu M. आर्या (गीति).

१ क्षणभंगुर आयुष्यीं
विचार कांहीं कराच जिवनाचा;
विलासिं, नाटकिं, बैठकिं,
जाऊ देऊं नकाच जिव नाचा.
२ कांहीं परमार्थाची
कर तूं संसारिं जोड मनुजा तीं;
दु:ख खरें या जगतीं,
परि रणिं भिडताति शूर त्या जातीं.
३ तुजला स्वतां न लढवे,
अशक्त तूं जिंकसी न सैताना;
साहित्य सर्व मिळतें,
ख्रीस्तपदीं लीनता धरीतांना.
४ देवाचें भय धरणें,
ज्ञानाचा उगम हाचि जाणावा;

बोध असा ज्ञानाचा
करिना कीं कोणि तोचि मानावा.

---

265. Works Insufficient.

२६५. कर्ममार्ग व्यर्थ.
गल. २:१६.
Hindu M. अभंग.

१ तीर्थ, यात्रा, जप, स्नान, दान, तप
केल्यानें हें पाप जात नाहीं.
२ अरण्यांत वास, गुहेंत प्रवास,
झाड पाला खास तरी व्यर्थ.
३ टांगुनी घेतिलें, शरीर विंधिलें,
उलटें पाप झालें हत्येचें हें.
४ कोळसा हा जरा व्हावया पांढरा,
किती श्रम करा, तरी व्यर्थ.
५ तैसे पापी जन कोळशासमान,
कैसा होई वाण, सफेदीचा.
६ स्वकर्मानें पापी न होई निष्पापी;
ख्रीस्तच प्रतापी, शुद्ध करी.

---

266. Works Insufficient.

२६६. उद्धार कर्ममार्गानें होत नाहीं.
Hindu M. कटाव.

ध्रु० उद्धार कर्ममार्गानें
होई न पुण्यही त्यानें.
१ जप, तप, यात्रा, तीर्थें, स्थानें,
अनुष्ठान, ध्यान, धर्म, दानें,
व्रतें, अर्पणें, उपास, भजनें,
धूप, दीप, नैवेद्य, दक्षिणा,
यज्ञ, होम, ग्रामप्रदक्षिणा,
नामस्मरणहि केलें जाणा. ध्रु०

---

267. Cross and Crown.

२६७. वधस्तंभ व मुगुट.
C. M. ८, ६ अक्षरी.

१ येशूनें खांब वाहिला,
आह्मी वाहवा जाण,
तो कां मरावा एकला ?
त्याहि अर्पावा प्राण.
२ जे भक्त वर्ते चढले
भोगुनी मोठे हाल,
ते आतां शांति पावले,
हर्षती सर्वकाळ.
३ खांब वाहीन हर्षवान
सर्व आयुष्यभर,
तरी मुगुट तेजवान
मला मिळेल वर.

---

268. Humility Inculcated.

२६८. गर्वापासून तोटे.
नी. १६:१८.
Hindu M. पद. (खमाज, त्रिवट).

ध्रु० सोडी सोडी मानवा गर्व सोडी रे,
अभिमानाच्या टाकुनी देई खोडी रे,
१ गर्व धरितां तो पाहा दिव्य दूत रे,
दूतपणाला मुकुनी झाला भूत रे. ध्रु०
२ हावा जाउनी निषिद्ध झाडाखालीं रे,
फळ भक्षुनी पतिसह भ्रष्ट झाली रे. ध्रु०
३ देव नाहींच नास्तिक ह्मणताती रे,
गर्व धरूनी निराशें नरकां जाती रे. ध्रु०
४ गर्विष्ठांला ईश्वरें केलें खालीं रे,
ऐसीं प्रमाणें शेंकडों फळा आलीं रे. ध्रु०

---

269. The Humble Exalted.

२६९. नम्रतेला सन्मान.
Hindu M. अभंग.

१ तुज वाटे व्हावा मान,
तर बा धर नम्रपण.
२ नम्रपणा घेती अंगीं,
दूध भात खाती संगीं.
३ साह्य व्हावया सर्वांनीं
जीभ ठेव लोण्यावाणी.
४ नम्रपणा माल घरचा,
लागे तेव्हां जाउनि खर्चा.

५ जर व्हावा तुज किन्ता,
पाहा ख्रीस्ताकडे आतां.

---

270. Humility Inculcated.

## २७०. नम्रतेपासून लाभ.

Hindu M. पद. (पिलू, त्रिवट).

ध्रु० होई होई मानवा नम्र होई रे,
गर्व टाकुनी लवकरी भरी सोई रे.
१ नम्र मनुष्य आवडे सर्व लोकां रे,
गर्विष्ठाचिया कामाला बसे झोका रे. ध्रु०
२ अंतःकरण जयाचें फुटलेलें रे,
वस्ती करितों त्यामध्यें प्रभु बोलि रे. ध्रु०
३ भरी स्वभाव जो कोणी लेंकराचा रे.
स्वर्गीं करील प्रवेश प्रभु त्याचा रे. ध्रु०
४ लीनपणाचा जर किन्ता तुज व्हावा रे,
ख्रीस्त प्रभु हा सद्गुरु स्वीकारावा रे. ध्रु०

---

271. Humility Sought.

## २७१. नम्रतेचीं लक्षणें.

Hindu M. अभंग.

१ नम्र होतां सत्य शास्त्र
मनीं बिंबतें सर्वत्र.
२ संशयाची व्हाया फोड
बोले नम्रपणा गोड.
३ आढेवेढे तर्कटाना
तुच्छ मानी नम्रपणा.
४ बोध, निषेध ऐकतों,
सत्य घ्याया सिद्ध होतों.
५ सत्य घ्याया नम्रपणा,
भीति कोणाची धरिना.
६ ऐसा नम्रपणा माला
ख्रीस्ता शिकीव दयाला.

---

272. Humility.

## २७२. नम्रता. २ शमु. २४:१७.

Hindu M. अभंग.

१ नम्र होतां आत्मस्थिति
पापरूपच दीसती.
२ जों जों करावा विचार
मनीं दीसतो अंधार.
३ पापें पूर्वींचीं सकळ
दिसताती अमंगळ.
४ भ्रष्ट दुष्ट मीं सर्वांत,
मानी नम्र हा निभ्रांत.
५ ऐसी स्थिति माझी मला
ख्रीस्ता दाखीव दयाला.

---

273. Sorrow Profitable.

## २७३. दुःखांवरून भक्ताचें कल्याण.

Hindu M. अभंग.

१ दुःख लागतां भक्ताला
जाळी देहिकपणाला.
२ सर्व सुखांचा सागर,
तया शोधितो सत्वर.
३ दाबी दैहिक वासना,
मानी आत्म्याच्या प्रेरणा.
४ खऱ्या, शुद्ध, अविनाशी,
शोधी अवीट सुखासी.

---

274. Sorrow Profitable.

## २७४. दुःखांवरून भक्ताचें कल्याण.

Hindu M. आर्या (गीति).

१ जों जों सुवर्ण अग्नीं
पडतें तों तों अधीक हीण जळे;
तद्वत दुःखपरीक्षीं
सुभक्त आत्मिक गुणांत कीं उजळे.
२ शक्ति, औषध, शस्त्रा,
परीक्षितां वास्तवीक गूण कळे;
भक्तस्वरूप कसें तें
दुःखाच्या महिमाजीं हो उकळे.
३ वृक्ष खसी करण्यानें
अधिक सुफळ, भारदार उठतात;
जातां निर्जिव खांद्या,
नूतन पल्लव अनेक फुटतात.

४ सुचिता स्वलेंकरासीं
मार्गावर आणितो जसा छडिनें;
तद्वत तो प्रभु भक्ता
दुखें लावुन सुधारि ताताडिनें.

---

275. Little Things.

## २७५. लहान गोष्टी.

6, 5. ६,५ अक्षरी.

१ अणुरेणु यांचा
होई पृथ्वीगोळ,
लाहान्या थेंबांचा
तो समुद्र खोळ.

२ तसे क्षण हेहि
जरी लाहानाळ,
तरी त्यांचा होई
सनातन काळ.

३ तसीं पापें मुलांस
दिसती लाहान,
तरी तेणें जनांस
दंड हो महान.

४ ममतेचीं कृत्यें
केलीं सर्वांप्रत,
तरी हीच पृथ्वी
होई स्वर्गवत.

५ शास्त्रबिजें टाका
सर्व देशीं दूर,
सांगा सर्वां भाका,
क्षेम होई थोर.

---

276. Directions to the Eyes, &c.

## २७६. नेत्रांदिकांस सुबोध.

11s. ११ अक्षरी.

१ डोळ्यानो, डोळ्यानो, कोठें पाहावें
दुष्कर्म शोधाया कधीं न जावें,
देवाची दृष्टि तुझावरी असे,
काहीं अशुद्ध त्या सोसत नसे.

२ हातानो, हातानो, सेवा कोणाची
करितां, मोडुनी आज्ञा देवाची?
प्रीतीनें त्याच्या सेवेंत राहावें,
देवाच्या साह्यानें सर्व करावें.

३ जिभेगे, जिभेगे का बोलतिसी
रागें, कीं जनास दुखवितिसी?
मधुर भाषण, सत्य बोलावें,
आकाशवत् हें जग करावें.

४ पायानो पायानो कसें चालावें?
पाश चहुंकडे, किती जपावें ?
सुमार्गी जाहो, सुख पावयाला,
ख्रीस्ता अनुसरा स्वर्गीं जायाला.

५ हृदया, हृदया, धीर धरावा,
"चांगला वांटा" आतां निवडावा,
ख्रीस्ताला मान्य होऊनी राहावें,
आकाशीं तुझेंहि नाम असावें.

---

277. The Body given to Christ.

## २७७. लेंकरांचें शारीरिक अर्पण.

8, 7. ८, ७ अक्षरी.

१ नेत्र दोन मला दिल्हे
सत्य मार्ग दिसाया,
दोन कानहि मिळाले
शास्त्रवाक्य ऐकाया.

२ दोन पाय चालायाला
त्या सुमार्गी मी लावीन,
दोन हात खपायाला
ते प्रभूला मी अर्पीन.

३ एक जीभ पाहा मला
ख्रीस्तनाम सांगाया,
त्याच प्रिय तारकाला
हें हृदय अर्पाया.

४ प्रिय प्रभू येशू, तुला
सर्व देऊं इच्छितों,
साह्य हो तूं मज बाळा,
तुझी सेवा धरितों.

278. WORK FOR JESUS.

**२७८. ख्रीस्ताकरितां झटणें.**

Peculiar. निराळा प्रकार.

१ आज प्रभूकरितां
झट, साह्य मागतां.
प्रभु असे जवळी,
आशा कां सोडिली?
ध्रु० प्रभु तुजला आधार,
तुझा पक्ष धरणार;
त्यावरी चिंता टाकिली
येई फळ सुवेळीं.
२ झट आतां दुपारीं,
रात्र पडे तोंवरीं;
प्रभु कामा लावितो
यत्नाहि पाहतो. ध्रु०
३ झट येई, अंधःकार,
तुझा काळ संपणार;
धन्याची भेट तूं घेसी,
विश्वासू ठरसी. ध्रु०

---

279. MURMUR NOT AT GIVING.

**२७९. कुरकूर करूं नको.**

Hindu M. आर्या.

१ देवा देण्यासाठीं,
कां करितोसी हमेश कुरकूर;
प्रभु हा नाहिं भिकारी,
प्राणी अगणीत पोषि भरपूर.

---

280. THE WIDOW'S TWO MITES.

**२८०. विधवेची दमडी.**

लू. २१:१-४.

Hindu M. साकी.

१ आनंदानें दोनच टोल्या
विधवेनें टाकिल्या,
परि त्या प्रभुनें मान्य करूनी
आवडिनें घेतील्या.
२ तुझि जर तैसे प्रभुला स्मरूनी
देतां निज गोडीनें,
तरि तें प्रभु हा मान्य करूनी
घेई बहु आवडीनें.

---

## V. PENITENTIAL HYMNS.

# ९. पश्चात्तापी याच्या भावना.

281. DEEP CONTRITION.

"Jesus save my dying soul."

**२८१. पश्चात्ताप.**

7s. ७ अक्षरी.

१ येशू, पाहा, बुडतों,
तुझ्या पायां पडतों,
कृपें मला तूं उद्धर,
माझीं पापें क्षमा कर.
२ प्रभू ख्रीस्ता कृपामय,
तूंच मला हो आश्रय,
दे तूं जीवनाचें दान,
माझें कर समाधान.
३ माझीं पापें जाणसी,
तूं निष्पापी असती,
तुझें पुण्य मागतों,
दुजी आशा टाकितों.
४ येशू, तूंच तारिता,
मोठी तुझी ममता,
पायां पडतों लाचार,
प्रभू, मला दे उद्धार.

---

282. IMPLORING MERCY.

"Show pity, Lord; O Lord, forgive."

**२८२. कृपा मागणें.** स्तोत्र ५१.

L. M. ८ अक्षरी.

१ हे देवा, माझी क्षमा कर,
रागावूं नको मजवर,

अनंत तुझी करुणा,
दयेनें ऐक प्रार्थना.

२ माझे अन्याय झाले थोर,
व मला योग्य दंड घोर,
हे देवा, तरी तूं उदार,
तुझ्या कृपेला नाहीं पार.

३ खोडुनी पाप सगळें
तूं मला कर मोकळें,
पापाचा भार वाटतो,
त्यामुळें जीव रडतो.

४ म्या अपराध केले फार,
धिक्कारिलेहि उपकार,
हीं पातकें पत्करितों,
तीं आठवितां लाजतों.

५ जरी त्वां असा पातकी
टाकुनी दिल्हा नरकीं,
तरी अन्याय नसतां,
तुला न दोष लागता.

६ परी, हे प्रभू, क्षमा कर,
मज पाप्याला तूं उद्धर,
शास्त्रवाक्यांची आठवण
देउनि शांत कर मन.

---

283. The Penitent.

"Lord, I am vile, conceived in sin."

२८३. पश्चात्तापी. स्तोत्र ५१.
L. M. ८ अक्षरी.

१ हे देवा, मी कुटीळ फार,
पापी जनांचा भागीदार,
मुळीं पापांत जन्मलों,
बुद्धीनेहि बिघडलों.

३ जाणुनी आज्ञा ईश्वरी
कीं सत्य व्हावें अंतरीं,
झालोंच मी अनितिमान्,
अनुपकारी, गर्ववान्.

३ हे देवा, नवें कर मन,
तूं मोड माझें दुष्टपण,
धू माझ्या अंतःकरणा,
दे मला शुद्ध भावना.

४ पाहा, मी पायां पडतों,
दुर्भावामुळें रडतों,
मी मोठा पापी, निरूपाय,
आपणासाठीं करूं काय?

५ पशु कीं पक्षी अर्पिले,
पाणी कीं रक्त शिंपिलें,
तरी हें पाप जाईना,
हृदय शुद्ध होईना.

६ हे प्रभू ख्रीस्ता दयावान्,
तुझेंच रक्त मोलवान्,
तें मज पातक्याला लाव,
तूं कर पुरता निभाव.

---

284. The Penitent.

"O that my load of sin were gone."

२८४. पश्चात्तापी.
L. M. ८ अक्षरी.

१ जिवाला माझा पापभार
अत्यंत जड लागतो,
हे प्रभू ख्रीस्ता, मी लाचार,
पायां पडुनी मागतों.

२ हे येशू, तुझी प्रीति दाव,
जिवाचें कर शांतवन्,
दे मला आपला स्वभाव,
तूं लीन कर माझें मन.

३ पापाचीं बंधनें तोडून
तूं मला कर मोकळें,
माझें हृदय पालटून
तुजसीं जडो सगळें.

४ तुझाच कित्ता पाहुनी
मी नेहमी अनुसरेन,

व तुझा खांब वाहुनी
आनंद सर्वदा पावेन.

५ हे प्रभू, शक्ति पुरवीं,
मी स्वतां आहें निराधार,
मुक्तीची वेळ पोंचवीं,
तूं माझा कर पूर्णोद्धार.

---

285. BESEECHING FOR MERCY.

## २८५. कृपा आग्रहानें मागणें.

8s. (Abhang.) ८ अक्षरी, (अभंग).

१ प्रभू,तारका दयाळू,
मित्रा अती ममताळू,
मी पापानें कष्टी आहें,
तारणाची कृपा चाहें,
दोष आहे, मी पत्करीं,
दंड यावा मजवरी,
परी पडें तुझ्या पायां,
कृपा कर, येरे साह्या.

२ कोणापासीं म्या पळावें?
कोणा दुःख कळवावें?
तूंच जीवनाचा दाता,
तूंच पतितांचा त्राता.
खांबीं क्लेश भोगिलेसी,
तेथें रक्त गाळिलेंसी,
तें गळालें मजसाठीं,
माझें ओझें तुझ्या पाठीं.

३ आतां नाश कसा व्हावा?
तुला डाग कां लागावा?
प्रभू, प्रभू, कर कृपा,
सोड, सोड माझ्या पापा.
आतां दावसील प्रीति,
तरी होई मोठी स्तुति,
दूत बहुमान देती,
स्वर्गवासी कृपा गाती.

---

286. MY EVIL NATURE.

## २८६. माझा दुर्भाव.

L. M. ८ अक्षरी.

१ अहा! हें कसें घडतें
कीं मनीं पाप भरतें,
विचार शुद्ध नसती,
व जीभ रागें बोलती.

२ हा कसा माझा हो दुर्भाव,
कीं कोणी घेतां माझें नांव
तेव्हांच दावा धरितों,
मी सुड घ्याया पाहतों.

३ येशू या जगीं राहिला
तों नम्रतेनें वर्त्तला,
मुकेंच सोसी हेळणा,
असा मी किंचा घेईना.

४ वैऱ्यांचें हित करितां,
त्यांसाठीं जीव अर्पितां,
अवाच्य दावी करुणा,
मी दुष्ट कीं तें स्मरेना.

५ प्रभू ये अंतःकरणीं,
लागलों तुझ्या चरणीं,
दे मला तुझा प्रेमभाव,
तुझ्या सेवेस मला लाव.

---

287. THE PENITENT.

"Depths of mercy can there be?"

## २८७. पश्चात्तापी.

7s. ७ अक्षरी.

१ येशू दयासागरा,
पाहा मज पामरा;
देवक्रोध चुके काय?
मला कोणता उपाय?

२ कृपा म्या धिक्कारिली,
ममता अव्हेरिली,
हितबोध ऐकेंना
फार केली हेलना.

३ प्रभु, मला फिरवी.
पापामुळें रडवी,
मला खेद वाटो फार,
प्रिय प्रभू, दे उद्धार.

---

288. Depth of Mercy.

## २८८. अगाध दया.

7s. ७ अक्षरी.

१ कृपानिधि, दया कर,
दया कर मजवर.
ध्रु० येशू करी प्रीति फार,
करी माझा अंगिकार;
येशू करी माझा अंगिकार.
२ माझी क्षमा करूनी
पूर्ण कर खंडणी. ध्रु०
३ बुडतों तुझ्या शिवाय,
कर पुरता उपाय. ध्रु०
४ तार दयासागरा,
तार मज पामरा. ध्रु०

---

289. Confession of Sin.

## २८९. पाप कबूल करणें.

Hindu M. अभंग.

१ तुझ्याच विरूद्ध केलीं पापें देवा
तूं प्रसाद मेवा क्षमाशीळ.
२ कबूल मी तुज सर्वच अन्याय,
शांतीचा उपाय हाची वाटे.
३ उद्धटपणानें ह्मणतों मी न्यायी,
तेव्हां पाप होई अधिकच.
४ तुझ्याच प्रतापें होईन मी न्यायी,
लागें चरणाठायीं सद्गुरूच्या.
५ परी तो सद्गुरु मज दाखवावा,
भाव म्या ठेवावा जयावरी.

---

290. Seeking Peace.

## २९०. शांतीचा शोध.

Hindu M. पद.

ध्रु० मज शांति देईल कोण?
कोणी तरी सांगा हो.
१ मनाचें हरावयासीं दुख
ह्मणूनि बहु वासिलें सुख,
लागली तारणाची भूक,
कैसें सुख होई मातें. ध्रु०
२ बहुतच केले मी उपाय,
तरी तो नच सांपडे सोय.
धरूं मी कोणाचे हो पाय?
जेणें जाय दु:ख माझें. ध्रु०
३ पापओझें झालें फार,
सोसत नाहीं याचा भार,
देईल कोण मजला आधार?
सुख अपार जिवनाचें. ध्रु०

---

291. I am Lost.

## २९१. मी हरलों.

Hindu M. पद. (परज, एका).

ध्रु० हरलों हरलों मी प्रभु देवा,
कैचि घडे तव सेवा.
१ पापामधिं मन लोळे,
झाल्यावरतिं उघडती डोळे. ध्रु०
२ दृढ निश्चय म्यां केले,
परि ते समयीं व्यर्थच गेले. ध्रु०
३ टोंची विवेक कांटा,
करितां बोध फुटे मज फांटा. ध्रु०
४ देवळिं नेत्र उघडती,
तेथुन निघतां झांपड पडती. ध्रु०
५ ऐकुन कानहि किटले,
विटलें मन परि नाहीं फुटलें. ध्रु०
६ प्रीति वचन आठवितों
तव परि एकिकडे ठेवीतों. ध्रु०

७ मन हें मज अकळेना.
कळतें या, पण कांहिं वळेना. ध्रु०
८ हें मन बहु बेशरमी,
परि घट किति मारूं या शरमी. ध्रु०
९ तुजविण दुष्ट मनाला
आकळवेना अनुभव आला. ध्रु०
१० तार मला प्रभु आतां,
पापें कबूल करितों ताता. ध्रु०

---

292. "Oh Wretched Man!"

## २९२. अरेरे मी कष्टी माणुस !

Hindu M. पद. (खमाज, त्रिवट).

ध्रु० नको प्रभु तरि मजला सोडूं,
शरण पतित मी तुजला रे.
१ क्षणोक्षणीं मी पापें करितों,
मन हें मज अकळेना रे;
काय करूं? हा जिव तगमगतो,
तव पद्रीं नाहीं रुजला रे. ध्रु०
२ सुभावनेची, कुभावनेची
हृदयीं झटपट होतां रे;
कुभावनेला वश मी होतों,
वण माझा ना बुजला रे. ध्रु०
३ अरे, अरे, मी माणुस कष्टी!
मर्त्य तनूपासुन या रे;
कोण करी मज मुक्त? अहा प्रभू
तुजविण जिव हा सुजला रे. ध्रु०
४ आमुच्या प्रभु ख्रीस्ताकडुनी मी
स्तुति करितों देवाची हो
स्वतां मला प्रभुसेवा अवडे,
पण हा देहच कुजला रे. ध्रु०

---

293. Lord, accept Me.

## २९३. प्रभू मला गोड कर.

Hindu M. पद. (पिलू, दीपचंदी).

ध्रु० प्रभु, आतां मजला करुन घेई गोड.
१ पापें छपाया बहु युक्ति केल्या,
परि त्वां उघड केलि खोड. ध्रु०
२ तव दृष्टि पुढुनी जावें, परी तूं
सर्वज्ञ, धरिलेंस, सोड. ध्रु०
३ अति बेशरम मी, तव नाम प्रीति,
कर माफ, मन द्वाड फोड. ध्रु०
४ जाणुनी नेणें, निरुपाय झालों,
एखादि मज सांग तोड. ध्रु०
५ अत्यंत कडु मी, इतरां न करवें,
परि तूं सबळ करसि गोड. ध्रु०
६ ख्रिस्तामुळें बा, मज उद्धरी, कां?
ख्रिस्ताकडे माझि ओढ. ध्रु०

---

294. A Prayer for Salvation.

## २९४. तारण मागितलें.

Hindu M. पद.

ध्रु० प्रभु, मज तारण दे पतिताला.
१ पुण्य नसें प्रभु संग्रहि माझ्या,
पाप परि अहिताला. ध्रु०
२ दडपतसें मी बहु अघभारें;
जाइन मृत्युपथाला. ध्रु०
३ वैद्य नसे प्रिय तुजविण ऐसा
सुधरिल पापक्षताला. ध्रु०
४ सर्व समर्था इच्छिसि तूंही
स्मरतर याहि तिताला. ध्रु०
५ काय करूं मी? सांग मला प्रभु,
सुख व्हाया जिविताला. ध्रु०
६ पतितांचा तूं मित्र अहा, दे
कान विनंति गिताला. ध्रु०

---

295. I will arise, &c.

## २९५. उठुनी जाईन.

Hindu M. अभंग.

१ "पित्याकडे आतां उठुनी जाईन"
दुःख निवेदीन, "म्हणेन मी.
२ आकाशाविरुद्ध तुझिया समोर
पातक अघोर केलें, बा, म्यां.

३ आतांपासून मी पुत्र तुझा कांहीं
बापा, योग्य नाहीं ह्मणवावया.
४ मोलकऱ्यासम मज ठेव" आतां,
प्रार्थितों मी ताता, कृपा करीं.

---

296. I have sinned, &c.

## २९६. म्यां पातक केलें.

Hindu M. पद.

ध्रु० मज अंगिकारीं हे ताता,
तुज शरण आलों मी आतां.
१ "विरुद्ध नभाच्या,समक्ष तुझ्या म्यां
केलें पातक" तूं बा दाता. ध्रु०
२ "तव पुत्र मी हें ह्मणणें उचित ना;
दासासम मज ठेवी नाथा." ध्रु०
३ सुकरें टरफलें खातात तीं मी
गेलों त्रासुन खातां खातां. ध्रु०
४ तनु काष्ठ झाली, वस्त्रेंहि चिंध्या;
ठेवितों तव चरणीं माथा. ध्रु०
५ अक्षम्य पापें केलीं खचित म्यां;
दुसरा तुजविण कोण त्राता. ध्रु०

---

297. Turn me not away.

## २९७. मला त्यागूं नको.

Hindu M. पद.

ध्रु० सदया मजला अंगीकार,
करुणा कर बापा.
१ माझा जिरला सगळा माज,
मूर्खानें म्यां सोडलि लाज;
परि तूं प्रेमामृत मज पाज,
सखया आज त्यागुं नको. ध्रु०
२ तुजला दुःख दिलें म्यां फार,
केले तुच्छ तुझे उपकार,
करुनी वेडे वेडे चार
पाप अपार केलें म्यां. ध्रु०

---

298. Lord, have Mercy.

## २९८. प्रभू, दया कर.

Hindu M. पद.

ध्रु० प्रभू, दया कर मज पाप्यावर,
शरण मी आहें, दीन पामर.
१ फार फार मी इच्छा करितों,
शक्ति माझी चालेना;
सैतान मजला फार आडवितो,
भक्ति कांहीं घडेना. ध्रु०
२ धनद्रव्याची आशा मोठी,
मजला भूल घालिती;
सोडूं पाहतां पुढेंच येती;
पापामध्यें पाडिती. ध्रु०
३ आईबाप भाऊ बहिणी,
सारे अणखी सोयरे,
नांवें ठेवुनी ह्मणती मजला,
ख्रिस्ती होऊं नयेरे. ध्रु०
४ दास तुझा मी भाकीं करुणा,
मोह सर्व वारीरे;
शिष्य मजला मान हे ख्रिस्ता,
मज दीनातें तारीरे. ध्रु०

---

299. Prayer of the Penitent.

"God of mercy, God of grace."

## २९९. पश्चात्तापी याची प्रार्थना.

7s. ७ अक्षरी.

१ देवा, बापा कृपावान्,
ऐक माझी प्रार्थना,
मी अत्यंत दैन्यवान्
मागतोंच करुणा.
२ खरा मी भटकलों,
केलें मोठें मूर्खपण,
सर्वथा बिघडलों,
भ्रष्ट झालें माझें मन.
३ उडविला तुझा माल
उधळ्याच्या सारिखा,

स्वैरी चाले सर्व काळ,
मानींना संबोधका.
४ तुझी स्तुति करींना,
तुच्छ केले उपकार,
ख्रीस्तपाय धरींना,
म्या धिक्कारिला उद्धार.
५ ईश्वरा, मी पापी थोर,
तुझा पुत्रसा नाहींच,
पडतों तुझ्या समोर
दुष्ट पापी अति नीच.
६ तरी बापा कृपावान्,
दाव आतां करूणा,
मी अत्यंत दैन्यवान्
करितों ही प्रार्थना.

---

300. The Penitent's Prayer.
"Prince of life, all power is thine."

## ३००. पश्चात्तापी याची प्रार्थना.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ हे जीवनाच्या राजा थोर,
तूं मला हो आश्रय,
सोडुनी माझा दंड घोर,
तूं शुद्ध दे हृदय.
२ तूं लिही माझें नीच नांव
जीवनी पुस्तकीं,
तुझ्या सेवेंत मला लाव,
मी मोठा पातकी.
३ मला उद्धरल्यावरून
तुला होईल मान,
अस्या पाप्याला स्वीकारून
तूं किती दयावान !

---

301. Pardon Implored.
"Thou Lord of all above."

## ३०१. क्षमा मागणें.

S. M. ६, ८ अक्षरी.

१ हे देवा गौरवी,
मी पापी आहें थोर,
अनंत कृपा दाखवी,
न लागो दंड घोर.
२ जीं पापें घडलीं
तीं नको आठवूं,
ख्रीस्तानें मुक्ति साधिली,
तूं नको बुडवूं.
३ पापांचा मोठा भार
आहेच मजवर,
दंडाचें भय अनिवार,
हे देवा, क्षमा कर.
४ करुनी करुणा
दुःखाला शांतवी,
दावुनी प्रेमभावना
तूं मला हर्षवी.

---

302. Sin Lamented.
"With tears of anguish I lament."

## ३०२. पापामुळें रडणें.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ हे ईश्वरा, तुझ्या समोर
मी पडतों लाचार,
अनुपकारी, पापी थोर,
दुष्कर्मी अनिवार.
२ कदापि दुष्ट नव्हता
या मजसारिखा;
दुर्वासना, असत्यता,
व लोभ कितका.
३ हे प्रभू, असें दुष्टपण
चालावें कोठवर ?
तूं मोड माझें धट्टपण,
हृदय नवें कर.
४ हे प्रभू, तूं सामर्थ्यवान,
दुर्बुद्धि घालवी,
मी अति दीन बंदिवान,
तूं मला सोडवी.

---

303. FLEEING TO CHRIST.
"How sad our state by nature is."

### ३०३. ख्रीस्ताला शरण जाणें.
C. M. ८, ६ अक्षरी.

१ जनांची कशी अवस्था,
क्लेशित अनिवार;
सैतान त्यांस बांधितां
दबावितो अपार.
२ तरी शास्त्रांत ईश्वरी
कृपेचा आहे ठाव,
पाप्यांनो, या, प्रभूवरी
ठेवा हो पूर्ण भाव.
३ हे प्रभू, तें बोलावणें
हर्षानें ऐकिलें,
चालीव माझें झटणें,
कां धैर्य खुंटलें.
४ अघोर पापें लागलीं
जिवाला मनस्वी,
स्वर्कें खोड सगळीं,
हे प्रभू गौरवी.
५ मी तुझ्या पायां पडतों
दुर्भाग्यवान् लाचार,
व दुजी आशा सोडितों,
हे प्रभू, दे उद्धार.

304. CARELESSNESS BEWAILED.

### ३०४. कृतघ्नतेमुळें दुःख मानणें.
Hindu M. पद. (धनाश्री, एका).

ध्रु० ऐसें असतां स्मरिलें नाहीं देवा हो,
व्यर्थ दवडिलें आयुष्या कैंची सेवा हो.
१ कैसा उदरीं मातेच्या जन्म दिला हो,
बहु प्रयासें प्राण हा वाढवीला हो. ध्रु०
२ पृथ्वीवरतीं मजला जन्मवीलें हो,
दुःख संकटें रोगही निवारीले हो. ध्रु०
३ अन्न वस्त्रही पुरविलें योग्य काळीं हो,
कधीं उपाशीं निजविलें नाहीं खालीं हो. ध्रु.
४ निरुपायीं पाहुनियां भ्रष्ट झाला हो,
जगीं स्वपुत्रा धाडिलें ताराया़ला हो. ध्रु०
५ दंड पुत्रासी लाविला पापियांचा हो,
प्रलय लोटिला त्यावरी यातनांचा हो. ध्रु०
६ मंदक्रोधी होउनियां वाट पाही हो,
बहु प्रसादाची दया गेली नाहीं हो. ध्रु०

305. THE BROKEN HEART.
"Now to thine altar, Lord."

### ३०५. चेंचरलेलें हृदय.
स्तोत्र ५१:१७.

S. M. ६, ८ अक्षरी.

१ हे देवा कृपामय,
मी पायां पडतों,
चेंचरलेलें जें हृदय
तें तुला अर्पितों.
२ देवाचा कोंकरा
त्यावरी माझा भाव,
आश्रय नाहीं दुसरा,
घेईन त्याचें नांव.
३ माझीं सुकृतें काय?
तीं मळयुक्त हीन;
ख्रीस्तानें साधिला उपाय,
तेणें तरेल दीन.

306. THE PRODIGAL REPENTS.

### ३०६. उधळ्याचा खरा पश्चात्ताप.
Hindu M. अभंग.

१ नम्र पश्चात्तापी होउनी जाईन,
कबूल करीन सर्व दोष.
२ वारसा कीं हक्क, वांटा न म्हणेन;
कृपाच मागेन लीनतेनें.
३ चाकराप्रमाणें ठेवियेलें तरीं,
कृपा मजवरी मानीन मी.
४ मेजावरील तो दिला जरी चूर,
कृपा भरपूर मानीन ती.

५ सदय पिता तो प्रेमळ अंतरीं,
कृपा मजवरी करीलच.

---

307. CONVICTION OF SIN.
"My former hopes are fled."

## ३०७. पापाविषयीं दुःख.

S. M. ६, ८ अक्षरी.

१ आशा बुडाली, जाण,
मनांत सुटे भय,
मी पापामुळें दैन्यवान,
मेलोंच, हा निश्चय.

२ कोठें लपवतें?
गाजती गर्जना,
सत्शास्त्र दंड सांगतें,
लागती यातना.

३ हा दंड पापियास
किती हो विकराळ!
तरी हें सुचे हृदयास,
"होणार क्रोध टाळ."

४ ही शास्त्रसूचना
मनाला आवडे,
देवाला होई करुणा,
जाईन त्याकडे.

५ पापें पत्करुनी
पडेन त्यासमोर,
ख्रीस्ताला अंगीकारुनी
मागेन कृपा थोर.

---

308. INGRATITUDE TO GOD.
"Is this the kind return?"

## ३०८. अनुपकारीपणा.

S. M. ६, ८ अक्षरी.

१ देवाचे उपकार
हे तुच्छ मानूं काय?
धिक्कारूं एवढा उद्धार,
असुनी निरुपाय?

२ पापानें हृदयें
हीं किती घटलीं!
श्रेष्ठ बापासीं निश्चयें
तीं कसीं फिरलीं!

३ हे प्रभू जीवनी
आह्माला नवें कर,
हा घट्टपणा मोडुनी
मनांत प्रीति भर.

४ स्वपापें आठवून
आह्मी रडावें फार,
देवाची कृपा मिळवून
मानावे उपकार.

---

309. ALL GIVEN TO CHRIST.

## ३०९. ख्रीस्ताला अर्पण.

S. M. ६, ८ अक्षरी.

१ सर्वस्व अर्पाया,
धराया ख्रीस्तपाय,
जगाची आशा सोडाया,
उशीर करूं काय?

२ नाहीं, मी वळतों,
मन पाझरलें,
ख्रीस्ताचा प्रेम ओढितो,
तेणेंचि जिंकिलें.

३ सर्वस्व अर्पितों,
मित्रहि, जीवप्राण,
प्रिय प्रभूला धरितों,
तो माझें करी त्राण.

---

310. GOD A REFUGE.
"When overwhelmed with grief."

## ३१०. दिनाला ईश्वर आश्रय.

S. M. ६, ८ अक्षरी

१ दुःखानें भरला
जीवात्मा बुडतो,
तों निरुपायी दुबळा
मी वर पाहतों.

२ त्या खडकावरी,
हे प्रभू, मला ने,
मोठ्या पंखांनें ईश्वरी
दे पूर्ण झांकणें.

३ मी ईश्वरासमोर
राहीन सर्वकाळ,
कां प्रभू, तूं आश्रय थोर,
तूं रक्षणाची ढाल.

४ तूं माझ्या प्रार्थना
नेमानें ऐकशी,
भक्तांवरी तूं करुणा
अनंत करिशी.

---

311. Imploring Mercy.

## ३११. कृपा मागणें. स्तोत्र ५१.

7s. ७ अक्षरी.

१ देवा, माझी क्षमा कर,
कृपा होवो मजवर,
मोठी तुझी करुणा,
ऐक माझी प्रार्थना.

२ माझीं पापें झालीं थोर,
मला योग्य दंड घोर,
देवा, माझीं पापें तोड,
माझी दुष्ट बुद्धि मोड.

३ किती चाललों मोकार,
तुच्छ केले उपकार,
हात भार वाटतो,
जीव दुःखें रडतो.

४ जरी असा पातकी
टाकिलासी नरकीं,
तरी न्याय पहातां
तुला दोष नसता.

५ परी प्रभू, क्षमा कर,
मज पाप्या तूं उद्धर,
कांहीं आशा सुचवी,
मन शांत राहवी.

---

312. Ye must be Born Again.
"Awaked by Sinai's awful sound."

## ३१२. परतून जन्मलें पाहिजे. यो. ३:३.

C. P. M. ८, ८, ६ अक्षरी.

१ सीनाची गर्जना अघोर
ऐकुनी भय सुटे थोर,
आश्रय मिळेना;
कानांत गाजे वाक्य तें,
"पुन्हा जन्मावें लागतें,
कीं होई यातना."

२ त्या नेमशास्त्र वाहिलें,
तों त्यांत शाप देखिले
न होई समाधान;
कां शास्त्र सर्व सांगतें,
"पुन्हा जन्मावें लागतें,"
मनाला खोंचे बाण.

३ भक्तांनीं ख्रीस्ता वंदुनी
गायिलीं त्याचीं करणीं,
हें ऐकें वारंवार;
तरी हें वाक्य राहतें,
"पुन्हा जन्मावें लागतें,"
मी होतों निराधार.

४ असा मी होतों असतां
ख्रीस्तानें केली ममता,
किती हो प्रेमभाव!
मी जो दंडींच ठरलों,
तो कृपें पुन्हा जन्मलों,
गाईन त्याचें नांव.

---

313. Fleeing to Christ.
"O Thou that hear'st the prayer of faith."

## ३१३. ख्रीस्ताला शरण जाणें.

C. P. M. ८, ८, ६ अक्षरी.

१ हे देवा, ऐक प्रार्थना,
दिनाची येवो करुणा,
मी पायां पडतों;

मी स्वतां अति निराधार,
ख्रीस्तानें केला जो उद्धार
तो मात्र मागतों.

२ तो पातक्यांचा बदला,
माझ्या ठिकाणीं वधला,
पुण्याचा तोच ठाव;
तें पुण्य मला मोजुनी,
पापाचा दंड सोडुनी,
अनंत कृपा दाव.

३ पवित्र आत्मा पाठवी,
तेणें मनाला शांतवी,
संकटीं हो आधार;
दावुनी प्रेम ईश्वरी
मला हें सांग अंतरीं,
"मी करितों कैवार."

४ तूं असें प्रेम दाविल्यास
भिणार नाहीं मरायास,
मी टेकें तुजवर,
जगाचें सुख टाकुनी
प्रभूकडे निरखुनी
हर्षें चढेन वर.

---

## VI. THE CHRISTIAN.

# ६. ख्रिस्ती मनुष्याच्या भावना.

### 314. THE DETERMINED CHOICE.

"Now I resolve with all my heart."

### ३१४. सुनिश्चय.

L. M. ८ अक्षरी.

१ हा माझा झाला हो निश्चय,
देवाची सेवा मी करीन,
भक्तांचा तोच सदाश्रय;
तयाचे पाय मी धरीन.

२ प्रभूचें धरितांना प्रेम
मानीन त्याचा अधिकार,
हर्षानें पाळितांना नेम
ते भारी नाहीं मोजणार.

३ माझ्या सदाचारावरून
प्रकाश होवो दुर्जनां,
तेणें बहुत सुधरून
लागोत देवभजना.

४ सुमार्गीं थकूं नये मी,
तो सोडूं नये सर्वकाळ,
हे देवा बापा, नेहमीं
तूं कर माझा प्रतिपाळ.

---

### 315. THE SURRENDER.

"Lord thou hast won, at length I yield."

### ३१५. वश होणें.

L. M. ८ अक्षरी.

१ हे प्रभू, हात टेंकितों,
मी वैरभाव टाकितों,
दावुनी प्रीति अतिशय
त्वां माझा केला पराजय.

२ त्वां दंड दाविला अघोर,
तरी मी होतों हट्टखोर,
प्रभूचें रक्त पाहिलें
तेव्हांच मन खोंचलें.

३ हे प्रभू, तुझा आहें मी,
तुला मानीन नेहमीं,
तूं तारणाचा दाता थोर,
मी नमतों तुझ्यासमोर.

---

### 316. PARDON OF THE REPENTANT.

### ३१६. परतलेल्या पातक्याची क्षमा.

S. M. ६, ८ अक्षरी.

१ मी होतों पहिलें
भटकें मेंढरूं,

मेंढपाळाला द्वेषिलें;
　मी मूर्ख कोंकरूं.
उनाड होतों पोर,
　बापा न देई मान,
घराहुनी जाउनी दूर
　मी हिंडें रानोरान.

२ बापानें शोधिलें
　त्या हट्टी लेंकरा,
मेंढपाळानें धुंडिलें
　त्या मूर्ख कोंकरा.
जों शोध लागला
　तेंव्हां मी मृतप्राय,
सप्रेम त्यानें दाविला,
　व केलाहि उपाय.

३ प्रीतीनें बोलुनी
　मला उचालिलें,
माझ्या घायांला बांधुनी
　खायाला दिधलें.
मळहि काढिला,
　मी झालों शुद्धप्राण;
जो उधळ्या भटकला,
　तो घरीं आला, जाण.

४ येशू हा मेंढपाळ,
　तयानें केला प्रेम,
स्वरक्तें धुउनी दयाळ
　दिल्हें अनंत क्षेम.
येशूनें शोधुनी
　माघारें आणिलें,
स्वकळपांत घेउनी
　मला संभाळिलें.

५ आतां न हिंडतों
　भटकें मेंढरूं,
प्रिय प्रभूचें ऐकतों,
　मी त्याचें कोंकरूं.
मी नाहीं हट्टी पोर,
　बापाला देतों मान,
नित्य राहुनी त्यासमोर
　मी फार हर्षवान.

---

317. PENITENCE AND PEACE.

### ३१७. पश्चात्तापयास समाधान.

Hindu M.　　अभंग.

१ वेळ गेला क्षण क्षण,
　मागें न येई परतून.

२ दिन मास वर्षे गेलीं,
　त्यांत पापें किती झालीं.

३ भयंकर वाटतातीं,
　करितां विवेक एकांतीं.

४ मग दुःख वाटे फार,
　आतां कोण करी पार.

५ स्मरतां प्रभूचें वचन,
　मना होई समाधान.

---

318. THE CALL OF JESUS.

### ३१८. प्रभूची वाणी.

C. M.　८, ६ अक्षरी.

१ प्रभूची वाणी ऐकिली,
　"हे कष्टया, ये निर्भय,
माझ्या उरासीं टेंकुनी
　विसावा घे अक्षय."
तेंव्हां मी आलों त्याकडे
　श्रमी व दुबळा,
शांतीचें स्थान सांपडे,
　संतोष भरला.

२ प्रभूची वाणी ऐकिली,
　"तान्हेल्या, ये सत्वर,
जीवंत पाणी घेउनी
　पी आणि हो अमर."

तेव्हां मी आलों त्याकडे,
यथेच्छ प्यालों, जाण,
माझ्या आत्म्याला आवडे,
मी झालों जीववान.

३ प्रभूची वाणी ऐकिली,
"जगाचा सूर्य मी,
राहुनी माझ्या जवळी
हो सुखी नेहमी."
तेव्हां मी आलों त्याकडे,
तो सूर्य खरोखर,
तो तेज पाडी केवढें !
तेणें चालेन वर.

---

319. Dedication to Christ.

"Jesus, our best beloved Friend."

३१९. ख्रीस्ताला सर्वस्व देणें.

L. M. ८ अक्षरी.

१ हे येशू, प्रेम दावुनी
आतां आह्मामध्यें उतर,
पापांची क्षमा करुनी
आह्माला तूं पवित्र कर.

२ तुलाच देतों तन मन.
शास्त्राज्ञा प्रेमें आचरूं,
करुनी तुझी आठवण
त्या तुजला अनुसरूं.

३ धन्याची वाणी ऐकुनी
सेवाच करूं सर्वथा,
कडक ऊन सोसुनी
दुखांत धरूं धीरता.

४ परी हे प्रभू, सुखस्थान,
आह्मांला वर्ते सिद्ध कर,
आह्मा सर्वांचें सर्व ध्यान
तेथेंच लागो जन्मवर.

---

320. The Sweetest Fruit.

३२०. सर्वोत्कृष्ट मेवा. लू. १०:३९.

Hindu M. पद. (ब्याहाग, त्रिवट).

ध्रु० प्रभुपदिं लागतसे बहु गोडी.
१ मधुरसिं कांहीं असि रुचि नाहीं,
चव तर पाहा थोडी. ध्रु०
२ इहपरलोकीं उपमा ह्याया
दुसरी नाहीं जोडी. ध्रु०
३ परि मनरसने, निर्मल होउनि
दृढ विश्वासें ओढी. ध्रु०
४ सतत पिता हीं अक्षय लाभे.
अमरपणाची जोडी. ध्रु०

---

321. Spiritual Foes.

३२१. आत्मशत्रु. गी. ३८:१९,२१.

Hindu M. पद. (देस, दीपचंदी.)

ध्रु० प्रभु, मज सोडुं नको भवरानीं.
१ या भवरानीं बहू अंधेरी,
अंधहि मी नयनानीं. ध्रु०
२ संसारीं ह्या अति दुःखें ही
झाडी फिरे, न पाणी. ध्रु०
३ तव भक्तांचा त्रास अरुचि हे
कांटे मोडति गानीं. ध्रु०
४ वृश्चिक चिंता, भ्रम सर्पच हे
करिती दंश बळानीं. ध्रु०
५ षड्रिपु पाहा वृक जंबुक हे
चवताळती क्रुरवाणी. ध्रु०
६ मन ठक भिळें मजला केलें
व्याकुळ तीव्र शरानीं. ध्रु०
७ सैतानच तो सिंह जयाच्या
येति अरोळ्या कानीं. ध्रु०
८ तव साह्यें मी जिंकिन याना,
मग मज ने सुस्थानीं. ध्रु०
९ तव हस्ता म्यां सोडुन बहुधा
अपुल्या केल्या हानी. ध्रु०

१० पश्चात्तापें शरण तुला मी,
माझा क्रोध न मानी भ्रु०

322. Lord, I cannot let Thee go.

### ३२२. ख्रिस्ताचें अगत्य.

यो. ६:६८.

Hindu M. पद. (पिलू, त्रिवट).

भ्रु० प्रिय प्रभु ख्रीस्ता, कैसा मी तुला सोडूं!
१ मजसाठीं त्वां स्वजीव अर्पीला,
आतां कां मी ऐसी प्रीति तोडूं. भ्रु०
२ अतुल सुखाचे अनुभव देसी,
बार पवित्र हा कसा झोडूं? भ्रु०
३ जग, मन कपटी, सैतान वैरी;
यांचि हत्यारें मी कसीं मोडूं ? भ्रु०
४ खल सैतानें फसविलें माला,
पुन: त्यासिं मैत्री काय जोडूं ? भ्रु०
५ अनुताप योग्य होईना माला,
कठीण या हृदया कसें फोडूं? भ्रु०
६ उन्मद पापी, कृतघ्न खरा मी,
नको नको माझें नांव खोडूं. भ्रु०
७ त्या मृत्युखिंडी पार करायासी
अन्य मित्र ऐसा कोण जोडूं ? भ्रु०
८ तुजविण माझा निभाव न होई;
पदर कोणाचा, सांग ओढूं ? भ्रु०

323. I will not Complain.

### ३२३. मी देवाला दोष लावणार नाहीं.

Hindu M. पद. (खमाज-मांझ, त्रिवट.)

भ्रु० नाहीं प्रभूला दोष मी लावायाचा हो,
ऐसा विकारूं काय मी प्रेम त्याचा हो.
१ धन, संतती, संपत्ती, सर्व कांहीं हो,
होतें जयाचें तयानें नेलें पाही हो. भ्रु०
२ किडे पडूनी चाळणी शरिराची हो,
होवो स्तुति मी गाईन ईश्वराची हो. भ्रु०
३ सर्व प्रियानीं सोडिलें जरीं आतां हो,
तरी मित्र तो जवळीं शांतिदाता हो. भ्रु०
४ दोष किमपी तुजला लावायाला हो,
जिव्हा कदापी ना ढळो, हे कृपालारे. भ्रु०

324. Blessed be the Name of the Lord.

### ३२४. प्रभूचें नाम सुवंदनीय.

ईयोब १:२१.

Hindu M. पद. (भैरवी, दीपचंदी).

भ्रु० प्रभुचें सुवंदीत नाम असो.
१ मी नग्न आलों, जाईन नग्न;
हा बोध मजला ठसो. भ्रु०
२ प्रभुनेंच दिधलें, प्रभुनेंच नेलें.
तर दोष प्रभुला नसो. भ्रु०
३ हरएक करणें प्रभुचें यथार्थ;
हें ज्ञान हृदयीं वसो. भ्रु०
४ प्रभु हा दयाळू, सत तात माझा;
दृढ भाव ऐसा वसो. भ्रु०

325. Outside the Gate.

### ३२५. बाहेर.

7, 6 ७, ६ अक्षरी.

१ लाचार, पिडलेला,
बाहेर पडलों.
मनीं घाबरलेला,
संताप पावलों.
उशीर झाला काय ?
कीं द्वार लाविलें ?
प्रार्थुनी, हाय हाय !
भयानें झटलें.
२ तेव्हां आरोळी केली
कीं, "आतां मरतों;
व माफी न मिळाली
मरण मागतों.
दयाळू, क्षमा करीं,
विसावा मला दे."
आंतून आलें, परी,
उत्तर आवडें.

३ येशूनें कान दिला,
आरोळी ऐकिली,
दयेने शोध केला,
सत्कृपा दाविली.
पाप्यांची क्षमा केली
व चैन पाडिलें,
स्तुतिहि शिकविली,
व आंत घेतलें.

---

326. LIVING TO CHRIST.
"My gracious Lord, I own Thy right."

### ३२६. ख्रीस्तासाठीं जगणें.

L. M. ८ अक्षरी.

१ हे प्रभू, तुझा अधिकार
मी संतोषाने मानितों,
स्मरुनी तुझे उपकार
मी तुला प्राण अर्पितों.

२ तूं नसतां मी करूं काय?
त्वां मला दिधला आधार,
नित्य धरीन तुझे पाय,
मी तुला नाहीं सोडणार.

३ तुझ्या सेवेंत मी लागेन,
करीन प्रेमें तुझें काम,
मी तुजकरितां जगेन,
स्तवीन तुझें वंद्य नाम.

४ मिळवायाला मोठें धन,
सुख भोगाया मनस्वी,
न घालवीन एक क्षण,
नलगे मोठी पदवी.

५ तुझीच सेवा आवडे,
त्वां मजसाठीं दिल्हा प्राण,
मी राहुनी तुझ्याकडे
अनंत पावतों कल्याण.

६ स्तवीन तुझी ममता,
गाईन प्रेम अतिशय,
तुझ्या उरासीं मरतां
करीन मोठा जयजय.

327. CHRIST PRECIOUS.
"Thou only Sovereign of my heart."

### ३२७. ख्रीस्त प्रिय. यो. ६:३८.

L. M. ८ अक्षरी.

१ हे प्रिय प्रभू तारणार,
मी तुला कधीं सोडूं काय?
तूं माझा एकटा आधार,
तूं नसतां, मी निरुपाय.

२ प्रिय प्रभूला सोडुनी,
मी कोठें जाऊं दैन्यवान?
हें सर्व जग धुंडुनी
मिळेल कसचें कल्याण?

३ तूं जीवनाचा दाता थोर,
माझ्या आत्म्याचा पूर्णाश्रय,
मी राहतां तुझ्या समोर,
जिवाला हर्ष अतिशय.

४ जगाचें सर्व सुख नीच,
मी पाठीमागें टाकितों,
हे प्रभू, तुझी कृपा हीच
अवघ्यांपेक्षां मागतों.

५ मी नमतों तुझ्या समोर,
तुला सोडुनी जाऊं काय?
मरणापेक्षां तें अघोर,
तो सत्य नाश निरुपाय.

६ मी तुझ्या पायां पडतों,
एथेंच राहतों निर्भय,
तुझ्या समीप नांदतों,
कां जीवनाचा तूं आश्रय.

---

328. TAKING UP THE CROSS.
"Jesus, I my cross have taken."

### ३२८. वधस्तंभ घेणें. मात. १६:२४.

8, 7. ८, ७ अक्षरी.

१ प्रभू, वधस्तंभ घेतों,
तुला अनुसरणार,

जग टाकुनिया देतों,
तुझी आशा लागे फार.
२ सर्व जग असो वैरी,
तुला त्याने द्वेषिलें.
तूंच माझा हो कैवारी,
जगें मला भोंदिलें.
३ येवो दुःख, क्लेश, निंदा,
जळो द्रव्य अवघें,
तुझ्यापाशीं हर्ष सदा,
दुजें सुख नलगे.
४ तुझें रक्त पाहातांना
धैर्य नाहीं खुटणार,
तुझें तोंड लपतांना
सुख नाहीं वाटणार.

---

329. NOT ASHAMED OF JESUS.

"Jesus, and shall it ever be?"

## ३२९. येशूविषयीं लाज धरणें.

L. M. ८ अक्षरी.

१ हे येशू राजा तेजवान,
उद्धारणाऱ्या स्तुतिमान,
मनुष्य कसे भ्रमतीं!
ते तुझी लाज धरितीं.
२ येशूची लाज धरणें,
हें सूर्या तुच्छ करणें,
अंधार जेव्हां व्यापितो,
मनाला तो प्रकाशितो.
३ येशूची लाज धरणें,
हें मूर्खपण करणें.
तो मात्र करितो उद्धार,
अनंत त्याचे उपकार.
४ पापाचा रोग नसल्यास
येशू न लागता आह्मास,
मी तरी दुष्ट दुबळा,
दुःखित, दंडी, खंगला.
५ येशूचे पाय धरितां
मला संतोष पुरता,
ही मात्र लाज, भगवान,
कीं तुझा केला अपमान.
६ ही आशा आहे मानसीं,
कीं प्रभु न्यायदिवसीं
मला नाहींच टाकणार
कीं माझी लाज धरणार.

---

330. GOD MY FATHER.

"My God, my Father, blissful name."

## ३३०. देव माझा बाप.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ हे देवा बापा दयावान.
मला स्वीकारिसी,
मी किती आहें भाग्यवान,
तूं पुत्र ह्मणसी.
२ मी आतां सर्वथा निर्भय,
शत्रु हे निरुपाय,
बापाचा मिळतो आश्रय,
मला बाधेल काय?
३ हे बापा, न्यायी, बुद्धिमान,
मायाळू सर्वकाळ,
मी तुझ्या प्रेमें तृप्तिमान,
तूं मला सदा पाळ.
४ तूं कांहीं तरी लाववी,
मी मान्य करितों,
सामर्थ्य मला पुरवी,
हें मात्र मागतों.

---

331. PRIVILEGES OF GOD'S PEOPLE.

"Blessed are the sons of God."

## ३३१. देवाच्या भक्तांचें कल्याण.

7s. ७ अक्षरी.

१ देवपुत्र भाग्यवान,
तेच पावती कल्याण,

ख्रीस्तरक्तें तरती,
मोठा हर्ष करती.

२ त्यांचीं पापें खोडलीं,
ख्रीस्तामुळें सोडलीं,
चुकवून दंड घोर
नांदती देवासमोर.

३ ते सदात्मा बाळगून,
मनीं जोडिती सद्गुण,
प्रीति, शांति, नम्रता,
करुणा, पवित्रता.

४ जगीं ते प्रकाशती,
ईश्वराची संतति,
ते बापाच्या वाणीं, जाण,
वर होती तेजवान.

---

332. Saints Protected.

"How are Thy servants blessed, O Lord."

## ३३२. भक्त सुरक्षित.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ देवाचे भक्त भाग्यवान्,
ते सर्वदा निर्भय,
जो देव सर्वशक्तिमान्
तो त्यांचा सदाश्रय,

२ ते दूर देशीं असतां
तो सदा राखितो.
पटकीं मोठी चालतां
प्रेमें संभाळितो.

३ सुटतो वारा अनिवार,
लहराहि प्रबळ,
तेव्हां धावुनि वेळेवार
ताराया तो सबळ.

४ वाऱ्याला आज्ञा करितां
तो शांत राहतो,
समुद्र अति गर्जितां
क्षणांत शमतो.

५ जिवाच्या संकटीं अघोर
बापाला आठवूं,
स्मरुनी त्याचीं कर्में थोर
विश्वास दृढवूं,

६ हे देवा, तूंच मला पाळ,
मी तुला अर्पी प्राण,
जेव्हां होईल अंतकाळ
तों वर्ते दे कल्याण.

---

333. Adoption.

"Behold what wondrous grace."

## ३३३. दत्तपुत्रपण. १ यो. ३:१-३.

S. M. ६, ८ अक्षरी.

१ आह्माला भगवान
स्वपुत्र ह्मणतो,
ही कृपा अति प्रेमवान
जनांला दावितो.

२ तो पुढें वाढवून
आह्माला चढवील,
ख्रीस्ताच्या संगें उठवून
त्यावाणी घडवील.

३ ही आशा धरितां
टाकावा पापगाळ,
हर्षानें दुःखें सोसितां
टिकावें सर्वकाळ.

४ हे बापा, मजला
तूं पुत्र ह्मणवी,
देउनी आत्मा आपला
मनाला शांतवी.

५ तूं पुत्र मानितां
उल्हास होतो फार,
तों "आबा बापा," ह्मणतां
गाईन हा उद्धार.

---

334. HE LEADETH ME.

**३३४. प्रभु मला चालवितो.**

L. M. ८ अक्षरी.

१ प्रभूच वाट दाखवी,
तो स्वतां मला चालवी,
जों सुचे मना हा विचार,
तों वाटे समाधान फार.

ध्रु० तो चालवी, तो चालवी,
स्वहातें मला चालवी,
मी त्याला मान्य सर्वस्वीं,
कां प्रभु स्वतां चालवी.

२ कधीं हर्षाच्या समयीं
कीं, अरिष्टांच्या प्रळयीं,
सुखांत कीं दुःखांत मी,
तो चालवितो नेहमी. ध्रु०

३ मी त्याचा हात धरितों,
संतुष्ट आतां राहतों
तो हर्षवी कीं दुखवी
तरी प्रेमेंच चालवी. ध्रु०

४ संपेल जेव्हां माझी धांव,
जें माझा होई पूर्ण भाव,
तें मृत्युतिरीं न भिणार,
प्रभूच चालवील पार. ध्रु०

---

335. THE CHRISTIAN'S PRIVILEGES.
"Know, my soul, thy full salvation."

**३३५. ख्रिस्ती मनुष्याचें कल्याण.**

8, 7. ८, ७ अक्षरी.

१ माझ्या जिवा, कर स्तुति,
तुझें केवढें कल्याण!
ईश्वराची कृपा किती!
तोच तुझा बाप, जाण.

२ ख्रीस्त तुझा तारणारा,
तुझ्यासाठीं वधला,
आत्मा प्रेरणा देणारा,
तुझ्या ठायीं राहिला.

३ तर धैर्य धरितांना
आकाशाच्या मार्गीं चाल,
प्रार्थनाहि करितांना
थकूं नये सर्वकाळ.

४ ख्रीस्त तुला चालवुनी
थेट वर पोंचवील,
दुःखें कष्ट घालवुनी
सर्व आशा पुरवील.

---

336. CHRIST IN HIS PEOPLE.
"Love divine, all love excelling."

**३३६. ख्रीस्त भक्तांमध्यें राहतो.**

8, 7. ८, ७ अक्षरी.

१ प्रभू येशू ममनाळू,
अनुपम तुझें प्रेम,
तारणाऱ्या कनवाळू,
करिसी अनंत क्षेम.

२ आतां दया दाखवुनी
आह्मामध्यें वस्ती कर,
सर्व शत्रु घालवुनी
हृदयीं तूं स्थान धर.

३ तूं आह्माला नको सोडूं,
सदा राहा अंतरीं,
तुझी प्रीति नको तोडूं,
दे सत्शांति ईश्वरी.

४ तुझ्या सांधें चालतांना
गाऊं तुझें मोठें प्रेम,
वेंतें पायां पडतांना
वाखाणूं अनंत क्षेम.

---

337. DEDICATION TO GOD.
"What shall I render to my God?"

**३३७. देवाला सर्वस्व देणें.**

स्तोत्र ११६.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ देवाचे सर्व उपकार
फेडाया करूं काय?

स्तवुनी त्याला वारंवार
धरीन त्याचे पाय.

२ देवाच्या भक्तांसंगतीं
भजेन त्यासमोर,
सांगेन अवघ्यांप्रति
देवाची कृपा थोर.

३ हे प्रभु, तुला ममता
किती आवडती !
सद्भक्त तुझ्या देखतां
सुप्रिय असती.

४ उद्धार मला दिधला,
मी स्तुति करितों,
त्वां माझा जीव राखिला,
तो तुला अर्पितों.

५ मी आतां तुझा आहें, जाण,
निश्चय ठरला,
त्वां मला केलें हर्षवान,
जीवात्मा तारिला.

६ भक्तांनो, ऐका हा निश्चय,
मी नाहीं फिरणार,
देवाचा धरिला आश्रय,
कधीं न सोडणार.

---

338. JOINING THE PEOPLE OF GOD.

"People of the living God."

## ३३८. देवाच्या भक्तांसीं मिळणें.

7s. ७ अक्षरी.

१ अहो भक्तमंडळी,
मी जगांत हिंडलों,
भवसुखें पाहिलीं,
शांति नाहीं पावलों.

२ आतां येतों इकडे,
जग मागें टाकितों,
देवभक्ति आवडे,
ही विश्रांति मागतों.

३ कोठें न भटकतां
आहें तुमच्या संगतीं,
जगतां व मरतां
तुह्मी माझे सोबती.

४ तुमचा माझा एक बाप,
एक प्रभु गौरवी,
वर्तें होउनी निष्पाप
संगे राहूं वैभवीं.

---

339. RENOUNCING THE WORLD.

"Vain delusive world, adieu."

## ३३९. जगाचा त्याग करणें.

7s. ७ अक्षरी.

१ भवसुख अवघें
याचा करितों धिक्कार,
प्रभू ख्रीस्ता, मला घे,
आतां मागतों उद्धार.

२ द्रव्य, डौल, मोठें नांव
पाठीमागें टाकिलें,
तुझ्या ठायीं माझा भाव,
तुझें प्रेम लागलें.

३ तूंच माझा असतां
सुख वाटे अतिशय.
तूं समीप दिसतां,
जातें माझें सर्व भय.

४ मला तुझा दे स्वभाव,
दे सद्गुण सगळे,
तुझें मुख मला दाव,
तुझें प्रेम लागलें.

---

340. JESUS, VERY DEAR.

## ३४०. येशू प्रिय.

6, 4. ६,४ अक्षरी.

१ जावो विषयसुख,
येशू आधार,

त्यापासीं नाहीं दु:ख,
तो प्रिय फार.
जग पारखिलें,
तें व्यर्थ ठरलें,
येशूला धरिलें,
तो प्रिय फार.

२ गेलें हो मृत्युभय,
येशू आधार,
तो माझा सदाश्रय,
तो प्रिय फार.
पवित्र सुखस्थान
येशूच्या उरीं, जाण;
तो माझा जीवप्राण,
प्रिय अपार.

---

341. BECOMING LIKE JESUS.

## ३४१. येशूसारिखें होणें.

7, 6 ७, ६ अक्षरी.

१ मी प्रिय प्रभुवाणी
व्हायाला इच्छितों,
जो त्रासला दुष्टानीं
तेव्हां न चिडे तो.
तो मोठे शत्रु यांसीं
शांतीनें बोलला,
तो सर्व लोकांपासीं
प्रीतीनें चालला.

२ मी प्रिय प्रभुवाणी
व्हायाला इच्छितों,
रात्रीं जाऊनी रानीं
प्रार्थना करी तो.
देशांत फिरतांना
सर्वांचें करी क्षेम,
तो खांबीं मरतांना
दावी अत्यंत प्रेम.

३ मी प्रिय प्रभुवाणी
व्हायाला इच्छितों,
आचरणीं व मनीं
दुष्टाई द्वेषितों.
मी नाहीं प्रभूवाणी,
मी पापी लेंकरूं,
प्रभू, दे आत्मा मनीं,
मी तुझें कोंकरूं.

---

342. HEAVENLY JOY ON EARTH.

"Come we that love the Lord."

## ३४२. जगांत आकाशसुख

S. M. ६, ८ अक्षरी.

१ देवाचे भक्त, या,
स्वहर्ष दाखवूं,
मधुर गाणें गावया
स्वराला चढवूं.

२ मनाच्या चिंता घोर
एथुनी घालवा,
ख्रीस्ताच्या धर्में सुखें थोर,
कीर्ति हो वाढवा.

३ देवाला नेणती
ते उगे राहतील,
जे त्याचे पुत्र ठरती
ते हर्ष दावितील.

४ भक्तांला एथें, जाण,
आकाश मिळतें,
विश्वासें सुख तेजवान
जगांत फळतें.

५ जीयोन डोंगरीं
सुफळें गोड फार,
आकाशीं पोंचूं तोंवरी
भक्तांला हा विसार.

६ यामुळें काढूं स्वर,
पुसूंहि आसवें,

आह्माला प्रभु नेतो वर
द्यायाला गौरवें.

---

343. Happy Day.

## ३४३. भला वार.

L. M. ८ अक्षरी.

१ येशूची सेवा आवडे,
सुवेळीं गेलों त्याकडे,
तो दावी फार करुणा,
माझ्यांत तोष मावेना.

ध्रु० भला वार! धन्य वार!
जैं सारा गेला पापभार.
सतत आतां प्रार्थना;
आनंद स्तुति सरेना.
भला वार! धन्य वार!
प्रभूनें केला जैं उद्धार.

२ करार केला निश्चयें.
प्रभूने दिलीं अभयें.
अंदेशा आतां कां जिवा?
विसावा घे, जा गौरवा. ध्रु०

३ तो राहूं देई जवळी,
नित्याने तोच संभाळी,
आकाशलोकीं आणुनी
तो ठेवील स्वसदनीं. ध्रु०

४ प्रेमाळू प्रभु माझा तो,
मी, दास सुखी, हर्षतों.
कां करूं घोर? धन्य मी!
उल्लास करीं नेहमी. ध्रु०

---

344. The Christian's Request.

"Father, whate'er of earthly bliss."

## ३४४. ख्रिस्ती मनुष्याचें मागणें.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ हे बापा, जगसुख हें
कांहीं न मागतों.
मी हीच अर्जी आग्रहें
पायांसीं करितों.

२ दे मनशांति सर्वकाळ
व पूर्ण नम्रता,
सदात्मा माझ्या ठायीं घाल,
वाढीव ममता.

३ मी तुझा, असी खातरी
राहावी जन्मभर,
दे एथें तेज ईश्वरी,
पुढें घे मला वर.

---

345. The Lord, my Stay.

## ३४५. प्रभू आधार.

8, 7. ८, ७ अक्षरी.

१ प्रिय प्रभू, तूं कृपेने
मला मार्ग दाविलास,
वर्षोवर्षी ममतेने
दुःख खेद वारिलास.
कधीं मी बहकतांना
मला त्वांच शोधिलें.
संकटेंहि लागतांना
मला त्वां उद्धरिलें.

२ जगीं मला आडवितील,
शत्रु धूर्त शक्तिमान,
भारी मोह त्रासवितील,
जोंवरी राहील प्राण.
प्रभू, मला तूं दे शक्ति,
तूंच एकटा आधार,
तूं भक्ताला देसी मुक्ति,
पाप संकटें निवार.

३ मला तूंच ने मार्गाने,
तुझ्या ठायीं माझा भाव,
स्वतां चालवी हाताने,
मला तुझ्या सेवे लाव.

पाप मोह घालवुनी
माझें चित्त स्थिर कर,
तुझी प्रीति दाखवुनी
माझ्या मनीं प्रीति भर.

---

346. I LOVE THEE, MY LORD.

## ३४६. प्रभूवर प्रीति.

10 s. १० अक्षरी.

१ तूं प्रिय, हे प्रभू, तूं प्रिय अपार,
तूं प्रिय, हे येशू, त्वां केला उद्धार,
तूं मला सुप्रिय, हें कसें दावीन,
मी तूला संपूर्ण शक्तिनें स्तवीन.

२ हे प्रभु, मी करीं आनंद महान,
तूं जीवन देसी, अमोल्य हें दान,
मी वर्णीन तुझा प्रेमाळू स्वभाव,
वाखाणीन तुझें सुवंदित नांव.

3 या प्रिय प्रभूला न मिळे समान,
आकाशीं पृथ्वींत तो राजा महान,
सुप्रिया, सुवंद्या, मी गाईन प्रेम,
हे येशू, त्वां केलें अखंडित क्षेम.

---

347. SUFFER THE CHILDREN.

## ३४७. बाळकांस येऊं द्या.

11, 8. ११, ८ अक्षरी.

१ येशूनें हो केवढें दाविलें प्रेम!
बाळांसीं तो अति मायाळ!
हातांवरीं घेऊनी दिधलें क्षेम,
कन्हवाळूच तो मेंढपाळ.

२ मनांत हें वाटे कीं, त्या समयांत
मी असतों बाळ लहान,
व त्यानें डोक्यावरी ठेविले हात,
तरी मला आनंद महान.

3 तो आतां कृपेनें बोलावी मुलांस,
तो ह्मणे "आशीर्वाद घ्या,"
जे आडवे येती तो बोलतो त्यांस,
"मजपासीं बाळां येऊं द्या."

४ मी त्याकडे आतां एकांतीं जाईन
ह्मणेन, "प्रभू, कृपा कर,"
मी त्याला आवडता आतां होईन,
तरी राहीन त्यापासीं वर.

५ आकाशीं अनंत सुखाचें ठिकाण,
बाळांला तें केलें तयार,
आकाशाचें राज्य अशांचें हो स्थान,
तेथें मलाहि देई उद्धार.

---

348. THE CHRISTIAN'S HOPE.

"When I can read my title clear."

## ३४८. ख्रिस्ती मनुष्याची आशा.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ आकाशीं जागा हो मिळेल,
हा कळूं दे निश्चय,
तेव्हांच काळजी पळेल,
सोडीन सर्व भय.

२ हें जग असो उलटें,
शत्रुहि बळवान्,
मी तरी महासंकटें
सोसिन हर्षवान.

3 लागोत क्लेश अनिवार,
विपत्ति अतिशय,
देव नेईल मला पार,
ही आशा देती जय.

४ तेथें सदा सुखें मिळतील,
विसावा गौरवी,
व दुःखें भयें नेणतील
त्या महाविभवीं.

---

349. THE PILGRIM'S GUIDE.

"Guide me, O thou great Jehovah."

## ३४९. आकाशीं वाटेने नेणारा.

8, 7, 4. ८, ७, ४ अक्षरी.

१ देवा, मज यात्रिकाला
या रानांत चालवी,

दे आधार अशक्ताला,
माझें भय घालवी;
आकाशाचें
अन्न मला पुरवी;

२ खडकाला फोडुनिया
जीवनाचें पाणी दाव,
अग्निमेघ देउनिया
सुमार्गानें मला लाव;
हे समर्था,
माझा कर तूं निभाव.

३ यार्देनेच्या तिरीं येतां
माझें भय शांतवी,
तुझ्या हातें पार नेतां
आकाशांत पोंचवी;
तुला स्तवूं,
प्रभू देवा गौरवीं.

---

350. Desire for Holiness.

"Oh that the Lord would guide my ways."

## ३५०. पवित्र होण्याची इच्छा.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ हे देवा, मला वळवून
शास्त्राज्ञा पाळवी,
आपली इच्छा कळवून
तसेंच चालवी.

२ घालीव दुष्ट भावना,
कपटबुद्धि मोड,
मनांत देतां प्रेरणा
शास्त्राज्ञा लागो गोड.

३ माझ्या दुर्वासना निवार,
त्या धरूं नये लोभ,
संपूर्ण बुद्धि तूं सुधार,
मला न येवो क्षोभ.

४ शास्त्राप्रमाणें चालवून
मन भावार्थी कर,
पापाची सत्ता घालवून
तूं मात्र सत्ता धर.

५ बहुधा मी बहकलों
निसरलेच पाय,
तरी मी न विसरलों
शास्त्राचा अभिप्राय.

६ प्रेमानें देउनी आश्रय
तूं नित्य मला पाळ,
त्या तुझें बाळगुनी भय
मानवें सर्वकाळ.

---

351. My Home is in Heaven.

## ३५१. आकाशीं घर.

6, 4, Peculiar. ६, ४, तऱ्हेवाईक.

१ मी जगीं परका,
आकाशीं घर,
हा भव नासका,
आकाशीं घर.
भयें चहुंकडे,
कांहीं न आवडे,
जातों बापाकडे,
अकाशीं घर.

२ वादळें सुटती, आ.
विजा चमकती, आ.
संकटें टळतील,
शत्रुहि पळतील,
दूत अढळतील, आ.

३ येवो दुःखांचा पूर, आ.
न करीं कुरकूर, आ.
हे प्रभू गौरवी,
तूं मला बसवी
बापाच्या उजवी,
तें माझें घर.

352. FOLLOWING JESUS.

### ३५२. येशूला अनुसरणें.

L. M. ८ अक्षरी.

१ येशू जीवाचा तारणार
वरतें आकाशीं गेला पार,
मी त्याला अनुसरुनी
मार्गीं चालेन झटुनी.

ध्रु० पाहा तो येशू त्या खांबावरी,
तुझा आश्वास उद्धरी,
पाप्यांचा दंड पत्करी,
मरे रे येशू त्या खांबावरी.

२ ज्या मार्गीं साधु चालले,
भविष्यवादी सगळे,
तेणें चालेन हा निश्चय,
त्या मार्गीं शांति अतिशय. ध्रु०

३ वाईट मार्गीं चाललों,
सर्वस्वीं मी बिघडलों,
तों प्रभु दावी प्रेम फार,
बोले, मी वाट, घे उद्धार. ध्रु०

४ प्रभू, मी आलों हर्षवान,
तूं मला आपलेंसें मान,
मी देऊं दान कोणतें ?
तूं दे स्वपुण्य पुरतें. ध्रु०

५ सर्वांला प्रेमें सांगुनी
दावीन मार्ग जीवनी,
तुझेंच रक्त दाखवून
म्हणेन, मुक्ति याकडून. ध्रु०

---

353. THE CHRISTIAN SAFE.

"Firm as the earth Thy Gospel stands."

### ३५३. ख्रिस्ती निर्भय.

यो. १०:२८.

C. M. ८, ६ अक्षरी

१ प्रभूचें शुभवर्त्तमान
अत्यंत हो खंबीर,
आकाश जसें स्थैर्यवान
तसें तें आहे स्थिर.

२ येशूकडे मी असतां
तो नाहीं सोडणार,
अनंत प्रीति करितां
करील पूर्णोद्धार.

३ देवाचीं सर्व लेंकरें
तो भाऊ मानितो,
तीं त्याचीं प्रिय मेंढरें,
तो प्रेमें पाळितो.

४ तीं कोण वैरी हिसकील
धन्याच्या हातुनी ?
तो काळजीनें बाळगील
उराशीं धरुनी.

---

354. GOD'S PRESERVING GRACE.

"To God the only wise."

### ३५४. रक्षणारी ईश्वरकृपा.

S. M. ६, ८ अक्षरी.

१ अनंत भगवान
दिनांचा तारणार,
सर्वांनी त्याला द्यावा मान,
वर्णावे उपकार.

२ देवाची ममता
भक्तांला राखिती,
ते पापामध्यें पडतां
तीच उद्धारिती.

३ ख्रीस्ताचें तेज थोर
तो पुढें दाखवील,
तेव्हां आत्म्याला त्यासमोर
पवित्र राहवील.

४ संपूर्ण मंडळी
त्या वेळीं मिळतां
वर्णील कृपा सगळी,
अपूर्व ममता.

५ हे प्रभू तेजवान,
तूं मोठा तारणार,
अत्यंत थोर ज्ञानवान,
तुला वाखाणूं फार.

355. God's Promises sure.

"How firm a foundation, ye saints" &c.

३५५. देवाचीं वचनें स्थिर.

यशा: ४३.

11s. ११ अक्षरी.

१ देवाचें सत्शास्त्र हें सर्वदा स्थिर,
विश्वासा धराया हा पाया खंबीर,
देवाच्या भक्तानो जे ठेवितां भाव,
वाखाणा देवाचें सुवंदित नांव.

२ हे भक्ता, तूं नकोरे बाळगूं भय,
कां घोर करावा? तो तुझा आश्रय,
तो पुरवी शक्ति अनंत उदार,
समर्थ हाताचा तो देतो आधार.

३ पुरांतुनी जातां तो साह्य करील,
पाण्यांत कदापि न बुडूं देईल,
समुद्रीं तो दावील कोरडी वाट,
कीं शमवी शब्दें सुसाटा व लाट.

४ अपूर्व क्लेशांत तो करी निभाव,
अग्नीने न पोळतां होई बचाव,
त्या क्लेशें तो काढील तुझें जें हीन,
तूं निर्दम सोनें होसील अक्षीण.

५ संपूर्ण जन्मांत सद्भक्त सकल
बापाची हो भोगती प्रीति अढळ,
तो म्हातारपणीं करील संभाळ,
तो आईहिपेक्षां अत्यंत मायाळ.

६ सजीव देवाचा जो पावे आश्रय,
शत्रूंचिया मध्यें तो राहे निर्भय,
नर्कांच्या शस्त्रास्त्रें तो न पडणार
कां देव कल्पांतींहि न सोडणार.

356. Christian Fortitude.

"Am I a soldier of the cross?"

३५६ धैर्य धरणें. २ तिम. २.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ येशूचा भक्त असतां,
सैनिक त्याचा, जाण,
मी कसी टाकूं धीरता,
कीं होऊं लज्जावान?

२ सुखाच्या शेजीं निजुनी
जाईन वर्ते काय ?
कीं दु:खें निंदा टाळुनी
पावेन ख्रीस्तपाय ?

३ हे प्रभू, मला द्यावा धीर,
लढाई चालवीन,
संकटें सोसुनी गंभीर
तें राज्य मिळवीन.

४ प्रभूचे भक्त लढतां
विश्वासें टिकतील,
निश्चयें प्राण सोडितां
विजय पावतील.

357. I am a little Soldier.

३५७. लहान शिपाई.

7, 6. ७, ६ अक्षरी.

१ प्रभु ख्रीस्ताचा शिपाई,
थोड्या वर्षांचा मी,
व चालवाया लढाई
झटेन नेहमी.
तो मोठी प्रीति दावी
मज बाळावरी,
ती सेवा अवडावी
ही धन्य चाकरी.

२ तो माझ्या प्रार्थनांला
कृपेनें देतो कान,

मजसाठीं जीव दिल्हा,
तो किती प्रेमवान?
करीन त्याची स्तुति
मानीन उपकार,
त्या प्रिय प्रभुसाठीं
आयुष्य खर्चणार.

३ लहान असतांना
प्रयत्न मी करीन,
व पुढें वाढतांना
निष्ठेने चालवीन.
हे प्रभु साह्य होतां
विश्वासू मला कर,
तूं मन वळवितां
घे अंतीं मला वर

---

358. WATCHFULNESS AND PRAYER.

"Alas! what hourly dangers rise."

## ३५८. जागृति व प्रार्थना.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ घडीनेघडी संकटें
किती हो लागती!
पाहीन ईश्वराकडे,
करीन जागृति.

२ हे देवा, माझ्या जीवना,
दीनाला हो सहाय,
दे मला भक्तिभावना,
मी स्वतां निरुपाय.

३ अघोर शत्रु भिडतां
विश्वास वाढवी,
जिवाला धाक पडतां
तूं शक्ति पुरवी.

४ आकाशमार्गी चालवून
मोहाला दूर कर,
संपूर्ण पाश चुकवून
उराशीं सदा धर.

---

359. THE CHRISTIAN WARFARE.

"My soul, be on thy guard."

## ३५९. ख्रिस्ती मनुष्याची लढाई

S. M. ६, ८ अक्षरी.

१ हो, जिवा, सावधान,
हजारों नाडिती,
व तुला बुडवाया, जाण,
दुर्भाव ओढिती.

२ तूं लढ त्यांजसीं,
दबावें कधीं ना,
भिडावें प्रतिदिवसीं,
करावी प्रार्थना.

३ लढाई चालवी
आयुष्यपावेतों,
जयवंताला गौरवी
मुगुट मिळतो.

---

360. DEAD TO SIN.

"Shall we go on in sin?"

## ३६०. पापाविषयीं मेले. रोम. ६.

S. M. ६, ८ अक्षरी.

१ प्रभूची कृपा फार,
साधिला पूर्णोपाय,
यामुळें टाकितां आचार
पापांत राहूं काय?

२ न घडो हा दुर्भाव,
जीं पापें मारिलीं
तीं पुन्हा कसीं उठवूं?
तीं खाबीं खिळिलीं.

३ प्रभूच्या संगतीं
भावाने पुरलों,
त्यासंगें पुनरुत्थिति
कृपेने पावलों.

४ ख्रीस्तें देउनी प्राण
आज्ञाला खंडिलें,

कशाला होऊं बंदिवान,
जे झालों मोकळे?

---

361. HOLINESS OF LIFE.
"So let our lips and lives express."

## ३६१. पवित्र आचरण.

तित. २:१०.
L. M. ८ अक्षरी.

१ शास्त्राच्या आज्ञा आचरूं,
ख्रीस्तालाहि आनुसरूं,
कां नसें हो आचरतां
शास्त्राची दावूं सत्यता.

२ प्रेमानें घेउनी उद्धार
पापाचा करूं तिरस्कार,
तेणें प्रभुला गौरवूं,
प्रताप त्याचा दाखवूं.

३ नाकारितां दुर्वासना
धरूं पवित्र भावना,
नीति, सत्प्रीति, खरेपण,
येणेंच दावूं शुद्ध मन.

४ असेंच नित्य चालतां
आशेची होती स्थिरता,
कां प्रभु वैभवीं येईल,
आम्हाला संगतीं घेईल.

---

362. CHRISTIAN WARFARE.
"Stand up, my soul," &c.

## ३६२. ख्रिस्ती मनुष्याची लढाई.

L. M. ८ अक्षरी.

१ हे जिवा, ऊठ, शौर्य धर,
शस्त्रसामग्री घे सत्वर,
येशू हा गेला वैभवीं,
त्यापासीं जागा मिळवी.

२ पापें हीं आडविती फार,
सैतान करी प्रतिकार,
तूं त्याचें नको धरूं भय,
ख्रीस्तानें केला पराजय.

३ वतें पाहुनी धैर्यें चाल,
लगट कर सर्वकाळ,
भक्त विजय पावतील,
ते शुभ्र झगे घालतील.

४ तेथें मुगुट तेजवान
मला देईल भगवान,
स्मरुनी त्याचें प्रेम फार
भक्त वाखाणिती उद्धार.

---

363. THE CHRISTIAN RACE.
"Awake our souls, away our fears."

## ३६३. ख्रिस्ती मनुष्याची धाव.

L. M. ८ अक्षरी.

१ हे जिवा, कर तूं निर्धार,
सोडुनी घोर हो निर्भय,
आकाशमार्गीं धाव मार,
तूं धर नेट अतिशय.

२ या मार्गीं मोठी अडचण,
हजारों प्राणी थकती,
मोठ्या देवाची आठवण
न केल्यामुळें गळती.

३ तो देव सर्वशक्तिमान,
अनंत हो पराक्रमी,
सृष्टीचा कर्ता भगवान,
संभाळ करी नेहमी.

४ हे देवा जगज्जीवना,
आम्हाला तूंच हो आधार,
तूं करितांना प्रेरणा
आम्ही नाहींच गळणार.

५ गरुड वतें उडतो
तद्रूप आम्ही चढुनी
पोहोंचूं घरापावेतों,
मुगुट घेऊं जिंकुनीं.

---

364. The Christian Voyage.

"At anchor laid, remote from home."

## ३६४. आकाशाकडे जलमार्ग.

L. M. ८ अक्षरी.

१ नौकेला वारा लागेना
तेव्हां मी करीं प्रार्थना,
"सदात्म्या, एव्हां तूं उतर,
वाऱ्याने माझें शीड भर.

२ पुढें चालाया इच्छितों
आकाशीं पोंचें पावेतों,
प्रसन्न वारा वाहवी,
बंदरीं वेगें पोंचवी."

---

365. Love to Creatures dangerous.

"How vain are all things here below!"

## ३६५. विषयांची आवड.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ जगिक अवघे विषय
हे इष्ट दिसती,
सुखांचे मोह अतिशय,
हजारीं फसती.

२ जें कांहीं दिसे फार गोड
तें कपटीसें जाण,
विशेष होतां मना ओढ
तों संकटें महान.

३ जे जिवलग सोबती
सुप्रिय अवघे,
ते चित्त किती ओढिती
देवासीं वावगें!

४ प्रियांची प्रीति असतां
अत्यंत भिनती,
मनाची ओढ सर्वथा
तिकडे लागती.

५ हे देवा, तुझ्या दर्शनें
आम्हाला तृप्त कर,
तों आम्ही अंत:करणें
अखंड लावूं वर.

---

366. Resignation.

"O Lord, my best desires fulfil."

## ३६६. ईश्वराच्या करण्याला मान्य असणें.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ हे देवा, कृपा दाखवी,
दे मला नम्र मन,
माझा विश्वास वाढवी,
मागतों लीनपण.

२ तूं कांहीं दुःख लावितां
म्या धरूं नये भय,
अनंत तुझी ममता,
हा वाटूं दे निश्चय.

३ जें कांहीं माझें मोलवान
तें तुला सोंपितों,
तूं माझा बाप कृपावान,
सर्वस्व अर्पितों.

४ तूं करायाला करूणा
वचन दिधलें,
त्यापेक्षां जें जें मिळेना
तें नको सगळें.

५ तूं मला ज्ञान ममता
येणेंच पाळिसी,
म्या कां हो गर्व धरितां
भिडावें तुजसीं?

६ हे देवा, माझ्या मनीं पाळ
ही लीन भावना,
पोहोंचतां विपत्तिकाळ
तूं ह्या दे सूचना.

---

367. Benefit of Affliction.
"Consider all my sorrows, Lord."

### ३६७. दुःखांवरून कल्याण.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ हे देवा, पाहा माझें दुःख,
तूं संकटें निवार,
मी अति झालों म्लानमुख,
कृपेनें दे उद्धार.

२ तरी तूं शिक्षा करितां
मी पावलों कल्याण,
कां तुझें शास्त्र शिकतां
भाकांचें होतें ज्ञान.

3 नवेंच दुःख भोगतों
तों हेंच शांतवन,
कीं शास्त्र गोड मोजितों,
पापें कंटाळे मन.

४ जगिक सुखें सरतीं
तों शास्त्रें समाधान,
ही शांति जर नसती
जाताच माझा प्राण.

५ कठीण शिक्षा लावुनी
न करिसी अन्याय,
माझा उद्धार पाहुनी
योजिसी तो उपाय.

६ शिक्षा मिळाल्यापूर्वी मी
फार बहकलों,
आतां सुमार्गीं नेहमी
चालाया शिकलों.

---

368. Help Implored,

### ३६८. प्रभूचा धांवा.

गी. ४०:११–१३.

Hindu M. पद. (देश, दीपचंदी.)

ध्रु० प्रभु, माझ्या संकटीं धांव त्वरें.
१ सादोम याच्या नाशांतुनीया
लोटा काढीलें खरें. ध्रु०

२ इस्रायलांचीं दास्यत्वदुःखें,
त्वां केलीं दूर स्वकरें. ध्रु०

3 क्रूर शत्रु धरितां इस्रायलासी,
दिलि वाट कासि सागरें! ध्रु०

४ दाविद, इयोब, यांचीं अरिष्टें
वारूनि, केलें बरें. ध्रु०

५ शद्राख, मेशाख, आबेद्नगो हे
रक्षीले अग्नींत रे. ध्रु०

६ दानीयल पडतां सिंहां पुढें त्या!
ते केले जसि मेंढरें. ध्रु०

७ तर ख्रीस्तभक्ता, हर संकटीं तूं
प्रभुला गा करुणस्वरें. ध्रु०

---

369. Hope Encouraged.
"O my soul, what means this sadness?"

### ३६९. आशा धरावी.

8, 7, 4. ८, ७, ४ अक्षरी.

१ माझ्या जिवा, कां रे दुःखी?
तोंड कां उतरलें?
आतां हो तूं हास्यमुखी,
भय टाक सगळें.
ख्रीस्त तुझा,
त्यानें जग जिंकिलें.

२ जरी तुला घडोघडीं
दुष्ट हावा त्रासिती,
जरी तुझी देहबुद्धि
मोठ्या पेंचीं घालिती,
जिंकसील;
ख्रीस्तें शक्ति मिळती.

3 जग असो तुला वैरी,
दुःख लागो अनिवार,
येशू तुझा हो कैवारी,
नाहीं तो विसरणार.
तो विश्वासू,
पूर्ण करितो उद्धार.

४ जरी मार्ग क्रंठतांना
अडथळे लागती,
तो प्रेमानें राखितांना
पोंचवील वरतीं.
कर स्तुती,
ख्रीस्तकृपा पुरती.

---

370. THE WORLD'S RIDICULE.

### ३७०. जग निंदक.

Hindu M. अभंग.

१ जग निंदकच मोठें,
पाहीनात खरें खोटें.
२ असा खरा ख्रीस्ती धर्म,
शोधीनात त्याचें मर्म.
३ नांव उगेंच ठेवावें,
मना वाटे तें बोलावें.
४ स्वतां सत्य पाळीनात,
पाळणारा देती लात.
५ ज्ञातिभेद केला धर्म,
मज वाटे नवें कर्म.
६ आहे मला ख्रीस्तछंद,
जग करूं पाही बंद.
७ सोसीन मी सर्व निंदा,
ह्मणतो मी ख्रीस्त वंदा.

---

371. LIVING FAITH.

"Mistaken souls, that dream of heaven."

### ३७१. सजीव विश्वास.

याकोब २.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ तारकावरला विश्वास
सजीव पाहिजे,
जो दिसतो खऱ्याचा भास,
तो वर्ज करिजे.
२ जे कोणी चालती मोकार
तयांचा नाहीं भाव,
तयांस मिळेना उद्धार,
ख्रीस्ती हें मात्र नांव.
३ विश्वासें बुद्धि फिरतां
दुर्भाव मोडतो,
सत्प्रीति मनीं भरतां
मीपणा सुटतो.
४ विश्वासें पापें सगळीं
ओंगळ वाटती,
व प्रभू ख्रीस्ताजवळीं
मनेच्छा ठरती.
५ विश्वासें जय मिळतो
भवदु:खावरी,
जो मरायाला टेंकतो
तो हर्षे अंतरी.
६ विश्वास असा असतां,
सजीव आहे, जाण,
तेणेंच शांति सर्वथा,
अनंतहि कल्याण.

---

372. SELF-EXAMINATION.

"'Tis a point I long to know."

### ३७२. आपणाला पारखणें.

7s. ७ अक्षरी.

१ मला मोठी चिंतना,
रोज येती कल्पना,
ख्रीस्तप्रीति तिळप्राय
माझ्या ठायीं आहे काय ?
२ माझें मन घट्ट फार,
प्रार्थना ही वाटे भार,
राग वेगें उठतो,
कांहीं प्रेमा नसतो.
३ देवभक्ति करितां
पाप येतें सर्वथा,
सुभक्तांनो, आपणां
अश्या होती भावना ?

४ तरी पाप वारंवार
याचा मला वाटे भार,
प्रीति कांहीं नसतां
भार कसा वाटता ?

५ भक्तांसंगें चालतों
तों आनंद पावतों,
ख्रीस्तप्रीति नसतां
हर्ष कसा वाटता ?

६ प्रभू, तूं निवाडा कर,
माझ्या मनीं शांति भर,
तुझा असलोंच मी
तर पाळ नेहमीं.

७ प्रीति खरी असलीच
तर वाढो लागलीच,
नसतां ती मानसीं,
होवो याच दिवसीं.

---

373. ALAS ! I CRUCIFIED THE LORD.

## ३७३. मीच ख्रीस्ताचा शत्रु.

प्रे. २:२३.

Hindu M. पद.(झिंझोटी,दीपचंदी.)

ध्रु०आहा प्रभू, ज्यानें असें केलें
तो मीच जाण.

१ मारीले फटके तुजला कसोनी,
असतां तूं प्रिय भगवान. ध्रु०

२ तुज सोंग कैसें दिधलें नृपाचें,
केला निंदुनि अपमान. ध्रु०

३ तव हातीं पायीं खिळे ठोकिले तैं;
किती झाला व्याकूळ प्राण. ध्रु०

४ पाणी न देतां, कडु आंब दिधली;
तुजला लागलि जैं तहान. ध्रु०

५ असिं सर्व दुःखें सोसीलिसीं त्वां,
त्यांचेंहि मीच मूळ स्थान. ध्रु०

६ आतांहि तुजला बहु दुःख देतों,
मी मित्र कसा बेइमान. ध्रु०

---

374. CHRISTIAN IN DARKNESS.
"Hearken, Lord, to my complaints."

## ३७४. अंधारांत प्रार्थना.

स्तोत्र ४२.

7s. ७ अक्षरी.

१ देवा, ऐक प्रार्थना,
मोठी होती चिंतना,
तूझी कृपा स्मरतों,
तुझी आशा धरतों.

२ मोठीं संकटें अघोर,
उठलीं माझ्या समोर,
लागतात लहरा,
दे आधार, ईश्वरा.

३ मागें प्रातःकाळीं मी
स्तुति करीं नेहमीं,
रात्रीं पडला अंधार
तेव्हां गायिला उद्धार.

४ देवा, कृपा चाहतों,
तुझी वाट पाहतों,
करूं नको हेलना,
ऐका माझी प्रार्थना.

५ माझ्या जिवा, सोड भय,
देव तुझा सदाश्रय,
त्याची आशा नित्य धर,
तोच देव परात्पर.

---

375. CASTING OUR CARES UPON GOD.
"How gentle God's commands."

## ३७५. चिंता देवावर टाकणें.

१ पे. ५:७.

S. M. ६, ८ अक्षरी.

१ संपूर्ण शास्त्रनेम
दयेनें लाविले,
जनांचें योजितांना क्षेम
देवानें दिधलें.

२ तो ह्मणे "मजवर
टाका चिंतांचा भार,

सर्व भक्तांला जन्मभर
देईन पूर्णाधार."
३ काळजी करुनी
कां तुम्ही चिंतातुर?
बापाला सर्व सांगुनी
दुश्चिंता करा दूर.
४ त्यापासीं राहतां
सद्भक्त हे निर्भय,
जगाचा कर्ता रक्षिता
हा त्यांना सदाश्रय.
५ देवाची प्रीति फार,
तो सदा दावितो,
मी त्याच्या पायीं टाकीं भार
व कृपा स्तवितों.

---

376. Trust in God's Promises.

## ३७६. वचनांवर भरवसा.

L. M. ८ अक्षरी.

१ जनांचा योजितां उद्धार
देवानें दिधला करार,
तेव्हां निश्चयाकरितां
स्वनामें केल्या शपथा.
२ दिनांनो, ठेवा पूर्ण भाव,
अढळ जाणा त्याचें नांव,
युगानुयुगीं सत्यवान,
अनंत, सर्व शक्तिमान.
३ हें जग असो उलटें,
पडोत महा संकटें,
टेंकावें वचनांवरी,
धरावी आशा ईश्वरी.
४ ती आशा असतां सबळ,
नांगर राहतो अढळ,
सुटोन वारे अनिवार,
लागोत लहरा अपार.

---

377. Walking by Faith.

"'Tis by the faith of joys to come."

## ३७७. विश्वासानें चालणें.

इब्री ११.

L. M. ८ अक्षरी.

१ अंधारव्याप्त असतां
विश्वासें आम्ही चालतों,
आकाशीं घर शोधितां
विश्वास वाट दावितो.
२ डोळ्यांस जें अदृश्य, जाण,
विश्वासें स्पष्ट दिसती,
त्रिभुवनेंहि दृश्यमान,
आकाशप्रभा पोंचती.
३ विश्वासें हो प्रकाशलें
हें रान कंठितों खुशाल,
सुटोत वारे वादळें,
गर्जोत सिंह विकराळ.
४ तसाच भाव धरुनी
आब्रामें देश सोडिला,
विश्वासें पुढें पाहुनी
खनानीं हर्षें चालला.

---

378. I want to be an Angel.

## ३७८. दिव्य दूत होणें.

7, 6. ७, ६ अक्षरी.

१ मी दिव्य दूत व्हावा,
दुतांसीं मिळुनी
हातांत विणा घ्यावा
मुगुट घालुनी.
तेथें प्रभुच्या पायां
अखंड मी राहीन,
येशूला वाखाणाया
सुस्वरें हो गाईन.
२ मी भागायाचा नाहीं,
अश्रू न गाळणार
कां दु:ख तेथें नाहीं,
भय न वाटणार.

तेथें प्रभूच्या पायां
अखंड मी राहीन,
दुतांच्या संगें गाया
संतुष्ट मी होईन.

३ मी पापी आहें तरी
ख्रीस्ताची कृपा थोर,
तो फार सुखी तारी
राहाया त्यासमोर.
जेव्हां मी रोगी होऊन
मराया टेंकतों,
हे प्रभू, तूंच येऊन
ने स्वर्गांवेतों.

४ तेव्हां मी दूत होईन,
दुतांसीं मिळुनी,
हातांत विणा घेईन
मुगुट घालुनी.
तेथें प्रभूच्या पायां
अखंड मी राहीन,
येशूला वाखाणाया
सुस्वरें हो गाईन.

---

379. FAITH IN CHRIST.
"No more, my God, I boast no more."

### ३७९. ख्रीस्तावर भाव.

फिल. ३:८.
L. M. ८ अक्षरी.

१ हे देवा, दीन होउनी
मागील पुण्य टाकितों,
मी दुजी आशा सोडुनी
ख्रीस्ताचें पुण्य मागतों.

२ प्रभूची प्रीति जडली,
कर्मांचा गेला अभिमान,
तीं वस्त्रसंभीं खिळिलीं,
कां तेणें हानि झाली, जाण.

३ ख्रीस्ताच्या पुण्याकरितां
अवघें हानि मोजितों,
जीवात्मा त्याला सोंपितां
कृपेची आशा धरितों.

४ माझीं उत्कृष्ट करणीं
हीं तुला दिसतीं मळीण,
तरी विश्वास ठेवुनी
मी न्यायी ठरला जाईन.

---

380. WALKING WITH GOD.
"Oh for a closer walk with God."

### ३८०. देवाच्या संगतीं चालणें.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ हे देवा, तुझ्या संगतीं
चालाया इच्छितों,
लागोच चित्त वरतीं,
प्रकाश चाहतों.

२ मी तुझा मार्ग चुकलों,
अशांत झालें मन,
भक्तांचें सुख मुकलों,
ही खोंचे आठवण.

३ सदात्म्या, कृपा दाखवून
आतां माघारें ये,
तूं माझें दुःख शांतवून
राहा मनामध्यें.

४ जीं पापें मागें करुनीं
त्या तुला दिल्हा खेद,
तीं आतां मी धिक्कारुनी
करितों स्वनिषेध.

५ जें अतिप्रिय मानिलें
तें सर्व टाकितों,
मानीन तुला एकलें,
मी साह्य मागतों.

६ तसा देवाच्या संगतीं
मी नित्य चालणार,
लागेल चित्त वरतीं,
प्रकाश पडे फार.

---

381. Love.

"Happy the heart where graces reign."

### ३८१. प्रीति. १ कर. १३.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ सद्गुणयुक्त जें हृदय
तें किती भाग्यवान !
त्या सद्गुणांत तेजोमय
सत्प्रीति आहे, जाण.

२ संपूर्ण विद्या असल्यास
हावा न सरतील,
मनांत प्रीति नसल्यास
दुर्भाव भरतील.

३ सत्प्रीति फार सोसिती,
अत्यंत दयावान.
अन्याय क्षमा करिती,
रागाला मंद, जाण.

४ ती हेवा गर्व अहंकार
संपूर्ण घालवी,
द्वेषाचे अवघे प्रकार
सत्प्रीति पळवी.

५ सर्वांचें हित पाहुनी
ती टाकी आपलें,
तसें ख्रीस्ताने येउनी
स्वरक्त अर्पिलें.

६ आकाशलोकीं हा सद्गुण
वाढेल अतिशय,
तैं भक्त प्रीति बाळगून
उल्लासती अक्षय.

---

382. Fruits of Faith.

### ३८२. विश्वासणाऱ्याचा अनुभव.

Hindu M. अभंग.

१ होतो अनुभव विश्वास्याला आहा
क्षमा झाली पाहा स्वपापांची.

२ मनुष्यपणही जुनें मालवत
मन नवें होत चाललें कीं.

३ जग, मन यांसीं सेतानासीं लढे,
चाले पुढें पुढें जगदरण्यीं.

४ विश्वास व प्रीति, आशा पावे वृद्धि,
लागे चित्त शुद्धि बापाकडे.

५ पवित्र आत्म्याच्या प्रेरणाहि नित्य
प्राप्त होती, सत्य दाविताती.

६ ख्रीस्तकृपा, प्रीति मनीं घोळे, दाटे,
त्यांस प्रिय वाटे, ख्रीस्ताचा तो.

७ सुभक्तींचें गूज निःसंशय श्रेष्ठ,
करितो प्रगट नित्य देव.

८ अनुभवी तोच देवप्रीति जाणे,
इतर तो नेणे विवेकांध.

---

383. Love to God and Man.

### ३८३. प्रीति करणें.

L. M. ८ अक्षरी.

१ देवाने आज्ञा पहिली
ज्ञनांला असी दिधली,
कीं सर्व मन लाविता
देवाची कर ममता.

२ त्यावाणी आज्ञा दुसरी,
कीं जसी आपणावरी
तसी सर्वांची प्रीति कर;
हें देणें लागे जन्मवर.

३ या आज्ञा दिल्या बहुवार,
या तरी पूर्णशास्त्रसार,
या तुच्छ केल्या असतां
लागेल दंड पुरता.

४ जन्मस्वभाव आपला
हा तरी किती वेगळा!
हे देवा, मोड हा दुर्भाव
आज्ञांत प्रीति पूर्ण लाव.

384. Love. 1 Cor. 13.

"Had I the tongues of Greeks and Jews."

### ३८४. प्रीति. १ कर. १३.

L. M. ८ अक्षरी.

१ जगच्या भाषा सगळ्या
व सर्व विद्या असल्या,
तथापि प्रीति नसतां
मी नाद मात्र तत्त्वतां.

२ विश्वास मोठा असला,
डोंगरहि ढळवला,
तरी सत्प्रीति याशिवाय
साक्षात्कारांचा लाभ काय?

३ जरी स्वधन सगळें
दरिद्री यांला वांटिलें,
कीं जरी जीव अर्पुनी
अग्नींत गेलों जळुनी;

४ तथापि प्रीति ईश्वरी
ही नसतांना अंतरीं,
निरर्थ ज्ञान, चमत्कार,
संकटें, कष्ट, धोंडमार.

---

385. Christian Love.

"Blest be the tie that binds."

### ३८५. ख्रिस्त्यांची परस्पर प्रीति.

S. M. ६, ८ अक्षरी.

१ प्रीति परस्परें
आह्माला जोडिती,
देवाचीं प्रिय लेंकरें
प्रेमळ सोबती.

२ बापाच्या जवळी
विनंती करितों,
आशा व भयें सगळीं
सारिखीं धरितों.

३ सारिखें होतें दु:ख,
सारिखें समाधान,
सारखी लागे छळणूक,
सारिखेंहि कल्याण.

४ वियोग घडतां
पावतों खेद फार,
तरी राहील ममता,
पुन्हाहि भेटणार.

५ ही आशा धरुनी
धैर्य न टाकितों,
आकाशीं मिळूं फिरुनी,
ही वाट पाहतों.

६ त्या वेळीं कष्ट दु:ख
हीं सर्व सरतील,
पूर्ण प्रीतीचें सत्य सुख
सद्भक्त भोगतील.

---

386. Benevolence.

"Father of mercies send Thy grace."

### ३८६. परोपकारिपण.

लूका १०:२९.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ हे देवा, कृपा करुनी
पुरीव प्रेरणा,
तूं आमच्या अंत:करणीं
दे प्रेमभावना.

२ जनांस सुखी पाहतां
आह्माला वाटो सुख,
विपत्ति त्यांस लागतां
मनांत होवो दु:ख.

३ बिचारे हाल पावती
तों कळवळो मन,
आह्मी धांवुनी मदती
वारावी अडचण.

४ तसें ख्रीस्ताने वरुनी
जनांला पाहिलें,
तों कळवळा येउनी
स्वसुख टाकिलें.

५ प्रेमाच्या पंखें उतरून
घेतला अवतार,
पाप्यांचा दंड पत्करून
साधिला पुर्णोद्धार.

६ आह्मीहि तसी भावना
धरावी सर्वकाळ,
नित्य करूनी करूणा
प्रेमें वारावे हाल.

---

387. PRAYER FOR THE DISTRESSED.

**३८७. दुःखितांप्रीत्यर्थ प्रार्थना.**

Hindu M. पद. (पिलू, त्रिवट.)

ध्रु० हे प्रभो, शांतवन कर ये,
या दुःखित पापि जनांचें.

१ दारिद्र व्यापलें असतां
उपवासी निजती कोणी,
विधवा व पोरकीं फिरतां
करूनियां मुखें किलवाणी,
रोगानीं दुःखित होतां,
तळमळती अपुल्या स्थानीं.
ते करिती पाणी पाणी,
परि द्याया नाहीं कोणी,
प्रभुराया ये धांवोनी,
ओरडती प्रेमळवाचे. ध्रु०

२ पापानें होउनि दुःखी
तगमगती ज्यांचे प्राण,
आह्मास्तव प्रभुला दुःखें,
ह्मणुनी जे रडती जाण;
मार्गांत घसरल्यामुळें
अंतरीं ज्यां लागति बाण;
ते निराश भारी होती,
क्षणभरहि नसे विश्रांति,
होइल कां ईश्वरप्राप्ती,
चिंतेंत अशा जिव ज्यांचे. ध्रु०

३ तुजसाठीं पडती बंदीं.
फटके कीं खाती मार.
तरवारि, बंदुका, बरच्या
यानीं जे फार बेजार;
घायांच्या तिडका उठतां
कासाविस होती फार.
दे अशा शांतिचा घुटका,
जवळि रहा पळ पळ घटका,
त्या क्लेशांतुन कर सुटका,
पाहुनी दुःख दीनांचें. ध्रु०

४ देवावर प्रीती कमती
ह्मणुनी ज्यां खेद अपार;
प्रार्थना पोथिचा चटका
लागाया झटती फार.
रात्रंदिन जे श्रम करिती,
व्हाया सत्शास्त्र प्रसार.
तुजवांचुनी हे श्रम व्यर्थ,
लवकर ये दाखिव अर्थ,
भ्रम काढ जनांचा तूर्त,
होउं दे राज्य ख्रीस्ताचें. ध्रु०

५ किति वेळां येउनि द्वारा
त्वां प्रीतीनें ठोकीलें;
परि दुष्ट आम्ही होउनिया
द्वेषानें धिक्कारीलें,
तरि किती ममताळू बारे,
ठोकितां नाहिं सोडीलें;
अपराध घाल पोटांत,
मरणार आह्मी निमिषांत.
कां जाउं देसि नरकांत,
दे उत्तर प्रार्थनांचें. ध्रु०

---

388. BENEFICENCE REWARDED.

**३८८. परोपकारिकांस प्रतिफळ.**

L. M. 8 lines. ८ अक्षरी.

१ एक प्रवासी, दीन फार,
मला अढळे वारंवार,

तो साह्य मागे मजला,
नाकार न करवला.
पुसलें नाहीं त्याचें नांव,
कीं भाऊबंद, देश, गांव;
पाहुनी चर्या सत्वरीं
उपजे प्रीति अंतरीं.

२ मी खाणें खातां दुबळा
तो आला, उभा राहिला,
म्यां सर्व त्याला दिल्हें दान,
स्तवुनी त्याने घेतलें अन्न.
कांहीं खाउनी मजला,
शेष माघारा दिधला,
तें खातां गोड वाटे फार,
दुतांच्या सारिखा आहार.

३ तो पुढें झरा फुटला
तेथें अशक्त पडला,
तें पाणी हातीं लागेना,
व तान त्याला साहेना.
मी आलों, वाटी भरली,
तों विना शक्ति शिरली,
तों मला वाटी भरुनी
दिधलें पाणी जीवनी.

४ तो पुढें कैदी पडला,
अन्यायें दंडी ठरला,
मी त्याचा पक्ष धरितां
दाविली त्याची सत्यता.
तो ह्मणे, ( मनीं खोंचे बाण),
"तूं मजसाठीं देसी प्राण?
रोमांच उभे राहिले,
परी म्या "होय" ह्मटलें.

५ त्यावेळीं तो प्रगटला,
हा प्रभु म्या ओळखीला,
हातांत खिळे रोंविले
ते व्रण दृष्टी पडले.
तो ह्मणे, नांव घेउनी,
"मी जाणें तुझी करणी.
त्वां जे जे केले उपकार,
ते नाहीं मी विसरणार."

---

## VII. PRIVATE DEVOTION.

# ७. एकांतींची भक्ति.

389. Delight in Prayer.
"I love to steal awhile away."

### ३८९. प्रार्थना करण्याची आवड.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ दिवस जाते समयीं
जावें एकीकडे,
करावी भक्ति विनयीं,
हें मला आवडे.

२ देवाला पापें कळवून
रडावें त्यासमोर,
प्रभूच्या भाका आठवून
मागावी कृपा थोर;

३ स्मरुनी दया ईश्वरी
स्तवावें त्याचें नांव,
टाकुनी चिंता त्यावरी
ठेवावा पूर्ण भाव;

४ पाहावें आकाशाकडे
विश्वास धरुनी,
हें मला फार आवडे
या मर्त्यभुवनीं.

५ माझें आयुष्य सरतां
ही शांति होवो फार,
पुढें आकाशीं राहतां
रात्र न लागणार.

---

390. Sweet Hour of Prayer.

## ३९०. भक्तीची वेळ.

L. M. 8 lines. ८ अक्षरी.

१ भक्तीची वेळ, भक्तीची वेळ!
ती मला फार आवडेल,
टाकुनी चिंता सगळी
जाईन बापाजवळी.
ती संकटाच्या समयीं,
देईल शक्ति हृदयीं
व मोह पाशहि टळेल,
अमोल्य ती भक्तीची वेळ.

२ भक्तीची वेळ, भक्तीची वेळ.
ही गोड, कोणा वर्णवेळ ?
करीं ती मला प्रेरणा
देवा, मी अर्पि प्रार्थना,
त्यावरी भाव ठेवुनी
व ओझीं सर्व टाकुनी,
अनंत कृपा तैं मिळेल,
ही धन्य हो भक्तीची वेळ.

३ भक्तीची वेळ, भक्तीची वेळ!
जिवा आधारही लाभेल,
या देहांतुनी सुटुनी
जाईन वर चढुनी;
पवित्र होती भावना,
समाप्त माझ्या प्रार्थना,
तैं जयकार हा गाजेल
सफळ हो भक्तीची वेळ.

391. Nearer to Thee.

## ३९१. ईश्वराजवळ असणें.

6, 4. Peculiar. ६, ४. तऱ्हेवाईक.

१ येऊं दे जवळीं,
तुजवळी,
देउनी शिक्षाहि
घे जवळी;
हे देवा, देवळीं
येउं दे जवळी, तुजवळी.

२ कीं वाटे लागतां
अंधार गाढ,
व उश्या मिळतां
नुसता दगड,
तूं स्वप्नीं भटळीं,
येउं दे जवळीं, तुजवळीं,

३ याकोबासारिखा
दे मला भास,
शिडीने नेटका
मार्ग स्वर्गास.
दुतांची मंडळी
नेवो तुजवळी, तुजवळीं.

४ पुढें मी उठुनी
तुला स्तवीन,
धोंडा उभारुनी
कृपा वर्णीन.
त्या प्रिय बेथेलीं
येऊं दे जवळी, तुजवळीं.

५ कीं हर्ष करितां
चढेन वर,
सूर्य ओलांडितां
काढीन स्वर,
गाईन आभाळीं,
"येऊं दे जवळी, तुजवळी."

392. Habitual Devotion.

"While thee I seek, protecting Power."

## ३९२. नेहमींची भक्तिभावना.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ हे देवा, व्यर्थ कल्पना
न शिरो हृदयीं,
लागाव्या योग्य भावना
या भक्तिसमयीं.

२ त्वां मला मन दिधलें
तें ध्यानीं लावितों,
अनंत प्रेम दाविलें
तें आतां स्तवितों.

३ जें कांहीं मला घडतें
तें तूंच लाविसी,
जें कांहीं सुख मिळतें
तें तूं पुरविसी.

४ संतोष मनीं भरतां
मी स्तुति वाढवीन,
जिवाला दुःख लागतां
तें तुला कळवीन.

५ मी तुझी कृपा पावुनी
स्मरेन ममता,
विपत्ति येतां पाहुनी
धरीन धीरता.

६ लागोत दुःखें अनिवार,
न वाटे किंचित् भय,
मी नित्य शांत राहणार,
कां मला तूं आश्रय.

---

393. The Christian's Retreat.

"From every stormy wind that blows."

### ३९३. ख्रिस्ती माणसाचा आश्रय.

L. M. ८ अक्षरी.

१ प्रचंड वारा सुटतां
अपूर्व क्लेश लागतां,
भक्ताला मिळतो आश्रय,
बापाच्या पायीं तो निर्भय.

२ सर्वांहुनी तें सुखस्थान,
तेथेंच होतें समाधान,
सत्सुख प्रभु गौरवी
बापाच्या पायीं पुरवी.

३ तेथेंच पावतां संयोग
मित्रांचा होतो सुखभोग,
ते जरी दूर राहती,
बापाच्या पायीं भेटती.

---

394. Private Devotion.

"Return, my roving heart, return."

### ३९४. एकांतींची भक्ति.

L. M. ८ अक्षरी.

१ हे माझ्या जिवा, आतां फीर,
भुलविणारीं सुखें सोड,
तूं एकांतींच्या जागीं शीर,
मनाचीं वनें लाव ओढ.

२ हे देवा, अति गुप्त स्थानं
तुझ्या दृष्टीला उघडें,
मी आतां तुझें करीं ध्यान
कृपेनें पाहा इकडे.

३ माझें हृदय शोधुनी
तूं घालवी दुर्वासना,
शास्त्राचें तेज पाडुनी
पवित्र कर भावना.

४ पुढें तूं प्रेम दावितां
अंतरीं कर समाधान,
होवो निश्चय पुरता
कीं माझ्या मनीं तुझें स्थान.

---

395. Praying Always.

### ३९५. प्रार्थना करण्याची आवड.

S. M. ६, ८ अक्षरी.

१ हे देवा, कृपा कर,
दे भक्तिभावना,
म्या नित्य पाहतांना वर
करावी प्रार्थना.

२ कधीं न थकतां
म्या कृपा मागुनी
पावावा हर्ष पुरता
तुझ्याच चरणीं.

३ संकट समयीं
मनाला तूं दे धीर,
धरूनी तुला हृदयीं
चित्त असावें स्थिर.

४ सर्वदां प्रार्थना
कराया सुचवी,
असी करूनी करुणा
आकाशीं पोंचवी.

---

396. All for Christ.

## ३९६. ईश्वराला अर्पण.

8s. (Abhang). अंभग.

१ देवा, तुजपासीं येऊं,
तेव्हां तुला काय देऊं?
अंत:करणाची प्रीति,
करुणेची मनोवृत्ति;
दया, क्षमा, कळवळा,
हींच प्रेमें अर्पू तुला.
जसा तूं मनुष्यांपासीं
तसें आह्मी शेजाऱ्यासीं.

२ आह्मी अंधां वाटे नेऊं,
गरीबाला खाया देऊं,
घायाळांचे घाव बांधू,
सर्व जनां लेखूं बंधू.
देवा, हे पाळुनी विधि
दावूं उपकारी बुद्धि,
करितां जनांचें क्षेम
तुला अर्पू मोठें प्रेम.

---

397. Meditation,

" My God, permit me not to be."

## ३९७. एकांतींचें ध्यान.

L. M. ८ अक्षरी.

१ टाकुनी आतां चिंता घोर
मी आलों ईश्वरासमोर,
हे प्रभू, दे सद्भावना,
घालीव व्यर्थ कल्पना.

२ भवजाळांत गुंततां
कां करूं मनभ्रष्टता ?
कशाला धरूनी विषय
टाकावी कृपा अतिशय ?

३ हे देवा, शब्द बोलुनी
सोडीव पापापासूनी,
मी आतां तुझें ऐकतों,
जगीक सुखें टाकितों.

४ हटोत दुष्ट वासना,
न शिरो त्यांची कल्पना,
देवाचें ध्यान करितों,
आकाश सुख धरितों.

---

398. Just as you are.

## ३९८. आहेस तसाच ये.

L. M. ८ अक्षरी.

१ जसा मी आहें निराधार
तसाच आलों, दे उद्धार,
वाहिली तुझी रक्तधार
प्रिय देवाच्या कोंकरा.

२ तसाच आलों, करूं काय,
शुद्ध व्हायाला निरुपाय,
तुझेंच रक्त दे सहाय
प्रिय देवाच्या कोंकरा.

३ तसाच आलों, भ्रांति फार
उठती हावा अनिवार,
घेरिती संकटें अपार,
निवार प्रिय कोंकरा.

४ तसाच आलों, अंधळा,
दु:खी दरिद्री, श्रमला,
तुझा संग्रह सगळा
पुरीव प्रिय कोंकरा.

५ अशाला तूं स्वीकारिसी,
प्रेमानें क्षमा करिसी,
स्वबोली न फिरविसी,
आलों मी, प्रियकोंकरा.

६ तुझ्या प्रीतीनें जिंकिलें,
हृदया भती चेंचिलें,
मी आतां सर्व सोंपिलें
तुला, हे प्रियकोंकरा.

---

399. Even Me.

३९९. मलाहि दे.

8, 7, 4. ८, ७, ४ अक्षरी.

१ प्रभू, ठायीं ठायीं पुरी
कृपावृष्टि वर्षवी;
झरे, सर्वां देसी जरी;
माझी तृषा भागवी.
माझीहि,
माझी तृषा भागवी.

२ टाकूं नको देवा बा हे,
जरी फार पातकी.
खरा अनुतापी आहें,
टाकूं नको नरकीं.
मलाहि
टाकूं नको नरकीं.

३ सोडूं नको प्रभू कसा,
तुझा बाहु धरिला;
तुझी कृपा मधु जसा,
ठेवी जवळी मला.
मलाहि,
ठेवी जवळी मला.

४ सोडूं नको आत्म्या साच्या
राहा माझ्या अंतरीं;
बोल शब्दें समर्थाच्या,
नवें कर सत्वरी.
मलाहि
नवें कर सत्वरी.

५ पापमोहें हरलेला
सुखस्थान सोडुनी;
आतां मोह सारा गेला,
मला तार धुंडुनी.
मलाहि,
मला तार धुंडुनी.

६ प्रीति देवाची अढळ,
कृपा दृढ येशूची,
पवित्र आत्म्याचें बळ
हीं मिळालीं, पुरेंची,
मजसी
हीं मिळालीं, पुरेंची.

७ सोडूं नको हे कृपाळू,
मला आण जवळी,
क्षमा कर कनवाळू,
मग वाटी भरली.
माझीहि
वाटी ताठ भरली.

---

400. Importunate Prayer.

"Jesus, who knows full well."

४००. आग्रहाची प्रार्थना.

S. M. ६, ८ अक्षरी.

१ येशू हा जाणतो
भक्ताच्या भावना,
दिनाला तोच ह्मणतो,
"करा हो प्रार्थना."

२ ते कांहीं मागतां
तो प्रेमें देतो कान,
कोणी विनंती करितां
थकूंच नये, जाण.

३ तो करितां उशीर
मागा हो फार वेळ,
ठोका न सोडितांना धीर,
सुवेळीं उघडेल.

४ येशूचे प्रिय लोक
करिती प्रार्थना,
तों त्याला कळे त्यांचा शोक
व येती करूणा.

५ हें आम्ही आठवून
मागावें वारंवार,
सुवेळीं कृपा दाखवून
करील पूर्णोद्धार.

---

401. Access to God everywhere. Jo. 4:21.

"They who seek the throne of grace."

### ४०१. देवाला सर्वत्र शरण जाणें.

7s. ७ अक्षरी.

१ ज्याला भक्ति आवडे
देव येतो त्याकडे,
कोठें तरी शोधिलें,
तो सर्वत्र आढळे.

२ सुख सोई असतां
किंवा हाल लागतां,
पाहा ईश्वराकडे,
तो सर्वत्र सांपडे.

३ सर्व सुखें सरतीं
भयें दुःखें शिरतीं,
तेव्हां पाहा त्याकडे,
तो सर्वत्र सांपडे.

४ माझ्या जिवा, जन्मवर
तूं बापाची आशा धर,
नित्य पाहा त्याकडे,
तो सर्वत्र सांपडे.

---

402. Communion with God.

"Our Heavenly Father calls."

### ४०२. देवासीं समागम.

१ यो. १:३.

S. M. ६, ८ अक्षरी.

१ बापा पुत्रासीं, जाण,
आह्माला भागीपण;
भक्तांचें केवढें कल्याण!
अति उल्लासे मन.

२ अनंत ईश्वरें
ममता दाविली,
आह्माला मानी लेंकरें,
राहतो जवळी.

३ तो कान देउनी
ऐकतो प्रार्थना,
दीनाचें दुःख पाहुनी
करितो करुणा.

४ सर्वदा तो उदार,
गरजा पुरवी,
भक्तांला देउनी आधार,
कृपेने चालवी.

५ येशू हा ममताळ
आह्माला पाळितो,
तो आह्मासाठीं सर्वकाळ
मध्यस्थी करितो.

६ हे जिवा, गाजवी
प्रभूचें मोठें प्रेम,
पुढें त्यासंगें गौरवीं
पावसी अति क्षेम.

---

403. Prayer.

"Come, my soul, thy suit prepare."

### ४०३. प्रार्थना.

7s. ७ अक्षरी.

१ माझ्या जिवा, धैर्य धर,
येशूपासीं अर्जी कर,
त्याने आज्ञा दिल्ही, जाण,
कसा करीं अनमान?

२ जिवा, मोठा राजा तो,
जगें हातीं धरितो,
माग वर अतिशय,
धिक्काराचें नाहीं भय.

३ प्रभू ख्रीस्ता, पापभार
हाच मला जाचे फार,
आतां कर मोकळें,
त्वा स्वरक्त ओतिलें.

४ तुझ्या पायां पडतों,
मनशांति मागतों,
माझ्या ठायीं वस्ती कर,
तेथें सदा सत्ता धर.

५ मी जगांत असतां
मला दाव ममता,
तूंच मित्र मेंढपाळ
वाटे लाव सर्वकाळ.

६ तुझी इच्छा दाखवी,
मला शक्ति पुरवी,
विश्वासानें जगूं दे,
भक्तिभावें मरूं दे.

---

404. A Child's Prayer.

**४०४. लेंकराची प्रार्थना.**

7s. ७ अक्षरी.

१ प्रभू, जरी मी लाहान,
तुझी करुणा महान,
माझें पाप झालें थोर,
नित्य दिसतें समोर,

२ तरी मला आशा फार,
कीं तूं करिसी उद्धार,
बाळां त्वां बोलाविलें,
प्रेमें क्षेम दिधलें.

३ त्वांच म्हटलें शिष्यांस,
मना करूं नका यांस,
बाळें मला प्रिय फार,
तीं आकाशीं भरणार.

४ येशू, कर करुणा,
तार मज लाहाना,
मी आयुष्या पावेतों
तुझी सेवा करितों.

---

405. A Child's Prayer.

**४०५. लेंकराची प्रार्थना.**

7s, 6 lines. ७ अक्षरी, ६ चरणी.

१ प्रिय येशू तारका,
पाहा दीन बाळका;
मी पतित तुजसमोर,
केलीं पातकें अघोर;
आलों कृपा मागाया,
मी अयोग्य पावाया.

२ तूं जगांत असतां,
दु:ख हाल सोसितां,
दुष्टांनीहि त्रासिलें,
मोहवाया पाहिलें;
माझीं दु:खें जाणसी,
कनवाळू असशी.

३ अपराधी ठरलों,
तुझ्या पायां पडलों,
आतां आशा तुजवर,
या दीनाची क्षमा कर.
तुवां अशा पापिया
प्राण दिल्हा ताराया.

---

406. A Morning Prayer.

**४०६. सकाळचें गीत.**

8s. (Abhang) अभंग.

१ देवा तूं दयाळू फार,
थोर तुझे उपकार.

२ रात्रीं केला तूं सांभाळ,
आतां दाविली सकाळ.

३ देवा माझा हात धर,
राख मला जन्मभर.

४ मला सर्वदा चालीव
नीट मार्ग तूं दाखीव.

५ मी न वांकडें चालावें,
पाप कांहीं न करावें.

६ आहे मूळ मी बिचारा,
येशू आहे तारणारा.

७ याचें घेतों प्रिय नांव
देवा तुझी कृपा दाव.

---

407. A MORNING HYMN.

## ४०७. सकाळचें गीत.

8s. (Abhang.) अभंग.

१ देवा, तूंच राखिलेंसी,
रात्रभर पाळिलेंसी,
तुझा आतां मी आभारी,
आज दुःखें तूं निवारी.
माझ्या मनीं तेज पाड,
माझ्या दुष्ट बुद्धि काढ,
प्रभू येशू, तूं उद्धर,
तुझ्या रक्तें शुद्ध कर.

२ म्या जाणावी तुझी प्रीति,
म्या करावी तुझी स्तुति,
तुझ्यावाणी नम्र व्हावें,
तुला नित्य आवडावें.
आईबापां होतां मान्य
म्या पाळाव्या त्यांच्या आज्ञा,
मला आणि माझ्या मित्रां
दे उद्धार, देवपुत्रा.

---

408. AN EVENING PRAYER.

## ४०८. सायंकाळचें गीत.

8s. (Abhang). अभंग.

१ आतां मावळलें दिन
देव स्तुति मी करीन.
त्याने आज रक्षियेलें
मला प्रेमें चालविलें.

२ परी माझीं पापें किती,
किती गुण दोष चित्तीं !
बहु हीं वेडेपणाचे
शब्द बोललों मी वाचे.

३ आतां मज पाप्यावरी
दयानिधे, दया करी.
क्षमा करी माझें पाप,
मनीं देई पश्चात्ताप.

४ झोंप वेळीं देवदूत
माझें रक्षण करोत;
होवो अंधाराच्या काळीं
त्यांची छावणी जवळीं.

५ मी न भित क्षणभर
कांकीं तूं न जासी दूर.
दूतराजा एथें राहे
मला कृपादृष्टीं पाहे.

६ शांत झोंपीं आतां जातों,
प्रेमें तुझी स्तुति गातों,
उठवी प्रभातें देवा,
तुझी करायाला सेवा.

---

409. AN EVENING HYMN.

## ४०९. संध्याकाळचें गीत.

8s. (Abhang.) अभंग.

१ सूर्य मावळुनी गेला,
आतांशीं अंधार झाला,
देवा, तुझी मोठी प्रीति,
रोज उपकार किती !
आज बहु पापें केलीं,
माझी वेळ व्यर्थ गेली,
बापा, माझी क्षमा करी,
कृपा कर मजवरी.

२ आतां निजायाला जाईं,
सारी रात्र झोंपीं राहीं,
देवा, तूंच जागणारा,
मला तूं संभाळणारा.
निजतों निर्भय मनें,
कां तूं पाळसी प्रेमानें;
सुखरूप जेव्हां उठें,
गाईं तुझें प्रेम मोठें.

---

410. An Orphan's Hymn.

### ४१०. अनाथाचें गीत.

8s. (Abhang.) अभंग.

१ मी अनाथ, मी बिचारा,
तरी देव पाळणारा;
मला अन्नवस्त्र, घर,
तोची देतो जन्मभर.
२ म्या विनंती केल्यावरी
देव थोर दया करी;
रात्रंदिस तो संभाळी,
तो टाकीना कदाकाळीं.
३ जरी एथें होई दुःख,
त्याची प्रीति देती सुख,
आणि पुढें मेल्यावरी
राहीन देवाच्या घरीं.
४ म्हणूनीयां त्याला गावें,
शांत सर्वदा राहावें,
कां कीं जरी मी बिचारा,
तोची आहे पाळणारा.

---

411. A Door-keeper.

### ४११. देवद्वारीं असण्याची इच्छा.

Hindu M. अभंग.

१ देवा कर अंगीकार,
घालूं कोणावरी भार.
२ कोण पुरवील आशा?
तुजवीण हे परेशा.
३ इच्छा माझी हीच, जाण,
तुझ्या द्वारीं व्हावें श्वान.
४ होतां समर्थाचें श्वान,
मग तया कैची वान !

---

412. The Service of Song.

### ४१२. गाणें. गीतें ७०:५.

Hindu M. आर्या. ( गीति.)

१ अज्ञानी निरुपायी,
दीन, दरिद्री, अशक्त मी भ्रष्ट;
कसपट, मी किंपदार्थ,
देवा माझे निवार हे कष्ट.
२ ह्या कंठानें पूर्वीं,
पापाची गाइली स्तुती भारी;
तूं तर मग संजीवन,
कां वाटावी तुझी स्तुती भारी.
३ कर कंठ मोकळा हा,
साफ,मधुर कीं विण्याचि तार जसी,
प्रेमें भरो हृदय हें,
घडो तुझी स्तुति जगांत व्हावि तसी.

---

413. A Prayer.

### ४१३. देवाची प्रार्थना.

Hindu M. दिंडी.

१ ईश्वरा, मी तूजपुढें कसा आहें,
शून्यता कीं अभाव जणूं पाहे,
जरी आहें मी खचित धूळ राख,
तरी प्रभु तूं मज न सोडितां राख.

---

414. A Penitential Prayer.

### ४१४. पश्चात्तापयुक्त प्रार्थना.

Hindu M. अभंग.

१ तूंचि माझा माय बाप,
क्षमा कर माझें पाप.

२ कोण्या तोंडें प्रार्थूं तुज
नसे अधिकार मज.
३ सर्व पापें पदरीं घेतों,
दान क्षमेचें मागतों.
४ पापी भ्रष्ट मी लाचार,
ख्रीस्तामुळें अंगीकार.

---

415. Longing for Peace.

### ४१५. सत्शांत्यर्थ प्रार्थना.

Hindu M. पद.(कल्याणी,दीपचंदी).

ध्रु० प्रभु, मज देई तुझी खरि शांती.
१ जगशांतीनें बहु मळमळतें,
होत असे मज वांती. ध्रु०
२ शांती आपुली दिलि त्वां ज्यांना,
काय तयांची कांती. ध्रु०
३ शांती दे, स्थिर कर मन माझें;
काढ मनाची भ्रांती. ध्रु०
४ तव शांतीनें मज सुख वाटे;
वर नेई ती अंतीं. ध्रु०

---

416. Salvation asked as an Alms.

### ४१६. तारणाची भिक्षा.

गी. ११६:१३.

Hindu M. अभंग.

१ देवा मज द्यावी तारणाची भिक्षा,
नाहींच अपेक्षा दुजी कांहीं.
२ नम्रतेची वाटी विश्वासाच्या हातीं,
भिक्षा घाली वा ती तारणाची.
३ भावें नम्रतेनें आले जे शरण,
तयांसी तारण दिधलें त्वां.
४ पाप्यां ताराचाला स्वपुत्र दिल्हासी;
प्रीति जना कैसी दाविली त्वां.
५ मागतांना मिळे, शोधितां सांपडे,
ठोकितां उघडे, भाक तुझी.
६ ऐशा तुझ्या वार्ता ऐकिल्या स्वकर्णी,
ह्मणुनी आंगणीं आलों देवा.

७ मंदक्रोध बहुप्रसाद तूं बारे,
परत माघारें लावूं नको.

---

417. Fitness for Heaven sought.

### ४१७. आत्मिक फलार्थ प्रार्थना.

Hindu M. पद. ( सोहनी, त्रिवट.)

ध्रु० प्रभुरे, मला असे गुण लाव लाव रे.
१ नीति, दया, प्रीति, नम्रताहि, भीति,
यांचा मला पडो खरा डाव रे. ध्रु०
२ शास्त्र, भक्ति, स्तुती, कीर्त्तनावडी ती,
यांची मला सुटो बहू हांव रे. ध्रु०
३ दमन इंद्रियांचें, प्रार्थना करोनी,
भावेंच मी धांवेन हो धांव रे. ध्रु०
४ मृत्यु खिंडितून फार नेउनीयां,
देसी अंतीं नीजपदीं ठाव रे. ध्रु०

---

418. Bread and Water of Life.

### ४१८. जीवनान्नोदकभिक्षा.

Hindu M. पद. (पिलू, त्रिवट.)

ध्रु० प्रभू, जीवनाचें मजला दे अन्न पाणी.
१ अन्न, उदक कीं, ज्ञान जगिक हें,
तृप्ति न होती या सुखानीं. ध्रु०
२ परमार्थाच्या भूक तहानेनें
व्याकुळ झाला दीन प्राणी. ध्रु०
३ पतितच धाले बहु तव दानें,
वदती पवित्र शास्त्रवाणी. ध्रु०
४ शोमरूनी स्त्रीसीं वदलासी जें,
हेंचि मला दे अन्नपाणी. ध्रु०
५ शीणहि झाला हा जीव, डोळा;
पडुं दे सुवार्त्ता मम कानीं. ध्रु०
६ संजीवनाचें अन्न उदक तूं,
प्रार्थितों मी जोडुनि पाणी. ध्रु०

419. Love for Christ.

### ४१९. ख्रीस्तपदांची आवड.

Hin. पद. (कल्याणी-माझा,दीपचंदी.)

ध्रु० देवा, माझी ख्रीस्तपदीं प्रीति जोड.

१ सच्छास्त्रमनन करण्याकरितां,
नच लागो अळसाची खोड. ध्रु०

२ भावीक भक्त करितात पोथी,
उपदेश बहु लागो गोड. ध्रु०

३ स्तुति प्रार्थनादी करिते प्रसंगीं,
झोंपेची सर्वई ही मोड. ध्रु०

४ सैतान मजला भारी छळीतो,
सारें मस्तक त्याचें फोड. ध्रु०

५ अगणित पापें करितों स्वतां मी,
ख्रीस्तामुळें सारीं सोड. ध्रु०

६ तन, मन, धन हीं अर्पूनि ख्रीस्ता,
व्हावा शेवट माझा गोड. ध्रु०

---

420. A Pastor's Meditation.

### ४२०. पाळकाच्या कामाची भारदस्ती.

Hindu M. अभंग. (सोरट,त्रिवट.)

१ काम पाळकाचें भारी,
देवा व्हावें साह्यकारी.

२ मोशे नम्र असतांना
परि ह्या कामासीं धजेना.

३ जड, मूढ मी, उद्धट,
कैसा लागेल शेवट ?

४ तुझ्या मंडळींची सेवा
मज कैसी घडे देवा ?

५ मंडळीस संभाळाया
शक्ति द्यावी प्रभुराया.

६ शोभे कामा या, पाळक
ख्रीस्तापरी जो बाळक.

---

## VIII. FAMILY DEVOTION.

## ८. कुटुंबांतली भक्ति.

421. Morning and Evening Hymn.

"My God, how endless is thy love."

### ४२१. सकाळचें व सायंकाळचें गीत.

L. M. ८ अक्षरी.

१ हे देवा, तुझे उपकार
अखंड प्रतिदिवसीं,
सांजे सकाळीं तूं उदार,
अनंत प्रेम दाविसी.

२ रात्रीं अंधार पसरून
तूं माझा करिसी संभाळ,
फिरूनी मला उठवून
तूं नवी दाविसी सकाळ.

३ मी तुला प्राण अर्पितों,
तुझ्या सेवेंत मला लाव,
हा जीव जाई पावेतों
गाईन तुझा प्रेमभाव.

---

422. Morning Hymn.

"Forth in thy name, O Lord we go."

### ४२२. सकाळचें गीत.

L. M. ८ अक्षरी.

१ देवाचें नाम घेउनी
जातों कराया व्यवहार,
देवाला नित्य भिउनी
त्यासाठीं चालवूं संसार.

२ सोडाया अवघे दुर्गुण
जपुनी करूं प्रार्थना
वर्ते आकाशीं निरखून
टाकूं दैहिक वासना.

३ जें कांहीं मिळे तें सत्वर
देवाला द्याया पाहतों,

त्यासंगतीं आयुष्यभर
प्रेमें चालाया मागतों.

---

423. MORNING HYMN.

"Awake my soul, and with the sun."

### ४२३. सकाळचें गीत.

L. M. ८ अक्षरी.

१ हे जिवा, ऊठ, झोंप त्याग,
सूर्याच्या संगें कामा लाग,
देवाची कृपा स्मरूनी
गा त्याचीं मोठीं करणीं.

२ हे देवा, वंद्य तुझें नाम
वर्णीन तुझें श्रेष्ठ काम,
त्वां मला रात्रीं राखिलें,
हें नवें दिन दाविलें.

३ तुला सर्वस्व अर्पितों,
पापांची क्षमा मागतों,
निटाव माझे मनोदय,
पापाचें मला लागो भय.

४ कर्त्तव्य मला सुचवीं,
सर्वदा मला वळवी,
तुझ्या सेवेंत मला लाव,
म्या गौरवावें तुझें नांव.

---

424. MORNING HYMN.

"Now the shades of night are gone."

### ४२४. सकाळचें गीत.

7s. ७ अक्षरी.

१ आतां रात्र सरली,
प्रभा वर चढली,
देवा, मला हो आधार,
माझी पापरात्र सार.

२ सर्व भयें दूर कर,
मन प्रकाशानें भर,
दे भक्तीची भावना,
दे सेवेची प्रेरणा.

३ माझें मन तूं आवर,
सर्व शत्रु दूर कर,
जातां येतां सर्वकाळ,
माझें चुको मोहजाळ.

४ होई काम अवघें
तेव्हां मला वर्तं घे,
तेथें जेव्हां पोंचणार
रात्र नाहीं पडणार.

---

425. DAILY DEVOTION.

"When streaming from the eastern skies."

### ४२५. रोजची भक्ति.

8s. (Abhang). अभंग.

१ प्रात:काळीं प्रभा चढे
ती दृष्टीस जेव्हां पडे,
तेव्हां, प्रभू, कृपा दावी,
माझ्या मनीं ती बिंबावी.
तूं प्रकाश करणारा,
पतितांचा तारणारा,
मला लाव रक्त तुझें,
मी न मागें क्षेम दुजें.

२ रोज दु:खें लागतांना
हो आधार माझ्या मना,
चिंता येतां मजवरी
तूं हो माझा बोधकरी.
संकटें होतांना भारी
माझीं भयें तूं निवारी,
सर्वदा तूं शक्तिदाता,
तूंच माझा मातापिता.

३ जेव्हां सूर्य अस्ता जाई
मी येतांना तुझ्या पायीं,
खोड माझ्या अतिक्रमा,
सर्व पापें कर क्षमा.
सारी रात्र मला पाळी,
पुन्हा उठवी सकाळीं,

लक्ष वर्ते लागो नित्य,
तूंच पुरवी सामर्थ्य.

४ मरणाची रात्र येतां,
येशू, तूं उजेड देतां
माझें समाधान करीं,
माझ्या मनीं हर्ष भरीं.
मरणाची नांगी तोड,
मरणाची सत्ता मोड,
नेऊनिया बापापाशीं
मला राहूं दे आकाशीं.

---

426. Evening Hymn.

"Thus far the Lord hath led me on."

### ४२६. सायंकाळचें गीत.

L. M. ८ अक्षरी.

१ हे देवा, मला जगवून
त्वां वागविलें आजवर,
तसीच कृपा दाखवून
तूं मला राख जन्मभर.

२ म्या वेळ घालविली फार,
बहुत केलें मूर्खपण,
क्षमा कराया हो उदार,
तुजसीं जडो माझें मन.

३ मी आतां सुखें निजतों,
शांतीचा वारा मला घाल,
ही रात्र जाई पावेतों
दूतांच्या पाहऱ्याने पाळ.

४ तूं मजपासीं राहुनी
अंधारीं दे निर्भयता,
सकाळीं मला फिरुनी
दाखीव तुझी ममता.

५ आयुष्यदिन मावळेल
तों मला सुखें निजवी,
पुढें जों प्रभु उतरेल
तों मला तेजें उठवी.

---

427. Evening Hymn.

"Glory to Thee, my God, this night."

### ४२७. सायंकाळचें गीत.

L. M. ८ अक्षरी.

१ हे देवा, आज देतां क्षेम
त्वां मला दाखविलें प्रेम,
या रात्रीं मला तूं संभाळ,
तुझ्याच पंखांखालीं घाल.

२ जीं पापें केलीं आजवर
तीं येशूमुळें क्षमा कर,
तशाने मला निजतां
होईल शांति सर्वथा.

३ मला सद्बुद्धि शिकवी,
मरणभय घालवी,
तेणेंच मरणाची वेळ
झोंपेच्या सारिखी वाटेल.

४ मी टेंकतांना तुजवर
दे गोड झोंप रात्रभर,
तरी सकाळीं उठुनी
करीन सेवा झटुनी.

५ मी निजतां, हे ईश्वरा,
तूं कर माझा पाहरा,
प्रेमाचा भाव सुचवी,
दुष्ट विचार घालवी.

६ पुन्हा न झोंप लागणार
त्या सुदिनाची आशा फार,
तों दुतांसंगें कृपा थोर
गाईन ईश्वरा समोर.

---

428. Evening Hymn.

"Softly now the light of day."

### ४२८. सायंकाळचें गीत.

7s. ७ अक्षरी.

१ आतां रात्र पडली,
सूर्यप्रभा सरली,

करितांना देवध्यान
मला वाटे समाधान.
२ पुढें मरणाची वेळ
रात्रीवाणी पोहंचेल,
तेव्हां बापापासीं, जाण,
मला मिळायाचें स्थान.

---

429. Evening Hymn.
"Lord, Thou wilt hear me when I pray."

## ४२९. सायंकाळचें गीत.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ हे देवा, माझी प्रार्थना
तूं रोज ऐकसी,
दीनांच्या अंतःकरणा
संतुष्ट करिसी.
२ मी काम धंदा ठेवुनी
निजाया टेंकतों,
तुझेंच ध्यान करुनी
आनंद पावतों.
३ या वेळीं माझीं स्तवनें
दयेनें अंगीकार,
तूं आठवुनी वचनें
कृपेनें मला तार.
४ मनांत शांति भरतां
मी आतां निजतों,
तूंच संभाळ करितां
निर्भय असतों.

---

430. Evening Hymn.
"Dread Sovereign, let my evening song."

## ४३०. सायंकाळचें गीत.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ माझीं रात्रींचीं स्तवनें
हे देवा, अंगीकार,
या वेळीं स्तुति अर्पणें
हें गोड वाटे फार.
२ त्वां आज मला वांचवून
अनर्थ वारिले,
गरजा माझ्या पुरवून
त्वां प्रेम दाविलें.
३ तूं क्षेम देसी नेहमीं,
हे ईश्वरा दयाळ,
किती अनुपकारी मी,
स्वच्छंदी सर्वकाळ.
४ ख्रीस्तानें मजकरितां
केला उद्धारोपाय,
परी म्यां प्रेम दावितां
त्यासाठीं केलें काय?
५ हे प्रभु, मी पापिष्ठ फार,
तूं मला हो आश्रय,
माझ्या मनाला तूं सुधार,
जीवन दे अक्षय,
६ स्वरक्तें मला शिंपडून
निर्दोष ठरवी,
तुझ्या उरासीं टेंकवून
शांतीनें निजवी.

---

431. Evening Hymn.
"The day is past and gone."

## ४३१. सायंकाळचें गीत.

S. M. ६, ८ अक्षरी.

१ उजेड जाउनी
पसरला अंधार,
हें सुचो अंतःकरणीं
कीं मृत्यु पोंचणार.
२ मी वस्त्रें काढुनी
निजाया टेंकतों,
तसा जीवात्मा मरणीं
देहाला टाकितों.
३ या रात्रीं, ईश्वरा,
तूं मजला संभाळ,

दूतांचा ठेव पाहरा
कराया प्रतिपाळ.
४ सकाळीं उठवून
उजेड दाखवी,
आकाशमार्गीं चालवून
तूं धैर्य पुरवी.
५ आयुष्य सरतां
तूं भय दूर कर,
घराहीं कवटाळितां
बापा, घे मला वर.

---

432. Evening Hymn.

## ४३२. सायंकाळचें गीत.

8s. (Abhang.) अभंग.

१ रात्र झाली, झोंपीं जातों,
ईश्वराची स्तुती गातों,
देवा, मला संभाळावें,
रात्रभर तूं पाळावें.
२ रात्रीं जर मरायाचें,
पुन्हा नाहीं उठायाचें,
तर ख्रीस्तपुण्य द्यावें,
मला आकाशांत घ्यावें.
३ टाळूनिया पाप दुःख
तेथें द्यावें सदा सुख,
ख्रीस्तनामें अर्जी असीं,
माझ्या बापा, तुजपासीं.

---

433. Family Hymn.

## ४३३. कुटुंबाचें गीत.

7s. ७ अक्षरी.

१ देवा, तुला स्तवितों,
तुझी कृपा वर्णितों,
तूं आम्हाला पाळिसी,
संकटें निवारिसी.
२ नमतों तुझ्यासमोर,
तूं सर्वांचा कर्त्ता थोर,
त्वांच दिधलें संतान,
तुला देतों सर्व मान.
३ प्रातःकाळीं वेळेवार
वर्णूं तुझे उपकार,
सायंकाळीं मिळतां,
गाऊं तुझी ममता.
४ तुझें शास्त्र वाचुनी
स्मरूं तुझीं करणीं,
बोध करूं लेंकरांस,
मार्गीं लावूं चाकरांस.
५ करूनिया अंगिकार
तूं आम्हाला दे उद्धार,
पुढें तुझ्या वैभवीं
आवघ्याला पोंचवी.

---

434. Jesus, our Shepherd.

"Saviour, like a Shepherd lead us."

## ४३४. येशू आमचा मेंढपाळ.

8, 7, 4. ८, ७, ४ अक्षरी.

१ प्रिय येशू मेंढपाळा,
आम्हां मेंढ्यां चालवी;
कुरणांत नें आम्हाला,
कोंडवाडीं बसवी.
प्रिय येशू, धन्य येशू,
सर्व भयें वारावीं.
२ तुझी वाणी ऐकतांना
सुखें मागें चालतों.
लांडग्याला पाहतांना
तुझ्या आड लपतों.
प्रिय येशू, धन्य येशू,
तुजकडे पाहतों.
३ तर तुवां संभाळावें,
आम्ही दीन, दुबळे,

अपराध निवारावे
शुद्ध कर सगळें.
प्रिय येशू, धन्य येशू,
त्वां स्वदुःखें खंडिलें.

४ आह्मी तुझे, त्वां राखावें,
रानीं जेव्हां चरतों,
परतूनहि आणावें
जर आह्मी भकतों.
प्रिय येशू, धन्य येशू,
ऐक, आह्मी प्रार्थितों.

---

435. Early Piety.

"What bless'd examples do I find."

## ४३५. तरुणपणीं भक्ति.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ कित्येक गुणी मुलें, जाण,
शास्त्रांत वर्णिलीं,
देवाला देउनियां मान
तीं कृपा पावलीं.

२ आईनें बाल शमुवेल
देवाला अर्पिला,
तो आयुष्याची सर्व वेळ
देवासीं चालला.

३ तिमथ्याला शास्त्रज्ञान
मिळालें वेळेवार,
पुढें होउनी धैर्यदान
तो गाजवी उद्धार

४ येशू, जो राज्य करी वर,
तो होता तरणा,
नेहमी धरी जन्मवर
भक्तीची भावना.

५ बारा वर्षांचा असतां
तो गेला देवळीं,
शास्त्री आश्चर्य करितां
मिळाले जवळी.

६ आईने आज्ञा दिधली
तीं त्याने केला मान,
नम्रता किती धरिली
असुनी भगवान !

७ बाळांस हातीं धरुनी
तो प्रेम दावी फार,
मुलांनो, लागा चरणीं,
तो करितो उद्धार.

---

436. Harmony of Brethren.

"Blest are the sons of peace."

## ४३६. भावांची ऐक्यता.

स्तोत्र १३३.

S. M. ६, ८ अक्षरी.

१ भावांची ऐक्यता
सुंदर दिसती,
परस्परांस ममता
ते नित्य दाविती.

२ प्रेमाने मिळुनी
देवाला भजतात,
ते त्याची कृपा पावुनी
एकत्र हर्षतात.

३ राजाच्या मस्तकीं
जें ओतिलेलें तेल,
त्याच्या सुवासासारिखी
ही ऐक्यता व मेळ.

४ देवाचे पुत्र वर
अत्यंत ममताळ,
तेथें सत्प्रीति परस्पर
करिती सर्वकाळ.

---

437. Against Quarrelling.

## ४३७. मुलांनी भांडूनये.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ परस्परांसीं भांडणें
न शोभे लेंकरांस.

साजेल झुंज करणें
दुष्ट जनावरास.

२ देवानें मुलें लेंकरें
केलीं सुबुद्धिमान,
तीं भांडतां परस्परें
कुत्रींसीं होतीं, जाण.

३ मुलांनो, प्रीति बाळगा,
झटुनी व्हा सुशील,
जसा तो येशू मुलगा,
शांत सहनशील.

४ तो फार सौम्य ममताळ,
देवाचा कोंकरा,
तो वाढतांना सर्वकाळ
आवडे ईश्वरा.

५ आतां तो येशू वरुनी
आह्माला पाहतो,
गुणी मुलाला जाणुनी
तो प्रेम दावितो.

---

438. Obedience to Parents.

## ४३८. आईबापांस मानावें.

6, 4. ६, ४ अक्षरी.

१ मुलांनो, बोध, घ्या,
देवाला तुह्मी भ्या,
तो प्रभु थोर;
आईबापांचा मान
करा हो प्रेमवान,
न घडो अपमान,
तें पाप घोर.

२ आईचें मोठें प्रेम,
बापाचे सर्व श्रम
आठवा फार,
तुह्माला पाळितीं,
नित्य संभाळितीं,
दु:खें निवारितीं,
माना आभार.

३ जे कोणी द्वाड पोर
देतील त्रास घोर
आईबापांस,
ते क्लेश पावतील,
त्वरित मरतील,
गीध उपटतील
त्यांच्या डोळ्यांस.

४ आईबापांवरी
आणि देवावरी
जो करी प्रेम,
तो जगे फार वेळ,
देवाला आवडेल,
आकाशीं तो पावेल
अनंत क्षेम.

---

439. Charity to the Poor.

"Lord of life, all praise excelling."

## ४३९. गरिबांस देणें.

अनु. २४:१९.

8, 7s. ८, ७. अक्षरी.

१ देवा बापा ममताळू,
दाविसी दिनांला प्रेम,
दु:खितांसी कनवाळू,
तूं सर्वांस देसी क्षेम.
जसी तूं अनंत दया
गरिबांला दाविसी,
तसी करूणा कराया
तूं अह्माला सांगसी.

२ "तुह्मी शेत कापितांना
दाणे कांहीं पडल्यास
तेव्हां मागें फिरतांना
नका वेंचू उरल्यास.
विधवा अनाथ यांला
राहिलेलीं टिपूं द्या,
देव पुरवी तुह्माला,
तुह्मी ईश्वराला भ्या."

३ ही शास्त्राज्ञा पाहुनिया
आह्मी दया आठवूं,
गरिबांला देउनिया
प्रेम नित्य वाढवूं.
त्वां आह्माला, प्रिय बापा,
दिल्हें आहे भरपूर,
आह्मी दिनां दावूं कृपा,
त्यांचे हाल करूं दूर.

---

440. THE TEN COMMANDMENTS.

**४४०. दाहा आज्ञा.**

8, 7. ८, ७ अक्षरी.

१ ईश्वरानें आज्ञा दिल्ह्या,
त्या पवित्र न्यायवान,
त्या संपूर्ण मान्य केल्या
तरीं सर्वदां कल्याण.
२ अन्य देवा नको धरूं,
कां मी देव एकला;
मूर्त्ति कधीं नको करूं,
सदा भ्यावें मजला.
३ माझें नाम थोर जाण,
करूं नको व्यर्थोच्चार;
शाब्बाथ हा पवित्र मान.
करूं नको तैं संसार.
४ आईबापां मान द्यावा,
त्यांच्या आज्ञा नित्य पाळ;
खून कधीं न करावा;
व्यभिचारकर्म टाळ.
५ चोरी करूं नको कधीं;
खोटी साक्ष तूं धिक्कार;
लोभी होऊं नये बुद्धि;
प्रेमें चालवी संसार.
६ या आज्ञांचा सार प्रीति,
प्रीति कर सर्वकाळ,
ही उत्कृष्ट आहे नीति,
ही पाळाया तूं संभाळ.

---

441. THE TEN COMMANDMENTS.

**४४१. दाहा आज्ञा.**

8s. (Abhang.) अभंग.

१ ऐका सर्व खरे भक्त
दाहा आज्ञा ईश्वरोक्त.
२ देव नसो तुला दुजा,
नको करूं मूर्त्तिपूजा.
३ व्यर्थ घेऊं नको नाम.
विश्राम वारीं नसो काम.
४ मानी मायबापा लागीं.
नरहत्या सर्व त्यागी.
५ होऊं नको व्यभिचारी.
कधीं करूं नको चोरी.
६ देवूं नको खोटी साक्ष.
देवूं नको लोभ लक्ष.

---

442. THE LORD'S PRAYER.

**४४२. प्रभूची प्रार्थना.**

8, 7. ८, ७ अक्षरी.

१ हे आकाशी बापा प्रिय,
तुझें नाम गौरवी.
जगीं राज्य स्थापूनिया
तुझी इच्छा चालवी.
२ आज अन्न दे आह्माला,
अन्यायांची क्षमा कर,
तसी क्षमा करायाला
आह्मी झटूं जन्मवर.
३ परीक्षेंत नको नेऊं,
सर्व भयें चुकवी,
कधीं फसूं नको देऊं,
सैतानाला घालवी.
४ सर्व राज्य, तेज, शक्ति
तुझी आहे सर्वकाळ,
ऐक, बापा, ही विनंती,
तूं आह्माला नित्य पाळ.

---

443. THE LORD'S PRAYER.

## ४४३. प्रभूची प्रार्थना.

7s. ७ अक्षरी.

१ स्वर्गवासी राहुनी,
बापा होई गौरवी,
जगीं राज्य स्थापुनी
तुझी इच्छा चालवी.

२ अन्न आज दे आह्मां.
कर क्षमा पापांची.
दुसऱ्यांचीहि क्षमा
करायाला झटूंची.

३ नको मोहांत नेऊं,
सर्व दुःखें वारावीं,
नको फसुंची देऊं;
सैतानाला घालवी.

४ राज्य, शक्ति, महिमा
तुझा आहे सर्वकाळ.
ऐक बापा प्रार्थना,
तूं आह्माला सदा पाळ.

444. THE LORD'S PRAYER.

## ४४४. प्रभूची प्रार्थना.

L. M. ८ अक्षरी.

१ आकाशी बापा आमच्या
आपलें नाम गौरवी,
पृथ्वींत चालवी इच्छा
व तव सत्ता बसवी.

२ आह्मास अन्न आज दे,
आमची पापें क्षमा कर,
आह्मी वैऱ्यांस आनंदें
करावी क्षमा खरोखर.

३ मोहांत न नेई आह्मां,
व सर्व भयें वारी तीं;
कां राज्य, बळ, महिमा,
हीं तुझीं सदा असती.

445. THE LORD'S PRAYER.

## ४४५. प्रभूची प्रार्थना.

Hindu M. अभंग.

१ आमचिया बापा, तेजवासी, धन्य,
तुझें नाम मान्य होवो फार.

२ जसें तुझी इच्छा चाले आकाशांत,
तसें पृथिवींत सदा चालो.

३ आह्माला भाकर लागतसे रोज,
ती आह्माला आज पुरवावी.

४ आह्मी स्वऋण्यांस सोडितों जैसें,
आमचींहि तैसें ऋणें सोड.

५ नको जाऊं देऊं परिक्षीं भुलूनी,
वाईटापासूनी राख आह्मां.

६ कां कीं पराक्रम, महिमा व बळ
तुझीं सर्वकाळ, असें असो.

446. MARRIAGE HYMN.

"Come, thou condescending Jesus."

## ४४६. लग्नसंबंधी गीत.

8, 7. ८, ७ अक्षरी.

१ प्रभू ख्रिस्ता तूं कृपेनें
लग्ननेम लाविलास,
आतां येऊनी दयेनें
आशीर्वाद दे आह्मास.

२ नौरा नौरी या दोघांला
तुझी कृपा दाखवी,
क्षेम दे उभयतांला,
तें अखंड वाढवी.

३ तुझी कृपा पावतांना
हीं वंदोत तुझें नांव,
सुमार्गांत चालतांना
दाखवोत प्रेमभाव.

४ प्रिय प्रभू, तूं दयाळू,
कर त्यांची बेगमी,
दे आरोग्य, हे कृपाळू,
दुःखें वार नेहमीं.

५ रोज रोज त्यांच्या घरीं
भक्ति स्तुति होवो फार,
तुझी कृपा झाली तरी
हीं मानोत उपकार.

६ भवदु:ख लागतांना
कर त्यांचा तूं निभाव,
ते आधार मागतांना
वेगें होऊं दे बचाव.

७ अंतकाळीं बोलावुनी
त्यांचा करसी वियोग,
तेव्हां पुन्हा मिळवुनी
वर्तें दे सत्सुखभोग.

८ प्रिय प्रभू ममताळू,
दे भक्तीची भावना,
तुला स्तवूं, हे दयाळू,
गाऊं तुझी करुणा.

## IX. PUBLIC WORSHIP.

# ९. मंडळींतली भक्ति.

447. A SABBATH HYMN.
"This is the day the Lord hath made."

### ४४७. शाब्बाथ दिवसाचें गीत.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ प्रभूचा हा पवित्र वार,
देवभक्तीचें दिन,
ख्रीस्ताची स्तुति करा फार,
भजनीं व्हा तल्लीन.

२ तो आज पुन्हा उठुनी
निघाला जयवान,
भक्तांनो, कृपा गाउनी
सांगा सुवर्त्तमान.

३ तो दावीदाचा पुत्र थोर,
तारक एकला,
सर्वांनो, भजा त्यासमोर,
तो राजा नेमला.

४ प्रभू ख्रीस्ताला जयजय!
तो सत्ता करितो,
पापी जनांचा तो आश्रय,
प्रेमानें तारितो.

५ मोठ्यानें जयजयकार
करा दिगंतरीं,
आकाशीं त्याला आहे फार
सन्मान ईश्वरी.

448. THE SABBATH.
"Another six days' work is done."

### ४४८. शाब्बाथ दिवसाचें गीत.

L. M. ८ अक्षरी.

१ आठवड्याचें झालें काम,
फिरुनी आला हा विश्राम,
हे जिवा, चिंता टाकुनी
प्रेमानें लाग भजनीं.

२ देवाचा मान उपकार,
विसावा देतो वारंवार,
शांतीचा घेतां अनुभव
कष्टग्रांला होतो महोत्सव.

३ भक्तांनो, ईश्वरासमोर
वर्णाहो त्याचीं कृत्यें थोर,
पावुनी कृपा वरुनी
घ्या शांति अंत:करणीं.

४ पवित्र कर्मं करितां
पवित्र सुखें भोगितां
घालवा हा पवित्र काळ,
आकाशीं वेगें पोहंचाल.

५ जी शांति आज अंतरीं
ती दावी प्रेम ईश्वरी,
भक्तांला सुख मिळणार
तयाचा आतां हा विसार.

449. Sabbath Hymn.
"Welcome sweet day of rest."

### ४४९. शाब्बाथ दिवसाचें गीत.

S. M. ६, ८ अक्षरी.

१ प्रभूचा आला वार,
तो आज उठला,
याचा विसांवा गोड फार
जिवाला लागला.

२ या रोजीं भगवान
भक्तांला भेटतो,
तो प्रार्थनांला देतो कान,
स्तुतिहि ऐकतो.

३ या जगीं जन्मवर
विलास भोगणें,
यापेक्षां गोड दिनभर
प्रभूसीं राहणें.

४ असाच अनुभव
जिवाला होवो फार,
वर्ते करूनी महोत्सव
गाईन हा उद्धार.

५ सर्वांनो, काढा स्वर.
ख्रीस्ताला माना थोर,
वाखाणा कृपा खालीं वर,
नमाहो त्यासमोर.

---

450. Keeping the Sabbath Holy.

### ४५०. शाब्बाथ पवित्र पाळणें.

6, 4. ६,४ अक्षरी.

१ आज प्रभूचा वार,
माना हो उपकार,
वंदा देवास;
मिळुनी देवळीं
ईश्वराजवळी
गा कृत्यें सगळीं,
स्तवा ख्रीस्तास.

२ तो खांबीं मारिला,
आज तो उठला,
वाखाणा नांव;
तो जग तारितो,
दिनां उद्धारितो,
पाप संहारितो,
ठेवा हो भाव.

३ त्या प्रभूकारितां
शाब्बाथ पाळितां
गा त्याचें प्रेम;
पाप्यांचा तो आश्रय,
करा हो जयजय,
वाखाणा अतिशय
अनंत क्षेम.

---

451. Sabbath Morning Hymn.
"Early, my God, without delay."

### ४५१. शाब्बाथ सकाळचें गीत.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ हे देवा, आज धावुनी
मी कृपा मागतों.
तुला भेटाया पाहुनी
जीव लुलपतो.

२ जसे रानांत यात्रेकर
मध्यान्हीं धोपतात,
व पाणी न मिळालें तर
ते प्राण सोडितात.

३ तुझा प्रताप पाहिला
तुझ्याच मंदिरीं,
पुन्हा दाखीव मजला
तें तेज ईश्वरी.

४ मिष्टान्न ठेविलें समोर
व अवघे विषय,
त्यापेक्षां तुझा प्रेमा थोर
हा गोड अतिशय.

५ जिवासंबंधी उपकार
 मी प्रिय मानितों,
परी त्वां केला जो उद्धार
 तो अति वंदितों.
६ तसें मी जगें तोंवरी
 स्तवीन तुझें नांव,
गाईन कृपा ईश्वरी,
 प्रभूचा प्रेमभाव.

---

452. SABBATH MORNING HYMN.

"Safely through another week."

**४५२. शाब्बाथ सकाळचें गीत.**

7s, 6 lines. ७ अक्षरी, ६ चरणी.

१ आठवडा लोटुनी
 आला हा पवित्र वार,
आज ख्रीस्ता स्तवुनी
 मानूं त्याचे उपकार.
हें उत्कृष्ट आहे दिन,
अंत्य विसांव्याचें चिन्ह.
२ देवा, आह्मी लवुनी
 ख्रीस्तनामें भजतां,
पापें क्षमा करुनी
 दाखवी प्रसन्नता.
आज सुटो चिंताभार,
तूं शांतीचा हो आधार.
३ तुझें नाम गौरवी
 जेव्हां आह्मी स्तवितों,
तूं स्वतेज दाखवी,
 तुझी कृपा मागतों.
आकाशांत जो उत्सव
त्याचा दे पूर्वानुभव.
४ शास्त्रबोध ठसवून
 तूं पाप्यांला वश कर,
भक्तां भाका सुचवून
 त्यांच्या मनीं हर्ष भर.
 पुढें तुझी कृपा थोर
 वर्तें गाऊं तुजसमोर.

---

453. THE LORD IS RISEN.

"How calm and beautiful the morn."

**४५३. प्रभु उठला आहे.**

7s, 6 lines. ७ अक्षरी, ६ चरणी.

१ आला हा पवित्र वार,
 ख्रीस्त ठरे तारणार,
 जेव्हां त्याला पुरिलें
 तेव्हां भक्त रडले;
 आज हर्ष भरला,
 प्रभु पुन्हा उठला.
२ ख्रीस्त राजा आहे थोर,
 कोण टिके त्यासमोर?
 मृत्युबळ मोडिलें,
 थडग्याला फोडिलें,
 शत्रुगण हटला,
 प्रभु पुन्हा उठला.
३ आज जाऊं देवळीं,
 मिळूं ख्रीस्ताजवळी,
 तो आह्मास भेटतां
 दाखवील ममता.
 सोडूं खेद सगळा,
 प्रभू पुन्हा उठला.
४ पुढें मरणाची वेळ
 जों आह्माला पोहंचेल,
 तों येशूचें तेज थोर
 पाहतां न वाटे घोर;
 प्रभु पुन्हा उठला,
 दीननाथ ठरला.

---

454. SABBATH HYMN.

"Lord of the worlds above."

**४५४. शाब्बाथ दिवसाचें गीत.**

H. M. ६, ६, ८ अक्षरी.

१ हे थोर भगवान,
 तुझें पवित्र घर,

तुझ्या भक्तांचें स्थान,
हें किती मनोहर!
हे देवा, तुझ्या मंदिरीं
दे मला भेट सत्वरी.

२ पावावा जन्मवर
विषयसुखभोग,
यापेक्षां दिनभर
तुझ्या भेटीचा योग.
ईश्वर भेटे सर्वकाळ
तेथें म्या व्हावें द्वारपाळ.

३ जे नित्य देवळीं
भजन करितात,
ते तुझ्या जवळीं
अति उल्हासतात.
राहुनी तुझ्या मंदिरीं
स्तविती कृपा ईश्वरी.

४ ते धीर धरितां
कंठिती भवरान
आनंद करितां
पावती सुखस्थान.
तुझ्या घरांत वैभवीं
हे देवा, मला पोंचवीं.

---

455. Sabbath Morning.

"Welcome, delightful morn."

### ४५५. शाब्बाथ सकाळचें गीत.

H. M. ६, ६, ८ अक्षरी.

१ भला पवित्र वार!
याची विश्रांति गोड;
हे देवा, हो आभार,
मनाला वर्ते ओढ.
विषय आतां टाकितों,
अक्षय सुख मागतों.

२ हे प्रभू, उतरून
दाखीव करुणा,
भक्तांला स्वीकारून
तूं ऐक प्रार्थना.
पाप्यांला होवो शास्त्रज्ञान,
देवाला त्यांनी द्यावा मान.

३ सदात्म्या, तूं उदार,
आह्मांला जिववी,
येशूची कृपा फार
ती आतां कळवी.
जिवाला देतां प्रेरणा
वाढीव भक्तिभावना.

---

456. Call to Worship.

### ४५६. भजनस्थळीं जाणें.

8, 7. ८, ७ अक्षरी.

१ ऐका शाब्बाथाची घांटी
झणझण वाजती,
प्रार्थना करायासाठीं
भक्त आतां मिळती.

२ करितांना देवस्तुति
ते संतोष पावतील,
शास्त्रांतुनी ख्रीस्तप्रीति
मोठ्या प्रेमें ऐकतील.

३ आह्मीहि त्वरेनें जाऊं,
करूं नये हो उशीर,
भक्तासंगें गितें गाऊं,
बोधा लावूं चित्त स्थिर.

४ लेंकरानो, घाई करा,
घांटी आतां वाजली,
देवळांत वेगें भरा,
भक्ति चालूं लागली.

---

457. Sabbath Hymn.

"Sweet is the work, my God, my King."

### ४५७. शाब्बाथ दिवसाचें गीत.

स्तोत्र ९२.

L. M. ८ अक्षरी.

१ हे देवा, तुझे उपकार
वर्णाया गोड वाटे फार,

सकाळीं गाई ममता,
सांजे वर्णीन सत्यता.

२ विसावा आज आहे गोड,
मनाची वर्ते लागो ओढ,
जगाची जावो वासना,
दे मला भक्तिभावना.

३ स्मरूनी तुझीं कृत्यें थोर
उल्हासतों तुझ्यासमोर,
हे देवा, तूं सामर्थ्यवान,
तूंच अनंत बुद्धिमान.

४ मनुष्य पशूंसारिखे,
ते तुझीं सर्व कौतुकें
न पाहतांना चालती,
ते पशूंवाणी मरती.

५ परी मी आहें भाग्यवान,
तूं माझा बाप दयावान,
कृपा कराया तूं उदार,
मला आनंद देसी फार.

६ पुढें टाळूनी पाप घोर
आकाशीं देसीं सुख थोर,
जिंकुनी शत्रु विकराळ
होईन जयवान् तेजाळ.

---

458. God and His Church.
"Great God, attend while Zion sings."

### ४५८. देव आणि त्याचे भक्त.
स्तोत्र ८४.

L. M. ८ अक्षरी.

१ हे देवा, आम्हा भेटुनी
दे हर्ष अंतःकरणीं.
न मागतों विषयसुख,
आम्हाला दाव तुझें सुख.

२ दे तुझ्या घरीं नीच स्थान,
तेथें मिळेल तुझें ज्ञान,
तें आम्ही मानूं गोड फार,
जगाचा करितों धिक्कार.

३ ईश्वर सूर्यासारिखा,
उजेड देतो सेवकां,
तोच भक्तांची आहे ढाल,
आश्रय आहे सर्वकाळ.

४ तो प्रेमें करितां कल्याण
क्षेमाची कसी होई वाण?
तो नित्य कृपा पुरवील,
आकाशीं पुढें गौरवील.

५ हे सार्वभौम राजा थोर,
टिकेल कोण तुजसमोर?
जो ठेवी भाव तुजवर
तो धन्य आहे खरोखर.

---

459. The Eternal Sabbath.
"Thine earthly Sabbaths, Lord, we love."

### ४५९. सर्वकाळचा शाब्बाथ.
L. M. ८ अक्षरी.

१ प्रभूच्या दिवसीं आम्हास
होतोच नेहमीं उल्हास,
वर्ते विश्रांति मिळणार,
ती पावायाची इच्छा फार.

२ तेथें नाहींत कष्ट, हाल,
मरण, पाप, मोहजाळ.
कधीं न होई कण्हणें,
परी मधुर गायनें.

३ तेथें न चाले शत्रुबळ,
कधीं न लागे हळहळ,
न पडे तेथें अंधकार,
देव प्रकाश पाडी फार.

४ त्वरित येवो तें सुदिन,
नाहींसें होवो जग हीन,
हे देवा, आम्हा पोंचवी,
दे तो विसावा गौरवी.

---

460. THE PRESENCE OF CHRIST.

"Jesus, where'er Thy people meet."

**४६०. ख्रीस्ताची भेट होणें.**

L. M. ८ अक्षरी.

१ हे प्रभू, भक्त मिळतां
तूं दावितोस ममता,
सर्वत्र तूं अढळसी,
सर्वत्र आज्ञा पाळसी.

२ तूं आतां ऐक प्रार्थना,
निवार सर्व चिंतना,
विश्वास फार वाढवीं,
आकाशीं चित्त ठरवीं.

३ हे प्रभू, आह्मी थोडके,
जगांत फार हलके,
तूं तरी अति शक्तिमान,
जनांला लागो शास्त्रबाण.

---

461. INVOCATION.

"In Thy great name, O Lord, we come."

**४६१. भक्तीच्या प्रारंभीं प्रार्थना.**

C. M. ८, ६ अक्षरी.

१ देवाच्या भक्तीकरितां
आलों या मंदिरीं,
सदात्मा हा उतरतां
येवो आह्मावरी.

२ आलों ऐकाया देवज्ञान,
येशूची वाणी गोड,
हे देवा, कर समाधान,
मनाला वर्ते ओढ.

३ कृपा मागाया शिकवीं,
प्रगट हो आह्मास,
शास्त्र मनांत ठसवीं,
तूं वाढवीं विश्वास.

४ पाप्याला सुमार्गांत लाव,
दाखीव तुझें प्रेम,
भक्तांचा वाढो प्रीतिभाव,
दे त्यांस मोठें क्षेम.

---

462. INVOCATION.

"In Thy presence we appear."

**४६२. भक्तीच्या प्रारंभीं प्रार्थना.**

7s. ७ अक्षरी.

१ ईश्वरा तुझ्यासमोर
याया हर्ष वाटे थोर,
तूं आह्मासीं मिळतां
दाव तुझी ममता.

२ जेव्हां तुला स्तवितों
आणि कृपा वर्णितों,
तेव्हां दे सत्प्रेरणा,
दे भक्तीची भावना.

३ आह्मी मागतांना क्षेम,
तूं ऐकुनी दाव प्रेम,
तुझ्या भाका आठवीं,
तुझा आत्मा पाठवीं.

४ आह्मी शास्त्र ऐकतां
आणि अर्थ शोधितां
कळवि शास्त्राचा सार.
प्रिय प्रभू, दे उद्धार.

---

463. A BLESSING REQUESTED.

"Lord, we come before Thee now."

**४६३. आशीर्वाद मागणें.**

7s. ७ अक्षरी.

१ प्रभू, दया मागतों,
आह्मी पायां पडतों,
दूर नको घालवूं.
रितें नको पाठवूं.

२ सर्व आशा तुजवर,
तूं दयाळू कृपा कर,
मागतों आत्म्याचें दान,
हृदयाचें समाधान.

३ ऐक आतां प्रार्थना.
कर मोठी करूणा,
ही मिळाली याशिवाय
आह्मी आतां जाऊं काय?

४ तुझें शास्त्र ठसुनी
राहो अंत:करणीं,
प्रत्येकाला दे उद्धार,
हाच श्रेष्ठ उपकार.

---

464. Praise to the Trinity.

## ४६४. त्र्येक देवाची स्तुति.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ देव बापाला गौरवा,
सर्वांनो, करा मान,
सत्कृपा त्याची गाजवा,
तो वंद्य भगवान.

२ पुत्राला भजायाला या,
तो करितो कल्याण,
उद्धार त्याच्या हातें घ्या,
तो वंद्य भगवान.

३ आत्म्याची करा आठवण,
तो देतो कृपादान,
पूर्ण पवित्र करी मन,
तो वंद्य भगवान.

४ सर्वांनो, या त्र्येकासमोर
नमुनी करा मान,
वाखाणा त्याची कृपा थोर,
तो वंद्य भगवान.

---

465. Invocation of the Trinity.

## ४६५. त्र्येक देवाची स्तुति.

L. M. ८ अक्षरी.

१ हे बापा, तुझी कृपा फार,
त्वां प्रेमें योजिला उद्धार,
तुझ्या समोर नमतों,
पापाची क्षमा मागतों.

२ हे पुत्रा, राजा शक्तिमान,
उपाध्या गुरू दयावान,
तुझ्यासमोर नमतों,
उद्धार कृपा मागतों.

३ सदात्म्या, जगज्जीवना,
आह्माला दे सत्प्रेरणा,
तुझ्यासमोर नमतों,
जीवनी पाणी मागतों.

४ अतर्क्य त्र्येक भगवान,
जो बाप पुत्र आत्मा, जाण,
तयाला आह्मी नमतों,
आश्रय त्याचा करितों.

---

466. Worship of the Trinity.
"O come, let us sing."

## ४६६. त्र्येक देवाची भक्ति.

Peculiar. तऱ्हेवाईक.

१ अहो स्तुति गा,
देवाची दया वर्णा,
आह्माला तो संभाळितो,
अहो स्तुति गा;
पुत्राला नाहीं राखिलें,
आह्मा ताराया धाडिलें,
सत्प्रेम दाविलें,
अहो स्तुति गा.

२ अहो वंदा नाम,
ख्रीस्ताची प्रीति स्तवा,
पाप्याला तो उद्धारितो,
अहो वंदा नाम;
तो वधस्तंभीं मारिला,
पाप्यांचा दंड भरिला,
उद्धार साधिला,
अहो वंदा नाम.

३ अहो पापी या,
पवित्र आत्मा मागा,

मनाला तो सुधारितो,
अहो पापी, या;
ईश्वर कृपा दाखवी,
येशू प्रेमानें बोलावी,
सदात्मा सुचवी,
अहो पापी, या.

---

467. DIVINE WORSHIP.

## ४६७. देवाची भक्ति.

Peculiar. तऱ्हेवाईक.

१ अहो भक्त, या,
देवाला आतां भजा,
कां भगवान् सत्कृपावान्,
अहो भक्त या;
बापाची करा प्रार्थना,
प्रभूची वर्णा करुणा,
मागा सत्प्रेरणा,
अहो भक्त, या.

२ अहो पापी, या;
देवाला आतां नमा,
कां भगवान् सामर्थ्यवान्,
अहो पापी, या;
तो आज कृपा दावितो,
प्रभुहि आतां पावितो,
प्रेमें बोलावितो,
अहो पापी या.

३ अहो सर्व, या,
देवाची भक्ति करा,
तो सत्ववान् व नीतिमान्,
अहो सर्व, या;
आयुष्य वेगें गुजरेल,
न्यायाचा काळ पोहंचेल,
तो दुष्ट घाबरेल,
अहो सर्व, या.

---

468. PRESENCE OF CHRIST.
"Come dearest Lord, descend and dwell."

## ४६८. ख्रीस्ताचा आशीर्वाद मागणें.

L. M. ८ अक्षरी.

१ हे प्रभू, आतां उतरून
राहा भक्तांच्या अंतरीं,
तेणें आनंद वाढवून
पावीव सुख ईश्वरी.

२ मनांतुनी घालीव घोर,
सामर्थ्य धैर्य वाढवी,
कृपेची लांबी रुंदी थोर
आह्मा सर्वांला दाखवीं.

३ जो कल्पनेपलिकडे
क्षेम कराया शक्तिमान,
त्या वंद्य ईश्वराकडे
पाहुनी देऊं त्याला मान.

---

469. BAPTISM BY THE SPIRIT.
"Come, Holy Spirit, from on high."

## ४६९. पवित्र आत्म्यानें बाप्तिस्मा.

L. M. ८ अक्षरी.

१ ये, दिव्य आत्म्या, वरुनी,
तूंच पवित्र करणार,
ये याच्या अंत:करणीं,
यावरी तुझा शिक्का मार.

२ हे देवा, कृपा दाखवी,
ख्रीस्ताचें रक्त याला लाव,
लेंकरूं तुझें ठरवी,
आकाशीं लिही याचें नांव.

---

470. CLOSE OF WORSHIP.
"Come, Christian brethren, ere we part."

## ४७०. भक्तीचें शेवटलें गीत.

L. M. ८ अक्षरी.

१ भक्तानो, पुन्हा पाहा वर,
स्तुति कराया काढा स्वर,

एथुनी जावयाचें दूर,
त्यापूर्वी गाणें गा मधुर.
२ जरी न भेटूं फिरुनी,
आकाशीं जाऊं मिळूनी
तेथें न होतां कष्ट हाल
संगेंच राहूं सर्वकाळ.

---

471. Consecration of Children.
"See Israel's gentle Shepherd stand."

**४७१. लेंकरास प्रभूजवळ अर्पणें.**

C. M. ८, ६ अक्षरी.

१ पाहा, तो प्रिय मेंढपाळ
उभाच राहतो,
हातांत घेउनिया बाळ
प्रेमानें बोलतो.
२ ह्मणे, "बाळांस येऊं द्या,
कां करितां धिक्कार?
अशाच बाळांसारिख्यां
मी देतों पूर्णोद्धार."
३ हे प्रभू, आह्मी लेंकरें
प्रेमानें अर्पितों,
हीं मोज तुझीं कोंकरें,
हें मात्र मागतों.
४ हीं जर पोरकीं होतील
हो त्यांचा नाथ थोर,
थोड्यांत जर मरतील
नमूं तुझ्यासमोर.

---

472. Believers' Children.
"How large the promise, how divine."

**४७२. भक्तांचीं लेंकरें.**

उत्प. १७:१७.

C. M. ८,६ अक्षरी.

१ भक्ताला ह्मणे भगवान,
" दावीन तुला प्रेम,
तुझें स्वीकारुनी संतान
करीन त्याचें क्षेम."
२ ही किती कृपा दाविली,
अनंत करुणा,
आह्मीहि अनुभाविली.
वचन फिरेना.
३ येशू भरोंसा वाढवी,
घेउनी लेंकरें
तीं फार प्रिय ठरवी,
आपलीं कोंकरें.
४ ईश्वर किती ममताळ!
त्यावरी ठेवूं भाव,
तो सत्य राहे सर्वकाळ,
सुवंद्य त्याचें नांव.

---

473. Baptism.
"Jesus, we lift our souls to Thee."

**४७३. बाप्तिस्मा.**

C. M. ८, ६ अक्षरी.

१ हे प्रभू, ऐक प्रार्थना,
सदात्मा धाडुनी
दे याच्या अंतःकरणा
बाप्तिस्मा जीवनी.
२ याच्या आत्म्याला नवें कर,
दे शुद्ध भक्तिभाव,
सद्गुण हृदयांत भर,
कपाळीं लिही नांव.
३ कृपेनें याला वागवून
नित्य संभाळ कर,
जगीक पाश चुकवून
आकाशीं द्यावें वर.

---

474. Consecration of Children.

**४७४. लेंकरांस अर्पणें.**

Hindu M. अभंग.

१ पाहा प्रिय मेंढपाळ
हातांवर घेतो बाळ.

२ ह्मणे, "येऊं द्या बाळकां,
त्यांला मना करूं नका.
३ बाळावाणी व्हावें साचें,
देव राज्य असल्याचें."
४ प्रिय प्रभू, दयाकारा,
प्रेमें अर्पितों लेंकरां.
५ यांला प्रेमें अंगिकार,
सर्वदा संभाळ कर.
६ जरी झालीं हीं अनाथ,
तरी हो बा यांचा नाथ.
७ इहलोकीं संभाळावें,
सौख्य लोकीं गौरवावें.

---

475. Baptism.

### ४७५. बाप्तिस्मा.

Hindu M. अभंग.

१ प्रार्थना आमुची ऐक दयावंता,
प्रसन्नहि आतां हो आह्माला.
२ कृपा पूर्ण कर, धाडूनी सदात्मा,
जीवनी बाप्तिस्मा यांस द्यावा.
३ हृदयांत भर गुण, भक्तिभाव,
कपाळींहि नांव लिहीं, देवा.
४ नेहमी संभाळ; सदा वागवूनी,
पाश चुकवूनी, राख देवा.
५ रोग संकटांत धरूनी उरासीं,
शेवटीं आकाशीं घ्यावें वर.

---

476. The Saviour's Feast.

"How sweet and awful is the place."

### ४७६. प्रभूची मेजवानी.

लू. १५:१६–२४.

C. M. ८, ६. अक्षरी.

१ एथें बसाया हर्ष फार
येशूच्या संगतीं,
कृपेचे श्रेष्ठ उपकार
एथेंच मिळती.
२ हे प्रभू, त्वां करूनी प्रेम
हें मज मांडिलें,
आह्मा पाप्यांला द्याया क्षेम
एथें बोलाविलें.
३ हजारों तुच्छ करिती,
पावती मोठे हाल,
अत्यंत क्लेश भोगिती
अभाग्य सर्वकाळ.
४ आह्मींहि दुष्ट असतां
त्वां प्रीति दाविली,
सत्प्रेरणेने ओढितां
आणिलें जवळी.
५ हे ईश्वरा, राष्ट्रांकडे
तूं कृपादृष्टि कर,
तीं ओढ आपल्याकडे,
सर्वत्र सत्ता धर.
६ वाड्यांत तुझ्या मंडळ्या,
गावांत तुझें नांव,
वर्णोत प्रजा सगळ्या
प्रभूचा प्रेमभाव.

---

477. Christ the Bread of Life.

"Let us adore the Eternal Word."

### ४७७. ख्रीस्त हा जीवनाची भाकर.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ ख्रीस्त पाप्यांचा तारणार,
भाकर जीवनी,
जनांचा योजुनी उद्धार,
तो आला वरूनी.
२ खायाला दिल्हें स्वशरीर,
भक्तानो, प्रेमें घ्या,
प्यायाला ओतिलें रुधिर,
अहो तान्हेले, प्या.
३ हें खाणें फार रुचिकर
भक्तांला लागतें,

हें रक्त भावें प्यालों तर
दु:खें निवारिलें.

४ तीं खाया प्याया मिळती,
हीं ख्रीस्तकृपा थोर,
तहान भूक सरती,
टळतो दंड घोर.

५ आह्मी टाकावें सर्व भय,
पुरेल हा आहार,
कां येशू राहतो अक्षय,
तो करितो उद्धार.

६ जेव्हां आयुष्य गुजरेल,
तेव्हां तो शांतवील,
पुढें वरूनी उतरेल
तों पुन्हा उठवील.

---

478. THE LORD'S SUPPER.

"Jesus is gone above the skies."

## ४७८. प्रभूचें भोजन.

लूका २२:१९.

L. M. ८ अक्षरी.

१ येशू हा वर्ते गेला पार,
आतां आह्माला दिसेना,
मनांत भरतां संसार
येशूची प्रीति सुचेना.

२ तो जाणे आमचें जड मन,
ह्मणून त्याचा उपकार
याची व्हायाला आठवण
नेमुनी दिल्हा हा संस्कार.

३ हें मेज स्वतां मांडुनी
भक्तांला तो बोलावितो,
शरीर रक्त दावुनी,
ह्या खुणा घ्याया सांगतो.

४ हें जग आतां नलगे,
प्रभूचें आठवूं सत्प्रेम,
तुच्छ विषय अवघे,
येशूनें दिल्हें मोठें क्षेम.

५ या जेवणाची आठवण
आह्माला होवो सर्वकाळ,
प्रभूसीं फार जडो मन,
तो प्रिय भाऊ ममताळ.

६ तो जागा सिद्ध करण्यास
पुढेंच गेला वैभवीं.
तेथें आह्माला न्यावयास
स्वतां येईल गौरवी.

---

479. THE FEAST OF LOVE.

## ४७९. प्रीतीचें भोजन.

१ कर. १०:१६.

L. M. ८ अक्षरी,

१ भावानो, एथें जेवितां
प्रभूचें प्रेम पाहिलें,
आह्मा बिचाऱ्यांकरितां
प्रभूचें रक्त वाहिलें.

२ भक्तांच्या अंत:करणीं
नित्य राहावें तसें प्रेम,
प्रभूला अनुसरूनी
परस्परें करावें क्षेम.

3 भाकर एक खाउनी
संगतीं हर्ष पावलों,
एकच प्याला पिउनी
धर्माचे भाऊ ठरलों.

४ येशू हा मंडळीचा धव,
मस्तक तिचा तेजवान,
आह्मी तयाचे अवयव
परस्परें संयुक्त, जाण.

५ भावनो, आह्मी ममता
करूं एकमेकावरी,
प्रभूचा कित्ता पाहतां
प्रीतिच खरूं ईश्वरी.

६ पुढें तो खालीं उतरून
लग्नकार्याला बोलावील,

तेव्हां आह्माला मिळवून
अत्यंत सुख वाटवील.

---

480. The Saviour's Feast.

### ४८०. प्रभूचें भोजन.

Hindu M. अभंग.

१ एथें हर्ष वाटे फार,
प्रभु करी उपकार.
२ प्रेमें आह्मां बोलाविलें,
प्रेमें मेज मांडियेलें.
३ खाया देतो स्वशरीर;
पाप्या ओंतितो रुधिर.
४ भरपूर हा आहार,
पूर्ण करितो उद्धार.
५ ख्रीस्तकृपा किती थोर
निवारितो दंड घोर.
६ एथें पूर्ण करी काम;
वरती देई विश्राम.

---

481. The Gospel Feast.

### ४८१. प्रभूचें भोजन.

Hindu M. अभंग.

१ एथें बसायाला गोड वाटे फार,
श्रेष्ठ उपकार मिळतात.
२ प्रेमें खाउनिया येशूच्या संगतीं,
भावांच्या पंगतीं, गोड वाटे.
३ आह्मां पापीयांस प्रभू देतो क्षेम,
फार त्यानें प्रेम एथें दिसे.
४ प्रभू, त्वां आह्मांला आणिलें जवळी,
प्रीतिच दाविली आह्मां दुष्टां.
५ सर्वांस आणावें, सर्व सत्ता धर,
कृपादृष्टी कर लोकांकडे.
६ मंडळ्या वाढोत, प्रजाचि मिळोत,
सकल वंदोत प्रेमभाव.

---

482. The old, old Story.

### ४८२. येशूची प्रीति.

7. 6, ७, ६ अक्षरी.

१ सांगा ती वार्ता मला
कीं येशू कृपावान
या जगीं नीच झाला
सोडूनी सुखस्थान.
सांगा ती असी साधी
कीं बाळा समजेल;
मी कष्टी अपराधी,
ती मला आवडेल.
ध्रु० येशूची प्रीति सांगा,
ती मला आवडेल.

२ पाप्यांस खंडुनिया
साधिला जो उद्धार,
विस्तार करुनिया
सांगा तो चमत्कार.
चंचल मी, ती मला
नाहीं आठवणार,
मनांत ठसायाला
ती सांगा वारंवार. ध्रु०

३ पापिष्ट मी, आशाला
हा येशू तारितो,
हें प्रेमें सांगा मला,
मी लक्ष लावीतों.
दुःखित असतांना
निराश होतों मी,
आधार द्याया मना
ती सांगा नेहमी. ध्रु०

४ कधीं जगाची कीर्ति
ही इष्ट दिसती,
तों सांगा त्याची प्रीति
ती तृप्त करिती.
पुढें आकाशीं जाया
हें स्थळ सोडणार,

ती सांगा धीर याचा
तेणें मी तरणार. ध्रु०

---

## X. SPREAD OF THE GOSPEL.

## १०. शुभवर्त्तमान सर्वत्र कळविणें.

483. Wants of the Heathen.

"From Greenland's icy mountains."

### ४८३. मूर्त्तिपूजकांची दुर्दशा.

7, 6. ७, ६ अक्षरी.

१ जगाची कसी दशा !
अज्ञान केवढें !
अधर्मी रीति कशा
चालू चहुंकडे !
पृथ्वीच्या सर्व अंगीं
कुमार्गी चालती,
सर्वत्र धर्मभंगी,
ते ज्ञान मागती.

२ पाहा, देवानें केले
अनंत उपकार,
सर्वत्र पुरविलें
जगिं सुख फार.
सर्वांची इच्छातृप्ति,
ती व्यर्थ जाई, जाण,
जनांला वेडप्राप्ति,
मूर्त्तिला देती मान.

3 आझाला शास्त्रदिवा
ख्रीस्तानें दिधला.
दिगंतरीं तो न्यावा.
सर्वांला योजिला.
सर्वत्र गाजवूनी
वर्णा उद्धारक्षेम,
राष्ट्रांला कळवुनी
वाखाणा ख्रीस्तप्रेम.

४ जाहो, सुवार्त्तिकानो,
उद्धार कळवा,
समुद्र वाऱ्यानो,
वेगानें चालवा
जगाचा येशू राजा
हा करो अधिकार,
पृथ्वीच्या सर्व प्रजा
पावोत पूर्णोद्धार.

---

484. Spread of the Gospel.

"Now be the Gospel banner."

### ४८४. शुभवर्त्तमानाची प्रसिद्धि.

7, 6. ७, ६ अक्षरी.

१ येशूला वंदितांना
उभारा हो निशाण,
मोठ्यानें गा होसान्ना,
सांगा सुवर्त्तमान.
प्रत्येक राष्ट्र येवो,
प्रत्येक पापी जन,
उद्धार आतां घेवो,
पावो अक्षय धन.

२ हे प्रभू तारणाऱ्या.
तूं राज्य चालवीं,
अंधारीं बसणाऱ्या
वेगें प्रकाशवीं;
सर्वत्र सुज्ञानाची
प्रतीक्षा करिती,
सर्वत्र तारकाची
सत्कृपा वर्णिती.

---

485. Conversion of the Jews.

"O that the Lord's salvation."

### ४८५. इस्राएल लोकांचें परतणें.

7, 6. ७, ६ अक्षरी.

१ इस्राएलाची मुक्ति
हे देवा, आतां कर,

दाखीव मोठी शक्ति,
तुझ्यांस तूं उद्धर.
यरुशलेम पुन्हां
पवित्र होवो स्थान
करूनी क्षमा गुन्हा
स्वलोक प्रिय मान.

२ तूं क्रोध नको दावूं,
दाखीव कृपा थोर,
अंधारीं नको लावूं,
घालीव भ्रांति घोर.
येशूला पत्करूनी
मानोत अधिकार,
सुमार्गीं परतुनी
पावोत पूर्णोद्धार.

---

486. LIGHT OF THE GENTILES.

"O'er the realms of pagan darkness."

## ४८६. ख्रीस्त राष्ट्रांचा उजेड.

8, 7, 4. ८, ७, ४ अक्षरी.

१ पाहा, मूर्त्तिपूजकाला
भ्रम झाला अनिवार,
देवज्ञान नाहीं त्याला,
कळवळा यावा फार.
सर्व जगीं
व्याप्त झाला अंधकार.

२ हे प्रकाश करणाऱ्या,
आतां तूं उदय पाव,
प्रभु येशू तारणाऱ्या,
जगीं कळो तुझें नांव.
तूं उजेड
सर्व अधर्मीला दाव.

३ दगडी मूर्तींच्या पाया
जे हजारों पडती,
त्यानी ईश्वरा भजाया
यावें भक्तासंगती.
सुज्ञानाची
जगीं होवो भरती.

४ प्रभू, भक्तां आज्ञा द्यावी
जावया दिगंतरीं,
यानी हर्षें गाजवावी
मोठी कृपा ईश्वरी.
हो त्यासंगें
जग जाई तोंवरी.

---

487. HINDU CHILDREN.

"Far out upon the prairie."

## ४८७. हिंदूचीं मुलें.

7, 6. ७, ६ अक्षरी.

१ आहा! हिंदूचीं मुलें
अज्ञानी राहती,
सुमार्ग त्यां न कळे,
ते ख्रीस्त नेणती.
प्रभूचा वार नाहीं,
भक्तांसीं मिळाया,
न कळे सत्यताहि,
सच्छास्त्र नाहीं त्यां.

ध्रु० आहा! हिंदूचीं मुलें
अज्ञानी राहती,
सुमार्ग त्यां न कळे,
ते ख्रीस्त नेणती.

२ त्यांपासीं नाहीं कोणी
प्रीतीने सांगाया
आणाया भक्तिस्थानीं
सुवार्त्ता ऐकाया.
शाब्बाथ शाळा त्यानी
कधीं न पाहिली,
कीं शिक्षकाची वाणी
कानीं न ऐकिली, ध्रु०

३ कितीदां मला वाटे
सांगावें त्वरें त्यां,

कीं चला ख्रीस्त वाटे
जीवन पावाया.
कीं ख्रीस्तें मुलांसाठीं
स्वसुख सोडिलें,
धरूनी नीच स्थिति
अत्यंत सोसिलें. ध्रु०

४ तो सर्व मुलां आतां
बोलावी प्रेमें फार,
त्यापासीं कोणी येतां
विश्रांती मिळणार.
हे प्रभू, कळवाया
पाठीव सेवकां.
दे मन वळवाया
सदात्मा बाळकां. ध्रु०

---

488. COME OVER AND HELP US.

"Hark, what mean those lamentations."

## ४८८. "येऊन आमचें साह्य करा."

8, 7. ८, ७ अक्षरी.

१ शब्द येतो ऐकायाला,
आक्रांताचीं वाणी थोर,
"धांवा साह्य करायाला,
आमचा होतो नाश घोर."

२ सुभक्तानो धांवा धांवा,
सांगा ख्रीस्तकृपा थोर,
अधर्म्यांला मार्गीं लावा,
तेणें चुके नाश घोर.

---

489. VISION OF DRY BONES.

"Look down, O Lord, with pitying eye."

## ४८९. सुकलेल्या हाडांचा दृष्टांत.

L. M. ८ अक्षरी.

१ देवा, कृपादृष्टि कर,
पतित जनां तूं उद्धर,
पापानें झाला त्यांचा नाश,
शुष्क हाडांची किती राश!

२ हीं प्रेतें कधीं उठतील?
कीं हाडें उभीं राहतील?
हे देवा, तूंच जाणसी,
हें कार्य तूंच साधिसी.

३ सुवार्त्तिकांला हो सहाय,
तूं नसतां ते निरुपाय,
निष्फळ बोध करणें,
निष्फळ हाका मारणें.

४ सदात्मा देतां प्रेरणा
मृतांस होई चेतना
हीं शुष्क हाडें ऐकतील,
उठुनी हर्ष करितील.

५ तसेंच अंत्य दिवसीं
जेव्हां तूं हाक मारिसी,
तो भक्त ऐकतील स्वर,
ते उठुनी जातील वर.

---

490. THE PROMISED SPIRIT.

"Who but Thou, Almighty Spirit."

## ४९०. वचनाचा आत्मा.

8, 7, 6 lines. ८, ७, अक्षरी.

१ हे सदात्म्या, तूं समर्थ,
पापी लोकां वळवी;
शास्त्रबोध जाई व्यर्थ,
तूं बळानें ठसवी.
हे समर्था, हे समर्था,
खरा धर्म चालवी.

२ नेमलेली वेळ यावी,
आतां प्रभा फांको फार,
सर्व जनां ती दिसावी,
अधर्म्यांला दे उद्धार.
हे सदात्म्या, वचनाच्या,
निवारावा अंधकार.

३ तुझें शास्त्र सर्व सत्य,
सत्य तुझें बोलणें,

आतां तरीं ये अगत्य,
पूर्ण कर वचनें.
हे सदात्म्या, सत्यवादी,
पाड तुझीं किरणें.

---

491. SPREAD OF THE GOSPEL.

"Great God, the nations of the earth."

**४९१. शुभवर्त्तमान सर्वत्र कळावें.**

C. M. ८, ६ अक्षरी.

१ हे देवा, लोक सगळे
तुझ्या हाताचें काम,
सृष्टीमध्यें प्रगटलें
तुझें सुवंद्य नाम.
२ विशेष तुझें मोठें प्रेम
शास्त्रांत दिसतें,
तेणें जनांस अति क्षेम
अखंड मिळतें.
३ सर्वत्र हें सुवर्त्तमान
केव्हां हो कळणार ?
प्रत्येक जना शास्त्रज्ञान
केव्हां समजणार ?
४ पीडित दासां तूं सत्वर
सत्शास्त्र कळवीं,
पापापासुनी मुक्त कर,
स्वप्रजा ह्मणवीं.
५ दे मूर्तिपूजकाला ज्ञान
घालीव त्यांचे भ्रम,
ते करुनी प्रभूचा मान
स्तवोत त्यांचें प्रेम.
६ हे प्रभू, आत्मा देउनी
भक्तांचें साह्य कर,
पापाची सत्ता मोडुनी
तूं सर्व सत्ता धर.

---

492. THE KINGDOM OF CHRIST.

"Great God, whose universal sway."

**४९२. ख्रीस्ताचें राज्य.**

स्तोत्र ७२.

L. M. ८ अक्षरी.

१ हे देवा, थोर भगवान,
स्वयंभू सर्वशक्तिमान,
प्रभूला दे सर्वाधिकार,
जगाचा राज्यकारभार.
२ हें राज्य त्याला शोभतें,
आकाश हर्षे मानितें,
तो करितां दिनाचा न्याय
दुर्जन बुडे निरुपाय.
३ भक्ताला प्रेमें तारितो,
द्रोह्याला बळें मारितो,
सूर्य चंद्रांचा होई क्षय
तोंवरी येशू पावे जय.
४ येउनी वृष्टीसारिखा
तो क्षेम देई सेवकां,
प्रेरणा करी अंतरीं
जसा पाऊस डोंगरीं.
५ तो करुनी प्रकाश फार
राष्ट्रांचा घालवी अंधार,
तेणें सर्वत्र हर्षती,
शुष्क अरण्यें फुलती.
६ भक्त सत्सुख पावतील,
शोभिनीं वस्त्रें घालतील,
सर्वांचें होई सत्कल्याण,
अनंत सुख समाधान.

---

493. PRAYER FOR ZION.

"Sovereign of worlds, display Thy power."

**४९३. मंडळीसाठीं प्रार्थना.**

L. M. ८ अक्षरी.

१ जगाच्या प्रभू गौरवी,
सामर्थ्य आतां दाखवी,

तूं मंडळीची वृद्धि कर,
संपूर्ण राष्ट्रं तूं उद्धर.

२ सैतानसत्ता मोडुनी
आरूढ हो राजासनीं,
हें हिंदुस्थान तुझें घे,
तूं वश्य कर अवघें.

३ तूं बोल, सर्व ऐकतील,
दे आज्ञा, रानें फुलतील,
घालीव गाढ अंधकार,
सर्वांला दाखवी उद्धार.

---

494. THE APOSTLES' COMMISSION.
"Go preach my gospel, saith the Lord."

४९४. प्रेषितांस आज्ञा.
मात. २८:१८.
L. M. ८ अक्षरी.

१ प्रभूनें आज्ञा दिल्ही थोर,
"जा, सांगा शुभवर्त्तमान,
अविश्वास्याला दंड घोर,
सद्भाविकाला सत्कल्याण.

२ सर्वत्र दावा चमत्कार,
शब्दानें भुतें घालवा,
रोगांचा करा परिहार,
मेलेले यांस उठवा.

३ मी सर्व सत्ता धरितों,
करीन तुमचा संभाळ,
हें जग जाई पावेतों
मी तुम्हांसंगें सर्वकाळ."

४ शिष्यांला आज्ञा देउनी
तो मेघावर्ते चढला,
सर्वत्र त्यांनी जाउनी
उद्धारमार्ग दाविला.

---

495. MISSIONARIES ENCOURAGED.
"Ye Christian heroes, go proclaim."

४९५. सुवार्त्तिकांस धैर्य देणें.
L. M. ८ अक्षरी.

१ ख्रीस्ती भक्तांनो, शूर व्हा,
जाऊनी कृपा गाजवा,
लोकांचा घालवा अंधार
सर्वत्र कळवा उद्धार.

२ प्रभु करील प्रतिपाळ,
नित्य होईल तुमची ढाल,
प्रचंड वारा शमवील,
क्षुब्ध समुद्र शांतवील,

३ समाप्त होई सर्व काम
तों वर्तें गाऊं ख्रीस्तनाम,
तैं पडुनी ख्रीस्तासमोर
सगे वाखाणूं कृपा थोर.

---

496. MISSIONARIES OF CHRIST.
"Men of God, go take your stations.

४९६. ख्रीस्ताचे सुवार्त्तिक.
8, 7, 4. ८, ७, ४ अक्षरी.

१ वेगें जा, सुवार्त्तिकांनो,
जगीं व्यापला अंधार,
राहूं नका, सद्भक्तांनो,
जनां कळवा उद्धार.
वार्त्ता सांगा,
ख्रीस्त हाच तारणार.

२ दुःखें क्लेश सोसुनिया
कार्य करा धैर्यवान,
प्रभू तुझा पाहुनिया
संभाळाया शक्तिमान.
तोच करी
तुमचें सर्वदा कल्याण.

---

497. HERALDS OF THE GOSPEL.
"How beauteous are their feet."

४९७. सुवार्त्तिक.
यशा. ५२:७–१०.
S. M. ६, ८ अक्षरी.

१ जे सांगती उद्धार,
सत्कृपा ईश्वरी,
तयांचे पाय रम्य फार
जीयोन डोंगरीं.

२ सुवार्त्ता सांगतां
मधुर त्यांचा स्वर;
"येशू हा मोठा तारिता,
तो राजा खालीं वर."

३ हें आम्ही ऐकुनी
झालों सुभाग्यवान,
राजे ऐकाया इच्छुनी
अतृप्त मेले, जाण.

४ या समर्था आम्हास
हें तेज दिसलें,
राजांनी तें पाहावयास
अत्यंत इच्छिलें.

५ जे पाहरेकरी
जीयोन राखिती,
ते गातां कृपा ईश्वरी
ख्रीस्ताला स्तविती.

६ सर्वत्र भगवान
सामर्थ्य दावितो,
सर्वांनो, द्या ख्रीस्ताला मान,
तो राज्य करितो.

---

498. Love to the Church.

"I love Thy kingdom, Lord."

## ४९८. मंडळीची आवड.

स्तोत्र १३७.

S. M. ६, ८ अक्षरी.

१ प्रभूची मंडळी
ही मला प्रिय फार,
प्रभूनें ती उद्धारिली
सोसुनी दंडभार.

२ तूं ती संभाळिसी
हे देवा, सर्वकाळ,
बुबुळावाणी राखिसी
अत्यंत ममताळ.

३ ती तुझी मंडळी,
मी कसें विसरेन?
त्यापेक्षां सुखें सगळीं
टाकुनी मी मरेन.

४ ती क्लेशीं पाहतां
देवाला विनवीन,
खपुनी तिजकरितां
आयुष्य घालवीन.

५ त्या मंडळीचे नेम
मला आवडती,
तिच्यांत मिळे मोठें क्षेम,
प्रेमळ सोबती.

६ हे देवा, मंडळी
तूं वाढवी अपार,
दे तिला राष्ट्रें सगळीं,
आकाशींहि उद्धार.

---

499. Giving for the Spread of the Gospel.

"With my substance I will honor."

## ४९९. धर्म कळविण्याकरितां देणें.

8, 7. ८, ७ अक्षरी.

१ खरा धर्म चालवाया
आम्ही हर्षें देऊं माल,
ख्रीस्त आम्हा उद्धराया
खालीं आला ममताळ.

२ सद्भक्तांनो, अवघ्यांला
कळूं द्या उद्धार क्षेम,
पैका अर्पा या कार्याला,
आठवा ख्रीस्ताचें प्रेम.

३ जगीं राज्य स्थापुनिया
ख्रीस्त येतो सत्वरी,
त्याला सर्व अर्पुनिया
आम्ही हर्षूं अंतरीं.

---

500. BENEFICENCE.

### ५००. धर्मादाय.

7s. ७ अक्षरी.

१ थेंब थेंब पडनी,
 त्यांचे ओघ वाहती,
 बहु ओघ मिळुनी
 नदी वाहे भरुनी.
२ तसे धर्माकरितां
 पैसा पैसा टाकितां
 अंतीं किती जमतें !
 मोठें कार्य साधतें.
३ भक्तजन, चला, या,
 धर्मासाठीं पैसे द्या,
 ख्रीस्तप्रीति आठवा,
 आतां प्रीति दाखवा.

---

501. GLAD TIDINGS TO ZION.

"On the mountain's top appearing."

### ५०१. जीयोनेला सुवर्त्तमान सांगणें.

8, 7, 4. ८, ७, ४ अक्षरी.

१ पाहा, पर्वताच्या माथां
 सुवार्त्तिक गाजवी,
 जीयोनेला शुभवार्ता
 कल्याणाची कळवी.
 "रडूं नको,
 देव तुला शांतवी.
२ फार वेळ साह्यकारी
 कोणी नाहीं दिसला,
 तुझे अगणित वैरी
 यांचा शक चालला.
 शोक सोड,
 देव पाळी तुजला.
३ तोच हात धरितांना
 तुला वेगें उठवील,
 तुझ्यापुढें चालतांना
 सर्व वैऱ्यां पळवील.
 मोठ्या प्रेमा
 तुझा राजा दाखवील.
४ तूं आनंद पावुनिया
 पुढें राहसी निर्भय,
 तुझा राजा पाळुनिया
 तुला देई मोठा जय.
 कष्ट जातां
 शांति पावसी अक्षय."

---

502. WHAT OF THE NIGHT?

"Watchman, tell us of the night."

### ५०२. पाहेकऱ्या, रात्रीचें काय.

7s. ७ अक्षरी.

१ जागल्यारे, किती रात?
 कांहीं खुणा दिसती?
 "यात्रिका, येई प्रभात,
 तारा ती उगवती."
 जागल्या, ती कळवी
 कसें काय वर्त्तमान?
 "यात्रिका, ती पोंचवी
 मंडळीचें समाधान."
२ जागल्या, येई सकाळ.
 पाहा, तारा चढती.
 "यात्रिका, जातात हाळ,
 सुख शांति पोंचती."
 जागल्या, तें तेज थोर
 एका जागीं राहणार?
 "यात्रिका सर्वांसमोर
 तें प्रकाश करणार.
३ जागल्यारे, पाहा वर,
 दिसतो अरूणोदय.
 "यात्रिका, आनंद कर,
 सरला अंधार भय."

जागल्यारे, झालें काम,
घरीं जा संतुष्ट फार.
"यात्रिका गा ख्रीस्तनाम,
आला प्रभु तारणार."

503. THE FOUNTAIN OF SALVATION.
"See from Zion's sacred mountain."

**५०३. तारणाचा उगम.**
जखा. १३:१.

8, 7, 4. ८, ७, ४ अक्षरी.

१ पाहा, जीयोनेंत झरा
ईश्वरें उघडिला,
त्यानें हा उपाय खरा
पाप्यांसाठीं योजिला.
पापमळ
तेणें सर्व धुतला.

२ या झऱ्याचें श्रेष्ठ पाणी
सर्व जगीं वाहतें,
तें हजारोंहि पाटांनी
राष्ट्रांसाठीं चालतें.
जीवनाचें
हेंच पाणी मिळतें.

३ हेंच पाणी पोंचतांना
शोभिवंत होतें रान,
शुष्क भूमी फुलतांना
होतें अति सुखस्थान.
धन्य पाणी,
येणें सर्वदा कल्याण.

504. SAFETY OF THE CHURCH.
"Glorious things of thee are spoken."

**५०४. मंडळीचा आश्रय.**
यशा. ४:५.

8, 7. ८, ७ अक्षरी.

१ तुझें क्षेम आहे किती!
हे देवाच्या मंडळी,
ईश्वरानें मोठी प्रीति
तुजवर ठेविली.
स्थिर पायीं घातलेली
कसा धक्का पावसील?
तारणानें वेढलेली
विरोध्यांला हंससील.

२ तुझ्यासाठीं प्रभु धन्य
मोठ्या नद्या वाहवी,
तुझे पुत्र आणि कन्या
यांला नित्य पुरवी.
जीवनाचें पितां पाणी
भक्तां कसी लागे तान!
तें देणाऱ्या प्रभूवाणी
सर्वदा अक्षय, जाण.

३ लोक रानीं चालतांना
अग्निमेघ दिधला,
तसें प्रेम दावितांना
प्रभु देई तुजला.
रात्रीं मार्ग दाखवाया
पाडी तेज ईश्वरीं,
दिवसा तो करी छाया
अवघ्या भक्तांवरी.

505. THE MORNING COMETH.
"The morning light is breaking."

**५०५. सकाळ येती.**
यशा. २१:१२.

7, 6. ७, ६ अक्षरी.

१ प्रकाश फांकतांना
निरसतो अंधार,
मनुष्य फिरतांना
स्वीकारिती उद्धार.
प्रत्येका वाऱ्यानें
ही वार्त्ता पोंचती,
कीं भक्त प्रयासानें
धर्म प्रसारिती.

२ सदात्मा वरूनिया
सुवृष्टि करितो,

पाप्यांला प्रेरूनिया
सुमार्गीं लाविती.
सद्भक्त बापापाशीं
विनंती करितां,
तो ऐकतो आकाशीं,
व करी ममता.
३ मूर्त्तींला भजणारे
देवाला नमती,
स्वच्छंदें चालणारे
शास्त्राज्ञा पाळती.
सर्वत्र मानिताती
ख्रीस्ताचे उपकार,
हजारों मागताती
त्याजवळीं उद्धार.
४ धन्य उद्धारनदी,
वाहा चहुंकडे,
सर्व फुलेल कधीं
हे रान कोरडें ?
सर्वत्र वाहुनिया
जीवन पुरवी,
कधीं न थांबुनिया
आकाश पोंचवी.

---

506. Jesus shall reign.
"Hark, the song of Jubilee."

५०६. येशू राज्य करील.
प्रग. १९.

7s. ७ अक्षरी.

१ ऐका लोक गर्जना
समुद्राच्या वाणी थोर;
करितांना अर्चना
गाती ईश्वरासमोर.
"हालेलूया, भगवान
सर्व सत्ता धरितो,
हालेलूया, येशू, जाण,
अधिकार करितो.
२ युद्ध आतां संपलें,
झेंडाहि गुंडाळिला,
खड्ग म्यानीं घातले,
ख्रीस्त जय पावला.
सर्व राज्यें वैभवी
त्याचीं झालीं ताबेदार,
सार्वभौम गौरवी
तोच करी अधिकार."
३ येशू राज्य करितो,
त्याला कोण आडवील ?
जग जाई पावेतों
तोच सत्ता चालवील.
अंतीं पावे मोठा जय,
शेवटील शत्रु घोर
मृत्यु याचा होई क्षय;
हालेलूया, ख्रीस्त थोर.

---

507. The little Travellers.

५०७. लहान वाटसरू.

7s. ७ अक्षरी.

१ किती मुलें लेंकरें
आकाशाला चालती!
तीं येशूचीं कोंकरें,
त्याला अनुसरती.
येशू करी प्रीति फार,
जागा देई लेंकरांस,
उघडी मोत्याचें दार
या लहान वाटसरांस.
२ कोठुनी हे समुदाय
आकाशाला चालती ?
ऐका, तींच मुलें काय
एकमेकां सांगती.
"आलों मी चीनाहुनी,"
"इंग्लंडीं मी जन्मलों."
"मी अमेरिकेहुनी,"
"मी लंकेंत राहिलों."

३ कष्टें मार्गी चालले,
टाळले जगाचे हाल,
शेवटाला पोंचले,
हर्ष होई सर्वकाळ.
येशू करी अंगीकार,
जागा देई लेंकरांस,
उघडी मोत्याचें दार
या लहान वाट्सरांस.

---

508. THE MORNING LIGHT.

"Hail to the brightness," &c.

## ५०८. सकाळची प्रभा.

11, 10. ११, १० अक्षरी.

१ पाहा गे मंडळी, सकाळ आली,
आतां निवारिला तुझा अंधार,
शोकाची वेळ ही समाप्त झाली,
तुला मिळाला वरूनी उद्धार.

२ पाहा गे मंडळी, सुदिन आलें,
पूर्वी शास्त्रांत सांगितली वेळ,
पापाचें दास हे मोकळे झाले,
सर्वत्र सुख सत्शांति व मेळ.

३ शुष्क रानांत उद्भवती फुलें,
सुंदर नद्या तें वाहती फार,
दु:खित हर्षती कल्याणामुळें,
सर्वत्र गाती मोठ्यानें उद्धार.

४ सर्वच करितां देवाची भक्ति
अखंड वर्णिती ख्रीस्ताचें प्रेम,
सैतानापासुनी पावुनी मुक्ति
अत्यंत भोगिती उद्धार क्षेम.

५ गा स्तुति, भक्तहो, सकाळ आली,
संपूर्ण सरला गाढ अंधार,
शोकाची वेळ ही समाप्त झाली,
आतां मिळाला वरूनी उद्धार.

---

509. INCREASE OF THE CHURCH.

"O'er mountain tops the mount of God."

## ५०९. मंडळीची वृद्धि.

यशा. २:२-४.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ पुढील काळीं भगवान
स्थापील स्वमंदिर,
डोंगरमाथां दृश्यमान,
पर्वतांपेक्षां स्थिर.

२ जगाचीं राष्ट्रें सगळीं
त्या घरीं लोटतील,
जाउनी देवाजवळी
सुमार्ग शोधतील.

३ तेथून तेज फांकुनी
जगा प्रकाशणार,
त्या स्थानीं राजा बसुनी
करी सर्वाधिकार.

४ राष्ट्रांचा तो करूनी न्याय
दावील सत्यता,
दीनाला होउनी सहाय
दाबील दुष्टता.

५ लढाया बंद करूनी
देईल शांतिकाळ,
तों तरवारी मोडुनी
ते करतील फाळ.

६ संपूर्ण पापी जगा, ये,
येशू हा तारणार,
प्रभूच्या प्रकाशामध्यें
चालुनी घे उद्धार.

---

510. THY KINGDOM COME.

"Soon may the last glad song arise."

## ५१०. तुझें राज्य येवो.

मात. ६:१०.

L. M. ८ अक्षरी.

१ हे देवा, आतां राज्य कर,
होऊं दे हर्ष खालीं वर,

प्रेमें गावोत सगळे,
"देवानें राज्य घेंचलें."

२ सर्वत्र काढितांना स्वर
मधुर गाणें चढो वर,
"सुमार्ग सर्व धरिती,
ख्रीस्ताचा मान करिती."

---

511. SAFETY OF THE CHURCH.
"Oh great is Jehovah," &c.

५११. मंडळीचें सुरक्षितपण.
स्तोत्र ४८.

11, 8. ११, ८ अक्षरी.

१ अनंत देवाला वाखाणा अपार,
तो राजा अनुपम थोर,
भक्तांस तो सर्वदा देतो आधार,
हे मंडळी, गा त्यासमोर.

२ पृथ्वीचा आनंद ही मंडळी, जाण,
ती राहे अजिंक निर्भय,
तिच्यांत देवाचें आवडतें स्थान,
तो दावितो प्रीति अक्षय.

३ भक्तांनी आनंद करावा अपार,
कां ईश्वर करितो न्याय.
तो त्यांस कल्पांतींहि न सोडणार
जे त्याचेच धरिती पाय.

४ सीयोनेसभोंवतें चाला चौफेर,
कोटाकडे द्या अवधान,
इमारती निरखा, मोजाहि घेर,
ते बुरूज किती महान!

५ सद्भक्त हे ह्मणती, "देव आश्रय,
तो आमचा करी कैवार,
तो मरणापावेतों ठेवी निर्भय,
आकाशीं देईल उद्धार."

---

## XI. DEATH AND ETERNITY.

## ११. मरण आणि परलोक.

512. DEATH AND JUDGMENT.
"Heaven has confirmed the great decree."

५१२. मरणें आणि न्याय ठरणें.
C. M. ८, ६ अक्षरी.

१ सर्व मनुष्य मरतील,
हें देवें नेमिलें,
मातीसीं सर्व मिळतील
जे कोणी जन्मले.

२ जनानो, पाहा थडगें,
तें होई तुमचें घर.
तेथें जायाचे अवघे,
गरीब मानवर.

३ सर्व जनांला एक वेळ
मरावें लागतें,
कर्माचें फळ न चुकेल,
सत्शास्त्र सांगतें.

४ प्रभु हा हाका मारुनी
सर्वांला उठवील,
तेव्हां हिशोब घेऊनी
तो न्याय ठरवील.

५ हे येशू प्रभू गौरवी,
हो माझा मित्र थोर,
तूं मला न्यायी ठरवी,
चुकोव दंड घोर.

---

513. FRAILTY OF LIFE.
"Thee we adore, Eternal Name."

५१३. आयुष्य क्षणभंगुर.
याक. ४:१४.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ देवाला आह्मी नमतों
अत्यंत हलके,

एका क्षणांत मरतों
पतंगासारिखे.
२ वर्षांच्या मागें वर्ष, जाण,
वेगें गुजरतें,
आयुष्य हें वाफेसमान
लौकर सरतें.
३ या मृत्युलोकीं राहतां
संकटें होती फार,
जनाला रोग लागतां
मरती बेसुमार.
४ उद्यांचा भरवसा काय?
आतां धरावे गुण,
कां प्रभु ठरवील न्याय
या आयुष्यावरून.
५ कर्मांप्रमाणें मिळणार
सुख कीं यातना,
तरी मूर्खाला सदाचार
कराया वाटेना.
६ हे देवा, प्रेरुनी आह्मास
सुमार्गीं चालवी,
अकस्मात् मृत्यु लागल्यास
घे वरें गौरवीं.

514. Life the Day of Grace.

"Life is the time to serve the Lord."

५१४. आयुष्य कृपा मिळण्याची वेळ.

L. M. ८ अक्षरी.

१ आयुष्य परीक्षेची वेळ,
यांतच मन पालटेल,
जगांत आहों तोंवरी
मिळेल कृपा ईश्वरी.
२ पाप्यांनो, दंड चुकवा,
आतांच कृपा मिळवा,
आयुष्य वेगें सरणार,
ह्मणुनी आतां घ्या उद्धार.
३ जिवंतां कळला उपाय,
परी मृतांस होई काय?
न मिळायाचें त्यांस ज्ञान,
न साधायाचें तें कल्याण.
४ समाप्त झालें त्याचें काम,
श्रमांचा झाला परिणाम,
कांहींहि घडो माणसांस
तरी न लागे तें मृतांस.
५ आतां जें केलें पाहिजे
तें सामर्थ्यानें करिजे,
कां परलोकीं होईना,
तैं युक्ति ज्ञान येईना.
६ मरण लागल्यावरी
न मिळे कृपा ईश्वरी,
न सांपडेल तारणार,
परी निराशा अंधकार.

515. Frailty of life.

"Lord, what a feeble piece."

५१५. आयुष्य क्षणभंगुर.
स्तोत्र ९०.

S. M. ६, ८ अक्षरी.

१ आयुष्य मानवी,
हें किती हलकें!
आह्माला ऊन वाळवी
गवतासारिखें.
२ मातीचें हें शरीर
मातीशीं मिळणार,
कांहीं न लागतां उशीर
तें क्षय पावणार.
३ कल्पनेसारिखीं
वर्षें गुजरतात,
तीं जेव्हां कोणी निरखी
तेव्हांच सरतात.
४ आयुष्य गुजरो,
लक्षांत ठेवूं ज्ञान,

मरण वेगें पोहंचो,
आह्माला तें कल्याण.
५ लौकर टाळुनी
जगाचे कष्ट हाल,
पावूं सत्सुख जीवनीं,
तें भोगूं सर्वकाळ.

---

516. Certainty of Death.

**५१६. मरण येईल. स्तोत्र ८९:४८.**
Hindu M. पद. (परज, एका).

ध्रु० मरण येईल येईल, घेउनिया जाईल.
१ गोरा, सुंदर असला,
तोंडावरि जरि डागहि नसला. ध्रु०
२ दुध पेढ्यांचाकाला,
खाउनि पइलवान जरि झाला. ध्रु०
३ शेट, सावकार असला,
किंवा भूपति होउनि बसला. ध्रु०
४ गढि, किल्ला बांधीला,
भोंनीं पाहारा ठेवीला. ध्रु०
५ ज्ञानि ज्ञानि ज्यां गाती,
होईल त्यांचिहि मुठभर माती. ध्रु०
६ तंत्री, मंत्री, जंत्री,
अवघे पडतिल मृत्यूयंत्रीं. ध्रु०
७ डाक्तर, वैद्यहि झाला,
तरि त्या न चुके मृत्यूघाला. ध्रु०
८ डोळे रडुं रडुं गेले,
किंवा ढीग धनाचे केले. ध्रु०
९ दुनिया सगळी जमली,
स्त्री मुलें रडुनी रडुनी दमलीं. ध्रु०
१० ख्रीस्तपदीं जो धाला,
त्याला मरण लाभही झाला. ध्रु०

---

517. Life is Fleeting.

**५१७. आयुष्य क्षणभंगुर.**
Hindu M. पद. (सारंग, एका).

ध्रु० आयुष्य वेगें पळतें गड्या,
चल कां उशिर, लवकर फिर.
१ पळ, घटका, तास, दीन,
मास, वर्ष करिति रीण;
मरण जवळ जवळ येतें,
कसा धरि धिर; लवकर फिर. ध्रु०
२ बाळपण, तारूण्यभर
सरुन होइल वृद्ध घर;
इंद्रियेंहि बंद होतां
गलित शरिर; लवकर फिर. ध्रु०
३ छंद, फंद, विषय रंग,
अणिक करसि फार ढंग;
जगिक सुखीं गुंगु नको,
लागेल तिर; लवकर फिर. ध्रु०
४ तीर्थ, वारि, स्नान, दान,
करून ह्मणसि पुण्यवान;
अंत घाण येति सारी,
वर केला पिर; लवकर फिर. ध्रु०
५ सद्गुरु ख्रीस्तेंच जाण,
पाप्यांस्तव दिधला प्राण;
तारण करिल ह्मणुन ठेवी,
तत्पदिं शिर; लवकर फिर. ध्रु०

---

518. Shortness of Life.

**५१८. आयुष्य क्षणभंगुर.**
Hindu M. अभंग.

१ सर्व मानव गवत,
शोभा त्यांची पुष्पवत्.
२ काळ आयुष्याचा तर,
छायेसम चवंगाभर.
३ आयुष्य हें वाफेसम,
राही थोडें, सोडी दम.
४ धन मनुष्य साठवी,
कोण भोगी तें नाठवी,
५ सर्व आयुष्याचा ताठा,
कष्ट, दु:ख, शोक, कांटा.

---

519. DEATH SEIZES ALL.

### ५१९. मरण सर्वांस नेतें.

Hindu M. अभंग.

१ कोणाचा मुलाजा न धरी मरण,
लेंकरूं, तरूण, वृद्ध असो.
२ असो सावकार, राजा, गवरनर,
कुशल, डाक्तर, वैद्य असो.
३ शूर, योद्धा, ज्ञानी, चतुर, विद्वान,
मंत्री, पहलवान, वक्ता, कवि.
४ उत्पत्तीपासूनी झाले जे होणार
प्राणी तावेदार सर्व त्याचे.
५ सर्वांच्या गळ्यांला लावी एक तांत,
कोणी बोलनात त्याच्या पुढें.

---

520. DEATH OF THE WICKED.

### ५२०. दुष्टांचें भयंकर मरण.

Hindu M. अभंग.

१ पश्चात्ताप मृत्युकाळीं,
होत नाहीं त्या आदलीं.
२ काय मृत्यूचा दरारा,
आत्मा कांपतो थरारा.
३ शब्द निघतो बोबडा,
येतो तोंडाला बुडबुडा.
४ डोळे धुंद, कान बंद,
शुद्धि, बुद्धि, नाडी मंद.
५ किती भयंकर अंत,
ऊस पडला चरकांत.
६ तैसी स्थिति होती तंव,
येतो पूर्ण अनुभव.
७ पश्चात्तापाचा समय
गेला, आतां दंडभय.

---

521. FEAR OF DEATH.

"Why should we start and fear to die?"

### ५२१. मरणाचें भय.

L. M. ८ अक्षरी.

१ कां वाटे मरणाचें भय?
तें तर आकाशाचें दार,
ख्रीस्ताचा असतां आश्रय
अघोर नाहीं वाटणार.
२ अंतकाळींच्या वेदना
जनांला विचकावती,
मराया बरें वाटेना,
जगाया फार इच्छिती.
३ प्रभूचा असतां आधार
माझा जीवात्मा उडुनी
त्या घोर द्वारें जाई पार
कोणालाहि न भिउनी.
४ अंतकाळींच्या तिडका
येशू जातीने शमवील,
तो प्रिय भावासारिखा
येउनी मला शांतवील.
५ दावुनी प्रेम ईश्वरी
देईल मोठें समाधान,
टेंकुनी डोकें त्यावरी
संतोषें मी सोडीन प्राण.

---

522. THE GRAVE.

### ५२२. प्रेताची खांच.

ईयोब १७: १३.

Hindu M. दिंडी, (पिलू, एका.)

१ अगे शवगर्ते, तुला पाहतां ही,
धुंदि नेत्रांची उडुन जाति पाही,
स्वच्छ दिसती मग फार दिशा दाही,
जगावरि तें आवडी बसत नाहीं.
२ अगे शवगर्ते, तुला पाहतांना,
मनीं उठती कल्पना कशा नाना,
उचंबळुनी हृदयांत फुटे पान्हा,
शांति होते स्मरतांच येशुराणा.
३ अगे शवगर्ते, काय तुझी जागा,
जणूं दिसती माझिया परी-मागा,
कशी केली माझिया पुरति-आंगा,
मला निजवीसी काय पृष्ठभागा.
४ भाव नसतां प्रभुवरीं नको ग्रासूं,
जगीं स्वर्गीं होईल फार हासूं,

क्षमा पापांची झालि गूण हासू,
मला येई तों तोंड नको वासूं.
५ प्रभू निजला तुझियांत गे प्रकाशीं,
पुन: उठुनी चढलाहि तो अकाशीं,
मजहि थोडे दिन राहुं दे प्रवासी,
तोच उठविल मज न्यावया गृहासीं.

523. Rapidity of Time.
"While with ceaseless course the sun."

**५२३. आयुष्याची वेळ लवकर सरती.**

7s. ७ अक्षरी.

१ सूर्य फेऱ्या घालितां
गतवर्ष सरलें,
तों बहुत मरतां
परलोकीं चालले.
ते जगाला सोडुनी
सुख पावले कीं हाल,
आह्मी मर्त्यभुवनीं
राहतों थोडाच काळ.
२ जसा बाण सुटतांच
उडतो अभ्रांतरीं,
जसी वीज लवतांच
चमके दिगंतरीं;
तसी आयुष्याची वेळ
मोठ्या वेगें सरुनी
स्वप्नावाणी गुजरेल
पापबळें करुनी.
३ ईश्वराचे उपकार
आह्मी आतां मानितों,
आमुचीं पातकें अपार
यांची क्षमा मागतों.
देवा, आह्मा दे सद्भाव,
खीस्तप्रीति दाखवीं,
अंतकाळीं कृपा दाव,
आकाशांत पोंचवीं.

524. Death of a Christian.
"Lo, the prisoner is released."

**५२४. ख्रिस्ती भावाचें मरण.**

7s. ७ अक्षरी.

१ आमुचा भाऊ निजला,
टाकिला देहाचा भार,
देवापासीं पोंचला,
सुख पावला अपार.
दु:खें सर्व सरलीं,
श्रेष्ठ झाला परिणाम,
पापें भयें टळलीं,
आतां भोगितो विश्राम.
२ धैर्य धांव मारुनी
त्यानें पण जिंकला,
तो लढाई करुनी
जयवंत ठरला.
दिव्य दूत उतरून
घेउनिया गेले वर,
तेथें कृपा कळवून
तो स्तवाया काढी स्वर.
३ जग मृतांकरितां
करी मोठा शोक घोर,
आमुचा भाऊ मरतां
त्याला झाला लाभ थोर.
त्याला आहे समाधान,
आतां किंचित् नाहीं भय,
त्याचें जाणुनी कल्याण,
आह्मी करूं जयजय.

525. Death of a Saint.
"Why do we mourn departing friends?"

**५२५. भक्ताचें मरण.**

इब्री २:१४.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ मेलेल्या भावांकरितां
कां करूं शोक घोर?

मृत्यूचें भय धरितां
    कां कांपूं त्यासमोर ?

२ प्रियांचीं प्रेतें पुरूनी
    कां होऊं खिन्न फार?
येशूनें स्वतां मरूनी
    निवारिला अंधार.

३ थड्यामध्यें तो उतरून
    पावला मोठा जय,
भक्तांस वाट दाखवून
    नाहींसें केलें भय.

४ मृत्यूची सत्ता मोडुनी
    दाविली शक्ति थोर,
त्यासंगें आह्मी निजुनी
    मानूंच नये घोर.

५ तो पुन्हा उठुनी सत्वर
    आकाशीं चढला,
त्यापासीं आह्मी जाऊं वर,
    तों स्तवूं त्याजला.

६ हे प्रभू, दे आह्माला धीर,
    सामर्थ्य पुरवीं,
आकाशीं लागो चित्त स्थिर,
    पुढें घे गौरवीं.

---

526. DEATH OF A PASTOR.

"Weep not for the saint who ascends."

### ५२६. उपदेशकाचें मरण.

8 s. ८ अक्षरी, तिहिरी.

१ सद्भक्त जो चढला वर
    आकाशीं पावाया सत्सुख,
व स्तवितां काढी सुस्वर,
    त्या करितां न वाटो दुःख.
तयाला मिळाला विश्राम,
    प्रभूकडे झाला आश्रय,
तों त्याचें वाखाणितो नाम,
    ज्या नामें तो पावला जय.

२ तो पाळक गेला ह्मणून
    जे शोकें अत्यंत व्याकुळ,
तयांचें तें दुःख पाहून
    गहिंवर येवो विपुळ.
विशेषें अंधारीं जे लोक,
    जयांस न कळे उद्धार,
त्यांकरितां करा हो शोक,
    कीं जाईल कसा अंधार?

---

527. "I WOULD NOT LIVE ALWAY."

### ५२७. सर्वकाळ जगूं नये.

इयोब ७:१६.

11s. ११ अक्षरी.

१ या जगीं राहाया मी न मागणार,
कां नित्य अढळे विपत्ति अंधार,
जिवाला अखंड दुश्चिंता व दुःख,
सुदिनीं एखादिया क्षणिक सुख.

२ या जगीं राहाया मी न मागणार,
कां पापमोहाचे प्रसंग अपार,
पापानें दीनाला उद्भवतें भय,
पापानें भक्ताच्या हर्षाचाहि क्षय.

३ या जगीं राहाया मी न मागणार,
थड्यांत निजावें हें आवडे फार,
येशूच्या समागमें स्वस्थ निजेन,
त्यासंगतीं गौरवीं पुन्हा उठेन.

४ या जगीं राहाया मी न मागणार,
देवाज्ञा होतांना संतोषें जाणार,
सद्भक्त हे चालले धरूनी धीर,
त्या वाटें जायाला कां करूं उशीर?

५ या जगीं कां राहूं ? हें क्षणिक घर,
त्यापेक्षां देवाकडे जाउनी वर
पावावा बापाच्या प्रीतीचा संभोग,
सुखाच्या नदीचा तो नेहमी ओघ.

६ देवाचे जे पुत्र प्रारंभापासून,
ते तेथें प्रभूसीं एकत्र मिळून,

देवाला वाखाणितां गाती अपार,
व बापाची प्रीति जिवाचा आहार.

---

528. TIME OF DEATH UNKNOWN.

### ५२८. मृत्यूची वेळ अज्ञात.

Hindu M. अभंग.

१ वर्ष नेमलें कोणतें,
ज्यांत मरण येई मातें,
२ मास कोणता नेमला,
ज्यांत मरण येई मला,
३ कोण्या दिनीं जन पाहीं,
माझा भरवंसा नाहीं.
४ कोण्या तासीं कोण्या घडी,
मृत्यु करील तातडी.
५ कोण्या पळामध्यें मोला,
बोलतील झाला, झाला.
६ साऱ्या वेळा होती गोड,
करितां ख्रीस्त याची जोड.

---

529. DEATH OF INFANTS.
"Thy life I read, my dearest Lord."

### ५२९. बाळकांचें मरण.

मात. १९:१४.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ हे प्रभू, तुझें मोठें प्रेम
शास्त्रांत वर्णिलें,
बाळांस देउनिया क्षेम
स्वतेज दाविलें.
२ तूं ह्मणसी, "या कोंकरांस
उरासीं धरितों,
मी आशीर्वाद लेंकरांस
प्रेमानें करितों.
३ जरी ते वेगें मरतील
मी त्यांचा तारणार,
आकाशीं राज्य पावतील
असींच बाळें फार.
४ मी त्यांला पुन्हा उठवून
करीन तेजवान,
तेव्हां तीं कृपा गाजवून
देतील मला मान."
५ हे प्रिय प्रभू ममताळ,
आतां तूं कृपा दाव,
तुझेंच आहों सर्वकाळ,
सुवंद्य तुझें नांव

---

530. THE FINAL JUDGMENT.
"And will the Judge descend?"

### ५३०. शेवटला न्याय.

C. M. ६, ८ अक्षरी.

१ प्रभु हा उतरून
मृतांस उठवील,
कोणालाही न वगळून
तो न्याय ठरवील.
२ त्या दिवसीं सरेल
ही भूमि व आकाश,
जीवात्मा किती घाबरेल!
कसा चुकेल नाश!
३ आतां कानावरीं
सुवार्ता पडती,
शास्त्रानें कृपा ईश्वरी
सर्वांला कळती.
४ पाप्यांनो, कृपा घ्या,
कां नाश पावतां?
आश्रय पावायाला या,
येशू हा तारिता.
५ मिळो हो त्याजशीं
प्रभूचें लागो प्रेम,
त्या घोर न्यायदिवसीं
तो करी तुमचें क्षेम.

---

531. Day of Judgment.

"Day of Judgment, day of wonder!"

## ५३१. न्यायाचा दिवस.

8, 7, 4. ८, ७, ४ अक्षरी.

१ न्यायदिन भयंकारी
अंतकाळीं पोंहचेल,
तेव्हां ईश्वरी तुतारी
हीं दिगंतरीं वाजेल;
तीं ऐकुनी
पापी जन घाबरेल.

२ प्रभु हाक मारितांना
सर्व प्रेतें उठतील,
जगें विरघळतांना
त्याच्या पुढें हटतील;
तों भयाने
सर्व पापी गळतील.

३ न्यायाधीश तेजवंत
बसुनी करील न्याय,
त्याला पाहुनिया संत
प्रेमें धरतील पाय;
पापी यांला
नाहीं आश्रयाचा ठाय.

४ तो ह्मणेल सद्भक्तांला,
"अहो प्रिय, तुह्मी या,
राज्य नेमिलें तुह्माला
तें सुखाने आतां घ्या;
सर्वकाळ
वैभवीं राहाया या."

---

532. The Judgment Day.

"When Thou, my righteous Judge," &c.

## ५३२. न्यायाचा दिवस.

C. P. M. ८, ८, ६ अक्षरी.

१ हे प्रभू, तूं उतरसील,
भक्तां एकत्र करसील,
तों मलाहि बोलाव;
मी अति पापी असतां
तरी तूं कर ममता,
अनंत कृपा दाव.

२ हे प्रभू, मला हो आधार,
तूं एकलाच तारणार,
मी पायां पडतों;
तूं आतां देउनी आश्रय
निवार माझें सर्व भय,
मी कृपा मागतों.

३ पुढें तुतारी ईश्वरी
वाजेल हो दिगंतरीं,
तों माझा घे कैवार;
तेव्हां गाईन तुझें प्रेम,
वर्णीन उद्धाराचें क्षेम,
अनंत उपकार.

---

533. The Day of Judgment.

## ५३३. प्रभूचा मोठा दिवस.

8s. अभंग.

१ प्रभु तेज लेउनिया
येई न्याय ठरवाया,
जसा चोर रात्रीं येई,
तसा तो प्रगट होई.
त्यासमोर दूतसैन्य
उभें राही त्याला मान्य,
तो येतांना ऐश्वर्याने
सर्व कांपती भयाने.

२ सूर्य न प्रकाशणार,
होई दिवसा अंधार,
चंद्र रक्तवाणी लाल
दिसे माणसां विक्राळ.
तारे पडतील खालीं,
जसीं फळें हो अकालीं,

भूमिकंप वाजतील,
विजा फार लवतील.
3 माणसांनो, आतां पळा,
आतां पापदंड टाळा,
प्रभु ख्रीस्त याला जाणा,
त्याच्या आज्ञा प्रेमें माना.
त्या प्रभूला अनुसरा,
हृदयाला शुद्ध करा,
तरी प्रभु न्याया येई,
तेव्हां तुझा हर्ष होई.

---

534. The Second Death.

## ५३४. दुसरें मरण.

Hindu M. अभंग.

१ अहा मरण दुसरें
नरक भयंकर अरे.
२ गंधकाग्नि डोह नीत
देवक्रोधें प्रज्वलित.
3 अति निबीड अंधार,
खांच अथांग अपार.
४ किडा न मरे तो कदा,
खाई हृदयासी सदा.
५ ऐशा दु:सह ठिकाणीं
जाती दुष्ट मनुज प्राणी.

---

535. Hell.

## ५३५. नरकयातना.

Hindu M. अभंग.

१ अति दारूण यातना
नरकीं होती देहा मना.
२ आक्रंदनाचा आरडा,
दांत खाताती कडकडा.
3 दु:ख अघोर नरकाचें
कोणा वर्णवेना साचें.
४ ऐसें अनंत काळ तें
दु:ख देहात्म्या जाळितें.
५ तरी देहात्म्याचा क्षय
कधीं न होई निश्चय.

---

536. Christ's Second Coming.

"Lo, he comes with clouds descending."

## ५३६. ख्रीस्ताचें दुसरें येणें.

प्रग. १:७.

8, 7, 4. ८, ७, ४ अक्षरी.

१ पाहा, प्रभु खालीं येतां
दिसे अति तेजोमय,
लाखों भक्त मान देतां
करितात जयजय.
"हालेलूया,
येशू राजा हो अक्षय."
२ सर्व माणसें प्रभूला
त्या समयीं पाहतील,
ज्यांनी मारिलें येशूला
ते अत्यंत रडतील,
"आह्मी नष्ट,"
असें ते पत्करतील.
3 तेव्हां वाजतां तुतारी
जगें सरती सत्वर,
ईश्वराचे सर्व वैरी
कांपतील थरथर;
न्याय होतां
दंड येई त्यांजवर.
४ प्रभू, वेगें येउनिया
जगन्न्याय ठरवीं,
सर्व राज्य घेउनिया
तुझी शक्ति कळवीं.
वेगें ये रे,
सर्व शत्रु पळवीं.

---

537. THE NEW JERUSALEM.

"Lo what a glorious sight appears."

**५३७. नवी यरूशलेम खालीं येती.**

C. M. ८, ६ अक्षरी.

१ पुढें दिसेल चमत्कार,
अद्भुत केवढें!
आकाश भूमि सरणार,
कोठें न सांपडे.

२ येई आकाशापासुनी
नवी यरूशलेम,
मोठा प्रकाश पाडुनी
भोगी अत्यंत क्षेम.

३ दिव्य दूतांची मंडळी
करील जयजय,
प्रभूची कृपा दिसली
ती वर्णी अतिशय.

४ "प्रभू हा आतां उतरून
क्लेश निवारितो,
जनांला प्रेम दाखवून
त्यांसंगें राहतो.

५ सर्वांचीं आसवें पुसील,
निवारी सर्व भय,
संपूर्ण दुःखें घालवील,
मृत्यूचा करी क्षय."

६ हे प्रिय प्रभू गौरवी,
उशीर साहेना,
सुदिन वेगें पोंचवी,
ही मोठी प्रार्थना.

538. PROSPECT OF ETERNITY.

"Lo, on a narrow neck of land."

**५३८. अनंतकाळाविषयीं विचार.**

C. P. M. ८, ८, ६ अक्षरी.

१ पाहा, आयुष्य सरतें,
तें किंचित्हि न ठरतें,
कां करूं अविचार?
क्षणांत मिळे सुख थोर,
कीं नरकांत दंड घोर
आह्मांला लागणार.

२ हे प्रभू, कर प्रेरणा,
आह्मांला दे सद्भावना,
सुज्ञान ठसवी;
झोंपेंतुनिया उठवून
मनाला धैर्य पुरवून
सुमार्गीं चालवी.

३ मेघांवरी उतरसील,
जगाचा न्याय करसील,
हें सुचो सर्वकाळ;
तुझाच असतां आश्रय
त्या वेळीं निरसेल भय,
जातील सर्व हाल.

४ आतां भयानें कांपतां
आह्मी उद्धार साधितां
करावें चित्त स्थिर;
तुझीच इच्छा पाळुनी
जगाचे मोह टाळुनी
नित्य धरावा धीर.

५ पुढें, हे प्रभू गौरवी,
आह्मांला वर्ते पोंचवी,
तें तुझें तोंड दाव;
तों राहतां तुझ्यासमोर,
पावूं सन्सुख अति थोर
व गाऊं तुझें नांव.

539. WE ARE WAITING.

"We are waiting by the river."

**५३९. वाट पाहणें.**

Peculiar. तऱ्हेवाईक.

१ आमचे पाय मृत्युतिरीं,
आह्मी वाट पाहतों,

वाट दुताची, सत्वरी
आह्मा नेई पार तो.
२ नदी ही अंधक दिसे,
लाटा फार गर्जनी,
तरी नदीपार कसे
सूर कानीं पडती.
३ कधीं दृष्टि लावितांना
दिसताती मंदिरें,
शुद्ध नद्या वाहतांना,
तेजोमय मनोरे.
४ प्रिय जे आह्मा सोडुनी,
गेले पार त्या स्थळीं,
त्यांसीं, आह्मी उतरुनी,
मिळूं ख्रीस्ताजवळी.
५ या भयांतुनी निघूनी
आह्मी जाऊं पैलपार,
दिव्य नगरीं पोंचुनी
सदा तृप्त राहणार.

---

540. THE HAPPY LAND.

"There is a happy land."

## ५४०. सुखाचें स्थान.

6, 4. Peculiar. ६, ४. तऱ्हेवाईक.

१ आकाशीं राहतें
सुखाचें स्थान,
तेथें जे भक्त ते
प्रकाशवान.
ते गाती गायनें,
"ख्रीस्ता करा वंदणें,
वाढवा स्तवनें,
द्या योग्य मान."
२ मित्रानो, संगें या,
तें श्रेष्ठ स्थान,
जग टाकुनी द्या,
तरी कल्याण.
आकाशीं सुखी व्हाल,
तेथें नाहीं पाप हाल,
आनंद सर्वकाळ
होई महान.
३ धन्य जे पावती
तें सुखस्थान,
ते प्रीति करिती
अखंड, जाण.
यत्न हो वाढवूं,
या, मुगुट मिळवूं,
व राज्य चालवूं
प्रकाशवान.

---

541. THE SHINING SHORE.

## ५४१. सोनेरी कांठ.

8, 7. Peculiar. ८, ७. तऱ्हेवाईक.

१ आयुष्य वेगें पळतें,
तें कां हो न पळावें?
तें मेघापाणी सरतें,
त्यामुळें न रडावें.
ध्रु० कां आह्मी उभे राहतां
यार्देन् नदीच्या तिरीं,
दिसे तो कांठ परता,
प्रकाशवान्, सोनेरी.
२ प्रभु हा गेला सांगुनी
कीं, जागे हो राहावें;
तयाचा बोध स्मरुनीं
मराया सिद्ध व्हावें. ध्रु०
३ संकटें दुःखें लागतां,
धैर्य हें न टाकावें,
शास्त्राचीं वाक्यें पाहतां
तेणेंच शूर व्हावें. ध्रु०
४ सर्व संबंध तुटले
तथापि शांत राहूं,

जावेत प्रिय सगळे,
वर्ते आकाशीं पाहूं. ध्रु०

542. CHILDREN IN HEAVEN.

### ५४२. लेंकरांकरितां सुखस्थान.

12, 9. १२, ९ अक्षरी.

१ लेंकरांलाहि आकाशीं जागा मिळेल,
प्रभू स्वतां त्यां बाळगणार,
तेथें असतां किती आनंद वाटेल,
कांहीं त्रासाया न शिरणार.
ध्रु०होय जागा मिळेल, तेथें जागा मिळेल,
लेंकरांलाहि जागा मिळेल,
प्रभू येशू त्यां आपल्यापासीं ठेवील,
किती सुखाची जागा होईल.
२ तेथें प्रभूचे सेवेस तीं लागतील,
कोणी आळसी न बसणार,
आज्ञा होतां तीं संतोषें मान्य होतील,
पाठवी तेथें त्वरें जाणार. ध्रु०
३ तेथें लेंकरें अभ्यासहि करतील,
ख्रीस्त शिक्षक होई उत्तम,
त्याना गुजें व ज्ञान शोधाया लावील,
किंवा देवाच्या प्रीतीचा क्रम. ध्रु०
४ प्रिय लेंकरानो, त्या सुस्थानीं जाया
तुह्मी उत्कंठा धरिली काय ?
वेगें शरण जा, कां तुह्मा ताराया
ख्रीस्तें साधिला पूर्ण उपाय. ध्रु०

543. PROSPECT OF HEAVEN.
"There is a land of pure delight."

### ५४३. आकाशाची आशा.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ सुखाचें राज्य आहे वर,
तें भक्त भोगितात,
तेजांत राहतां अमर
अति उल्हासतात.
२ तें ईश्वराची कृपा थोर
अखंड पावती,
तेथें जायाला नदी घोर
मृत्युची लागती.
३ ती नदी पुढें पाहतां
जनाला वाटे भय,
पार जायाला लागतां
कांपती अतिशय.
४ निश्चयें भय टाकुनी
आह्मी धरावा धीर,
आकाशीं डोळे लावुनी
करावें चित्त स्थिर.
५ चढुनी मोठ्या डोंगरीं
मोश्याप्रमाणें, जाण,
निरखितां प्रांतावरी
पाहावें तें खनान.
६ तो देश दृष्टीं पडतां
पळेल सर्व भय,
मरते वेळीं हर्षतां
करूंच जयजय.

544. THE BETTER LAND.

### ५४४. सुखस्थान.

Peculiar. तऱ्हेवाईक.

१ "कोठे जातां, यात्रिकानो ?
हातीं काठ्या घेउनी."
आह्मी जातों आकाशाला,
देव आज्ञा पाळुनी ;
राजमंदिराला जाऊं,
तेथें त्याची स्तुति गाऊं,
सुखस्थानीं पोंचुनी.
२ "सुखस्थानीं पोंचुनीया,
काय मिळे वाजवी ?"
शुभ्र झगे व मुकुट
मिळतील तेजस्वी ;

दिव्य अन्न, दिव्य पाणी;
कमी काय सुखस्थानीं?
राजा सर्व पुरवी.
३ "यात्रिकानो, आम्ही यावें
तुमचिया संगतीं?"
याहो, चला, बरें येतां,
बसा आमच्या पंगतीं.
देव तारी, गोष्ट साची,
कोणी आला तरी त्याची
आशा नची भंगती.

---

545. GOING HEAVENWARD.

"One sweetly solemn thought."

## ५४५. आकाशमार्गक्रमण.

१ आकाशीं जावया
मीं वाट धरिली,
व आज हर्षे क्रमाया
कीं आलों जवळी.
ध्रु० तैं दुःख न येणार,
तैं दुःख न येणार,
आकाशीं प्रीति राहती,
तैं दुःख न येणार.
२ बापाचें घर तें,
त्या ठायीं वस्त्या फार,
जीवनी पाणी वाहतें,
मी तेथें राहणार. ध्रु०
३ त्या स्थळीं पोंचतां
जाईल चिंताभार,
खांबाचें दुःख सरतां
मुगुट मिळणार. ध्रु०
४ दिसे वाटेवरी
मृत्यूची नदी घोर,
मी पार पोंचें तोंवरी
न मिळे सुख थोर. ध्रु०
५ बापा तूं नेहमी
विश्वास पुरवी,
या तिरीं उभा राहें मी
तों मन स्थिरावी. ध्रु०

---

546. HEAVEN INVISIBLE AND HOLY.

"Nor eye hath seen, nor ear hath heard."

## ५४६. आकाशसुख अतर्क्य व पवित्र.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ देवानें आपल्या भक्तांस
जें सुख योजिलें,
तें नाहीं दिसलें नेत्रांस,
कानीं न ऐकिलें.
२ तें सुख सदात्म्याकडून
कांहींसें कळतें,
हें ज्ञान सत्शास्त्रावरून
आम्हांला मिळतें.
३ पवित्र सुख आहे वर,
शांति व समाधान,
कोणी अशुद्ध कीं पामर
न पावे तें कल्याण.
४ तेथें नाहींच शिरणार
लबाड कीं टवाळ,
प्रभूच्या पाशीं राहणार
भक्तच सर्वकाळ.
५ तो त्यांचीं नावें राखितो
जीवनी पुस्तकीं,
सर्व पाप्यांस टाकितो
क्लेशाच्या नरकीं.

---

547. SINGING GLORY.

"Around the throne of God," &c

## ५४७. करा जय.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ वर्तें प्रभूच्या भोंवतीं
हजारों लेंकरें
हर्षानें उभीं राहती,

तीं गाती सुस्वरें,
ध्रु० "करा जयजय."

२ तीं शुभ्र वस्त्रें घालुनी
अत्यंत हो तेजाळ,
स्वर्गाचें सुख भोगुनी
गातात सर्वकाळ. ध्रु०

३ पूर्वीं तीं जगीं असतां
सोसीत दुःखें घोर,
आतां तीं सर्व स्मरतां
गाती ख्रीस्तासमोर. ध्रु०

४ तीं कसीं गेलीं तरुनी,
कोणी उद्धरिलीं?
जगाला कसें जिंकुनी
तीं गाऊं लागलीं. ध्रु०

५ प्रभूनें केलाहो उद्धार,
स्वर्गी भुतलीं,
ही त्याची कृपा वर्णितां
तीं गात सुटलीं. ध्रु०

६ ख्रीस्तावरी ठेउनी भाव,
टाकिला पापगाळ,
आतां स्तवुनी त्याचें नांव
तीं गाती सर्वकाळ. ध्रु०

---

548. Flying Heavenward.

"Oh, had I wings to fly."

## ५४८. आकाशाकडे उडणें.

6, 4. Peculiar. ६, ४ तऱ्हेवाईक.

१ पंख हो असल्यास,
त्वरेनें आकाशास
उडेन दूर.
पाहाया नक्षत्रास
चालेन शूर;

२ व दूत तेजवान
देवाला देती मान,
तसा देईन.
त्यांसंगें हर्षवान
भक्ति करीन.

३ स्तवुनी करुणा
मी जगज्जीवना
वाणीन फार,
तैं दुष्ट वासना
नाहीं येणार.

४ हे बापा, तूं दयाळ,
निवार माझे हाल,
सशक्त कर;
जातां आयुष्य काळ,
घे मला वर.

---

549. That will be Joyful.

"Here we suffer grief and pain."

## ५४९, तेव्हां किती हर्ष.

Peculiar. तऱ्हेवाईक.

१ एथें होतो खेद फार,
व वियोग वारंवार;
आकाशीं न होणार;
ध्रु० तेव्हां किती हर्ष!
हर्ष, हर्ष, हर्ष!
तेव्हां किती हर्ष!
तैं वियोग न होणार.

२ जे प्रभूचे भक्त, जाण,
त्यांस वर्ती मिळे स्थान,
प्रभूला पाहणार. ध्रु०

३ ज्या मुलांनीं वेळेवार
ख्रीस्त धरिला आधार,
ते त्यासीं राहणार. ध्रु०

४ जे मुलांस देती ज्ञान,
आईबाप, गुरु, जाण,
ते सर्व मिळणार. ध्रु०

५ प्रभु ख्रीस्त हा दिसेल,
तो सिंहासनीं बसेल,

आह्मी स्वीकारणार. ध्रु०
६ तेथें गाऊं गायनें,
प्रभू ख्रीस्ता स्तवनें
अखंड करणार. ध्रु०

---

550. I'M A PILGRIM.

## ५५०. प्रवासी.

Peculiar. तऱ्हेवाईक.

१ मी विदेशी व मी प्रवासी,
एथें राहें, एथें राहें एक रात.
त्वरेने जातों वर्ते अकाशीं,
तेथें अखंड प्रभु प्रकाशी.
ध्रु० मी विदेशी व मी प्रवासी,
एथें राहें, एथें राहें एक रात.
२ तेथें किती श्रेष्ट विश्रांति,
माझें चित्त माझें चित्त त्यावरी.
भवसमुद्रीं अखंड भ्रांति,
हिंडतां जगीं न होई शांति. ध्रु०
३ मी अकाशीं जातों उल्हासी,
माझा प्रभु, माझाप्रभु तें मिळेल.
दूःख न लागे, शत्रु न त्रासी,
अश्रु न गळे, मृत्यु न ग्रासी. ध्रु०

---

551. JOYFULLY.

## ५५१. हर्षवान.

10s. १० अक्षरी.

१ हर्षवान्, हर्षवान् आह्मी सत्वर
ईश्वरा भेटण्या चालतों वर,
प्रभु बोलावी, अहो वर्ते या,
हर्षवान्, हर्षवान् वतन घ्या.
तूर्ते हें मर्त्य शरीर पडेल,
तूर्ते हा आत्मा आकाशीं चढेल,
येश हा भावें स्वीकारिला तर
हर्षवान्, हर्षवान् जाऊंच वर.
२ तेथें भक्तांचे बहु समुदाय
ख्रीस्ता स्तवुनी आलिंगती पाय,
गाती आह्माला, अहो वेगें या,
हर्षवान्, हर्षवान् वतन घ्या,
कानीं तें पडतां गाणें मधुर,
मनाला वाटतें, कां राहूं दूर ?
वर्ते त्यांसंगें गायाला सुस्वर
हर्षवान्, हर्षवान् जाऊं सत्वर.
३ ख्रीस्त हा मरुनी पावळा जय,
गेलें हो गेलेंच मरणभय,
कबरीं पडला मोठा प्रकाश,
हर्षवान्, हर्षवान् चढूं आकाश.
पोंचुनी पावूं आनंद महान,
हिंडूं चहूंकडे तें रम्य स्थान,
ख्रीस्ताचा पाहतां सत्प्रेमभाव,
हर्षवान्, हर्षवान् स्तवूंच नाव.

---

552. I HAVE A FATHER.

## ५५२. आकाशीं बाप.

Peculiar. तऱ्हेवाईक.

१ आकाशीं माझा बाप राहतो,
मला बोलावी, जातों मी,
बापाची भेट इच्छितों.
ध्रु० जातों वर, जातों वर, आतां चालतों
मला बोलावी, जातों मी,
बापाची भेट इच्छितों.
२ आकाशीं माझा प्रभु राहतो,
मला बोलावी, जातों मी,
प्रभुची भेट इच्छितों. ध्रु०
३ आकाशीं हो मुगुट मिळतो,
प्रभु बोलावी, जातों मी,
मुगुट देऊं करितो. ध्रु०
४ प्रभु सर्वांलाहि बोलावितो,
मित्रानो, मला भेटा वर,
प्रभुला गाया इच्छितों. ध्रु०

---

553. Rest for the Weary.

५५३. कष्ट्यांस विसावा.

8, 7. ८, ७ अक्षरी.

१ वर्ते तेजस्वी आकाशीं
 भक्तां मिळतो विश्राम,
तेथें प्रभु बापापाशीं
प्रेमें सांगे माझें नाम.
ध्रु० कष्ट्यां मिळे विसावा,
 तेव्हां होई चैन;
यार्देनेच्या पैलथडीं,
एदेनाच्या सुस्थळीं,
जीवनाच्या झाडा खालीं,
 भक्तां होई चैन.
२ प्रभु जाया सिद्ध करी,
 तें अनंत सुखस्थान,
माझ्या मनीं हर्ष भरी,
देई मला राज्यदान. ध्रु०
३ तेथें दुःख पीडा नाहीं,
 नाहीं काळजी व भय,
तें मुगुट डोई राही,
अविनाशी, तेजोमय. ध्रु०
४ भक्तजन, गाहो स्तुति,
 करा मोठा जयजय,
वर्ते मिळे पूर्ण मुक्ति,
सुख सर्वदा अक्षय. ध्रु०

---

554. The Heavenly River.
"Yes, we'll gather at the river."

५५४. दिव्य नदी.

8, 7. ८, ७ अक्षरी.

१ स्वर्गातुनी दिव्य नदी
 सदा वाहतां निनळ,
तिच्या तिरीं मिळूं कधीं,
कधीं पाहूं तें सुस्थळ!
ध्रु० होय तिच्या तिरीं आम्ही मिळूं,
 त्या सुंदर नदीपासीं मिळूं,
 देवाच्या भक्तांसीं मिळूं,
 स्तुति अर्पूं ईश्वरा.
२ भक्ति भाव धरुनिया
 देऊं प्रभू ख्रीस्ता मान,
शुद्ध पाणी पिउनिया
होऊं किती भाग्यवान्! ध्रु०
३ पापभार टाकायाला
 प्रभु कृपा पुरवील,
तेथें पोचवी आम्हाला,
झगा तेजस्वी देईल. ध्रु०
४ त्याची दया वर्णितांना
 भक्त गाती सर्वकाळ,
मृत्यु कधीं नसे त्यांना,
नाहीं त्यां वियोगकाळ. ध्रु०
५ आम्ही वाट क्रमुनिया
 सोडूं हो हें भवरान,
तिच्या तिरीं पोंचुनिया
पावे अती समाधान. ध्रु०

---

555. The Heavenly Stream.

५५५. दिव्य नदी.

Peculiar. तऱ्हेवाईक.

१ जी सुंदर नदी दिव्य नगरीं
 सदोदित खळखळे,
तिची गोडी किती! कसी झळकती!
 हें कधीं किं ना ऐकिलें?
ध्रु० ती सुंदर नदी शोभा,
 ती सुंदर नदी पाहा,
ती गोड आहे तुडसाठीं वाहे,
 ती सुंदर नदी पाहा.
२ ती हिरव्या मैदनातुनी वाहे,
 ती खळखळा वाजती,
व तीच्या कांठीं धन्य वसनातीं
 आणि गायनें गोड गाती. ध्रु०

३ जी नदी निवळ, बिलोर परी,
तान्हेल्यांस आवडती.
त्या सुखस्थानीं सदा वाहुनी
ती जीवनी पाणी देती. ध्रु०
४ त्या नदी पासीं, रोप हटविती
अशा झाडाचे रम्य मळे;
अल्याड पल्याड तें जीवनी झाड
देई बारा तऱ्हांचीं फळें. ध्रु०
५ त्या सुंदर पाण्यानीं धुउनी घ्या,
पापमल जाई सर्वरें.
तान्हेल्यानों प्या; आत्मा म्हणतो या;
ही जीवनी नदी खरें. ध्रु०

---

556. THE NEW JERUSALEM.

"Jerusalem, my happy home."

५५६. नवी यरूशलेम.

C. M. ८, ६ अक्षरी.

१ यरूशलेम, यरूशलेम.
हें फार प्रिय नांव,
तिच्यांत मिळे मोठें क्षेम,
तो विश्रांतीचा ठाव.
२ माझ्या देवाच्या नगरी,
तूं केव्हां दिससील?
तेथील भक्त ईश्वरी
केव्हां आढळतील ?
३ तुझ्या कोटाचें मोठें बळ,
तुझें मोत्याचें द्वार.
सोन्याचे रस्तेहि सोज्वळ,
मी केव्हां पाहणार?
४ तेथें सत्सुख आहे थोर
कधीं न कोमतें;
तें पावायाला दुःख घोर
या जगीं लागतें.
५ सोसाया मला होवो धीर,
कधीं न वाटो भय,
प्रभूचीं वचनें खंबीर,
मला मिळेल जय.
६ यरूशलेम्, यरूशलेम,
हें फार प्रिय नांव,
तिच्यांत मिळे मोठें क्षेम,
तो विश्रांतीचा ठाव.

---

557. BEAUTIFUL ZION.

५५७. सुंदर जीयोन.

L. M. ८ अक्षरी, ६ चरणी.

१ सुंदर दिव्य नगरी,
सुंदर वस्ती ईश्वरी,
सुंदर रस्ते जाती पार,
सुंदर वेस मुक्ताद्वार.
जो प्रभु खांबीं मारिला,
तो उघडी तें मजला.
२ सुंदर राजा भगवान,
सुंदर दूत तेजवान,
सुंदर भक्त स्तविती,
सुंदर विणे धरिती.
सोन्याचा विणा मी घेऊन
ख्रीस्ता स्तवीन त्यांमिळून.
३ सुंदर मुगुट मस्तकीं,
सुंदर ध्वजा खारखी,
सुंदर झगे दवळे,
सुंदर तेथें सगळें,
येशू जो प्रभु वैभवी.
तो भक्तां करी गौरवी.
४ सुंदर तें देवमंदीर,
सुंदर तो विसावा स्थिर.
सुंदर सेवा ईश्वरी,
सुंदर प्रीति अंतरीं,
प्रभु स्वतेज दाखवील,
तो माझी आशा पुरवील.

---

558. Heaven.

## ५५८. आकाशलोकाचें वर्णन.

Hindu M. अभंग (देस, त्रिवट).

१ आकाशाचें सुख मज वर्णवेना,
अंत पार जाणा नाहीं त्यासीं.
२ द्वेष, निंदा, कज्जे, कपट कीं त्रास
स्वर्गीं यांचा वास नाहीं तेथें.
३ दुःख, कष्ट, शोक, मरणाची वार्ता
नाहींच सर्वथा, तया ठायीं.
४ नाहीं तान्ह, भूक, जगिक विलास;
परी प्रेमरस सेविताती.

---

559. Holiness of Heaven.

## ५५९. आकाश लोकाची पवित्रता.

Hindu M. अभंग.

१ पवित्र तो देव, पवित्र ते दूत,
पवित्रच भक्त सोबतीला.
२ पवित्र नगर, पवित्र देऊळ,
रस्तेहि निर्मळ त्या गांवाचे.
३ पवित्र सिंहासन, पवित्र पाळक
तोचि गुरुनायक ख्रीस्त माझा.
४ पवित्र हें शास्त्र प्रभु हातीं घेतो,
वाचूनी दावितो, पवित्रांस.
५ पवित्र तो बोध, पवित्र ती वाणी
पवित्रच कानीं पडतसे.
६ पवित्र गायन, मंजुळ सुस्वर
नाना वाद्यांवर वाजविती.

---

560. Bliss of Heaven.

## ५६०. आकाश लोकांतील आनंद.

Hindu M. अभंग.

१ सुवंद्य, सुवंद्य, सकळ ह्मणती;
मुगुट टाकिती प्रभूपुढें.
२ प्रेमाचे पाझर सुटती अपार,
जयजयकार परमेशाचा.
३ सद्भक्तांचे अश्रु प्रभु स्वतां पुसी
कुरवाळी त्यांसीं बहु प्रेमें.
४ शुभ्र वस्त्रें अंगीं तारणाची लेती,
आनंदें वंदिती प्रभुलागीं.
५ आनंद, आनंद, आनंद, आनंद,
पवित्र आनंद सर्वकाळ.
६ अनंत काळ तें सुख भोगतील,
कधीं न पडेल उणें त्यांत.
७ ऐशा स्थळीं देवा, मजला त्वां न्यावें.
प्रार्थितों मी भावें, कृपासिंधु.

---

561. Eternal Life satisfying.

## ५६१. अविनाशी सुख.

Hindu M. पद. (मल्हार, झंपा).

ध्रु० अविनाशि सुख ते मज पामराला
प्रभु देइ, तर शोक करुं मी कशाला,
१ स्वर्गीं नसे दुःख, मरणाचि वार्ता
परि प्रीति सुख शांति प्रभुची मनाला. ध्रु०
२ तेथें तहान, भूक लागे न कांहीं,
परि प्रीति प्रभु घाच संजीवनाला. ध्रु०
३ प्रिय पाडसें सारि जीं नेलिं त्यानें,
तीं सर्व सुखरूप देईल माला. ध्रु०
४ प्रभु हस्त पसरोनि, सद्भक्त येतां
धांवुन मिठि मारि त्याच्या गळ्याला. ध्रु०
५ प्रेमें ऐकतिं भक्त ती मधुर वाणी
आहा कसें वर्णु प्रभुदर्शनाला. ध्रु०
६ सद्भक्त गणदून गाती आनंदें
न्याहाळितां प्रीय प्रभुच्या मुखाला. ध्रु०
७ सद्भक्त मुगुटातें, काढून गाती,
जयजय, सुवंदीत. नव गीत त्याला. ध्रु०
८ प्रभु भक्त कवळोनि हृदयासिं धरितां
आहा नसे पार मग त्या सुखाला. ध्रु०

---

562. Praying for Heaven.

## ५६२. स्वर्गप्राप्तीसाठीं प्रार्थना.

Hindu M. आर्या ( गीति).

१ प्रभु हो, या जगिं माझा
  सैतानासीं असो उभा दावा;
मिळवुनी जय त्यावरि,
  अंतीं तो स्वर्गलोक मज दावा.

२ स्वर्गसुखाची गोडी
  आतांपासुनि मला प्रभू लावा,
भ्रम पडुनि नश्वरा हा
  अमृत आत्मा कदा न भूलावा.

श्लोक ( इंद्रवज्रा. )

देवाधिदेवा मज पामराला
टाकूं नको तूं मज बा दयाला,
मातेविना त्या लघु पांखराला,
आधार कैंचा जिव रक्षिण्याला.

---

563. Panting after Heaven.
"Ye angels, who stand round the throne."

## ५६३. आकाशांत जाण्याची उत्कंठा.

8s.(Anapæstic).८७० (तिहिरी)

१ आकाशीं दुतानों सकळ,
  जे राहतां ख्रीस्तासमोर,
ते तुह्मी गा कृपा सकळ,
  गा ईश्वरी करुणा थोर.
तुह्माला करुनी निर्माण
  प्रभूनेच दिल्हा सद्भाव,
बहुतेक मुकले स्थान
  तीं तुमचा केला बचाव.

२ जे भक्त पावुनी उद्धार
  प्रभूचें न्याहाळिती मुख,
ते तुह्मी गा कीर्ति अपार,
  तुह्माला मिळालें सत्सुख.
वाखाणा प्रभूचें सत्प्रेम,
  निवारिले केवढे हाळ,
अत्यंतहि दिधलें क्षेम,
  गा स्तुति, तो किती मायाळू.

३ मी तुमच्या संगें मिळून
  तें गायन केव्हां गाणार?
जगाला त्वरित सोडून
  जाण्याची उत्कंठा अपार.
देहामध्यें गुंतला जीव,
  बंदांतुनी केव्हां सुटेन?
हे देवा, ती वेळ पोंचीव,
  प्रभूला संतोषें भेटेन.

४ तो शुभ्र पोषाक घालीन
  जो ख्रीस्त रक्ताने सोडवळ
संपूर्ण पापाला टाळीन,
  पावेन संपत्ती सकळ.
अत्यंत भोगीन विश्राम,
  अखंड वर्णीन उद्धार,
ख्रीस्ताचें सुवंदित नाम
  प्रेमाने गाईन अपार.

---

564. Saints in Heaven.
"High in yonder realms of light."

## ५६४. आकाशांतील भक्त.

यो. १४: ३.

7s. ७ अक्षरी.

१ वरें प्रभूसंगतीं
  भक्त राहती तेजाळ
त्याची प्रीति भोगती,
  तो अत्यंत ममताळ.
मागें आह्मासारिखें
  त्यानी दु:ख भोगिलें,
जगीं तुच्छ हलके,
  पीडा क्लेश पावले.

२ परी आतां गेले पार,
  सरलीं तीं दु:खें घोर,
खेद नाहीं लागणार,
  तेथें होतो हर्ष थोर.

गाती दूतांसंगतीं
वर्णिती उद्धारक्षेम,
देवकृपा वंदिती,
स्तविती ख्रीस्ताचें प्रेम.

३ शांति तेथें सर्वकाळ,
भय कांहीं होईना,
कधीं नाहीं कष्ट हाल.
दु:ख रोग येईना.
ख्रीस्तें अश्रु पुसिलें,
त्यांस दिधला विश्राम,
सर्व क्लेश वारिले,
गाती ते प्रभूचें नाम.

---

565. SAINTS IN HEAVEN.
"Who are these in bright array."

५६६. आकाशांतील भक्त. प्रग७.

7s. ७ अक्षरी.

१ पाहा, ते आकाशीं कोण
अगणित समुदाय?
त्याले शुभ्र पांघरूण,
धरिती ख्रीस्ताचे पाय.
ते हें गाती त्यासमोर,
"योग्य आहे कोंकरा,
द्या हो त्याला मान थोर,
स्तवा परमेश्वरा."

२ ते महाकष्टांतुनी
कृपे पावुनी निभाव
आले ख्रीस्त सदनीं,
का कपाळीं त्याचें नांव.
शुभ्र झगे ल्याले ते,
जयध्वजा धरिती ;
जयवंत पुरते
ख्रीस्तापासीं ठरती.

३ आतां नाहीं तान्ह भूक,
ऊन नाहीं लागणार,
प्रभू देई मोठें सुख,
जीवनाचें पाणी फार.
त्यांच्या अंत:करणीं
हर्ष सदा असतो,
अश्रु डोळ्यांपासुनी
प्रभु स्वतां पुसितो.

---

## INDEX OF FIRST LINES OF THE ENGLISH HYMNS TRANSLATED.

---

## शास्त्रांतील ज्या वाक्यांवरून गीतें केलीं त्यांची अनुक्रमणिका.

# SELECT HYMNS.

# गीतांचें वेंचे.

## गीतें.

"SWEET BY AND BY."

### १. येणारा सुदिन.

१ दिव्य तेजें प्रकाशित स्थळ
दिसे विश्वास नयनें वर,
तेथें आह्मांसी वस्ती अढळ
प्रभु देईल, तो प्रियकर.
ध्रु० आहा! त्या सुस्थळीं पार नाहींच हो विश्रामा,
तेथें ही सुदिनीं भेट होई प्रियांचीआह्मां.

२ तारिलेल्यांचीं तीं गायनें
तेव्हां गाऊं मंजूळ स्वरें,
नाहीं कोणाचें तें रडणें,
दुःख पीडा हें गेलें सारें. ध्रु०

३ प्रभु ख्रीस्त अत्यंत प्रेमळ,
सर्व सत्सुख जो पुरवी,
जीवनाचा तो पाया सबळ,
त्यास वंदूं सदा गौरवीं. ध्रु०

---

"I LOVE TO TELL THE STORY."

### २. ख्रीस्ताची थोर प्रीति.

१ ख्रिस्ताची थोर प्रीति
सांगेन तुजला,
तो नीच झाला किती
व कसा वर्त्तला.
सांगेन कां ती साची,
ती गोड वर्णीया,
ही गोष्ट ताराणाची
बिचारे पापियां.

ध्रु० ही ख्रीस्तप्रीति गावी
जनांस कळवावी,
आकाशीं ही वर्णावी
हें फार आवडे.

२ ख्रीस्ताची थोर प्रीति
अपूर्व ती अपार,
गाईन त्याची स्तुति
न कधीं राहणार.
कां मज पापिष्टाला
त्या ख्रीस्तें शोधिलें,
किती हो कळवळा !
अशाला तारिलें. ध्रु०

३ ख्रिस्ताची थोर प्रीति
मी सांगे जनां ती,
ती मला हर्ष देती,
रसिक वाटती.
आहा ! बहुतेकांला
ही नाहीं कळली.
सांगावी त्यां ही मला
उत्कंठा लागली. ध्रु०

४ ख्रीस्ताची थोर प्रीति
ही ज्यांस कळली'
ते पुनः इच्छितांनी
ऐकाया सगळी.
आकाशीं गाऊं आह्मी
नवीन गायनें,
होतील तीं नेहमी
ख्रीस्ताचीं स्तवनें. ध्रु०

---

"SAFE IN THE ARMS OF JESUS."

## ३. सदाश्रय.

ध्रु० प्रिय प्रभूच्या हातीं
सुरक्षितसा मी,
माझ्या जीवा विश्रांति
होईल नेहमी.

१ आकाशीं दिव्य प्राणी
सुखांत नांदती
प्रभूला ते स्तवूनी
आनंदें ह्मणती. ध्रु०

२ सुरक्षितसा आतां,
गेला तो पाप भार,
जगिक नाहीं चिंता,
मोह न लागणार.
ह्यीं भवदु:खें सारीं
प्रभूनें वारिलीं,
तो मला तृप्त करी,
आशा ही लागली. ध्रु०

३ सुरक्षितसा ठेवी,
प्रभू तूं सदाश्रय,
प्रेमाची छाया व्हावी
मजवरी अक्षय.
उद्धरिलें त्वां मला
स्वप्राण देऊनी;
सुदिनीं ये न्यायाला
त्या सुख सदनीं. ध्रु०

---

"JESUS LOVES EVEN ME."

## ४. मज पतितावर ख्रीस्तप्रीति.

१ प्रभूची प्रीति पतितांवरी
शास्त्रांत वर्णिली पाहा खरी,
तेथें आढळली सुवार्त्ता ही
ख्रीस्त हा तारील मजलाही.

ध्रु० आतां सदा आनंदित मी,
मजलाही ख्रीस्त तारी,
आतां सदा आनंदित मी,
सुवंद्य ती प्रीति.

२ मज लाचारास उद्धराया
प्रेमें तो आला जगीं राहाया,
प्रेमेंच खांबीं प्रभू टांगला,
ह्मणून तो अति प्रिय मला. ध्रु०

३ प्रिय ख्रीस्ता कधीं विसरतों,
तरी तो मला नचि सोडितो,
ही अनिवार प्रीति स्मरूनी,
शरण जातों त्या मी रडुनी. ध्रु०

४ कशी ती प्रीति कळे तुजला,
कोणी विचारी जरी मजला,
तरी सदात्मा बोले अंतरीं
तुजवरी ख्रीस्त प्रीति करी. ध्रु०

५ ह्या विश्वासांत समाधान फार,
ख्रीस्त मला कधीं न टाकणार,
सैतानसत्ता नाहींशी होती
जेव्हां मी वर्णीं ख्रीस्ताची प्रीति. ध्रु०

६ आहा! मी आकाशीं जाईन वर
पाहीन जेव्हां तो राजा सुंदर,
तेव्हां गाईन दूतांसंगतीं
ख्रीस्ताची अपरिमित प्रीति. ध्रु०

---

"HOLD THE FORT."

## ५. सैनिकांचा जय.

१ सैनिकांनो धैर्य धरा,
युद्धीं असा स्थिर,
पाहा पुढें चालणारा
ख्रीस्त महावीर.

ध्रु० जयजयकार करा यश मिळतें,
साह्यकारी प्रभु ख्रीस्त आह्मां संगातें.

२ जवळी असंख्य वैरी
हल्ला करिती,
बाण येती आह्मांवरी,
शूर पडती. ध्रु०

३ तो वैऱ्यांचा सरदार
मोठा बळवान,

तरी ख्रीस्त तारणार
कैवारी महान. ध्रु०
४ सैनिकांनो कां दबावें,
लढा त्यांजशीं,
शेवटास युद्ध न्यावें,
मिळा ख्रीस्ताशीं. ध्रु०

"COME, COME TO JESUS."

## ६. ख्रीस्तास शरण जाणें.

१ ख्रीस्ताशीं आतां शरण जावें,
कां भटकावें ? शरण जावें.
२ शरण जावें, ख्रिस्तानें खंडिलें,
कैद्यांशीं सोडिलें, शरण जावें.
३ शरण जावें, टाका प्रभूवरी
तें ओझें सत्वरी, शरण जावें.
४ शरण जावें, तूं दुःखी आंधळा
दृष्टि लाभे तुला, शरण जावें,
५ शरण जावें, तो वाट पाहतो,
आश्रय दावितो, शरण जावें.
६ शरण जावें, तूं दीन खंगला,
कृपाळू प्रभूला शरण जावें.

"THE NINETY AND NINE."

## ७. हरपलेलें मेंढरूं.

१ निर्भय व सुखी बसलीं
वाड्यांत मेंढरें,
तीं नव्याण्णवच दिसलीं,
हरपलें एकरें.
तें राहिलें रानीं हिंडाया,
नाहीं कोणी मेंढपाळ त्या.
२ त्याशीं मेंढपाळ न पाहुनी,
संतुष्ट होईना,
तो ह्मणे मला त्या वांचुनी
समाधान वाटेना.
जाईन त्या रानीं शोधाया,
त्या हरपलेल्या आणाया.
३ तत्काळ त्या रात्रीं मेंढपाळ
पाहाया चालला,
तो नद्या व डोह विकराळ
ओलांडूनी फिरला.
त्या दीनाचे स्वर ऐकिले,
तें होतें मरायास पडलें.
४ त्या मेंढपाळें जे दुःख हाल
त्या रात्रीं सोसिले,
व कांट्यांनीं झाला तो घायाळ
कोणास न कळलें.
परी पाय रक्तानें भरले,
व हातांत वण दिसले.
५ तरी मेंढरूं जों सांपडलें
त्यास झाला हर्ष फार,
हातीं उचलुनीं घेतलें
व काढिला जयकार.
आकाशीं दुतांनीं ऐकिलें,
तों त्यानीं आनंदें गाईलें.

"DEAR SAVIOR EVER AT MY SIDE."

## ८. ममताळु प्रभू.

१ हे प्रिय प्रभू मजसीं
तूं किती ममताळ !
मलाही नित्य राखसी
जो थोर जगपाळ.
२ तुझें स्वरूप तेजस्वी
या नेत्रीं दिसेना,
जी वाणी वाऱ्या शांतवी
ती कानीं पडेना.
३ आई सुस्वरें शिकवी
घेऊनी मजला,
तसें तूं प्रभू गौरवीं
न मार्ग दाविला.
४ परी तूं मनीं करिसी
पवित्र प्रेरणा,
प्रेमें वागावें जनासीं
ती तुझी सूचना.

५ तसेंच प्रति दिवसीं
मी करीं प्रार्थना,
तूं प्रभू तेथें असती,
बोलतोसी मना.
६ तुझी विनंती नेहमी
मजसाठीं चालती,
स्तवीन तुझी कृपा मी,
ती मला तारिती.

---

"WORK FOR THE NIGHT IS COMING."

## ९. दिवसां श्रम करा.

१ श्रम कराया लागा
पहाटीं उठुनी,
करा सुफळ जगा,
खपा झटूनी.
बसावें कां दुपारीं,
सुवेळ ही जाणार,
वेगें येई अंधारी,
दिन सरणार.
२ श्रम कराया लागा,
ईश्वर लावितो,
सर्व साहित्य मागा,
पुरवील तो.
मागलों श्रमें तरी
आराम मिळणार,
झटा, येई अंधारी,
दिन सरणार.
३ श्रम कराया लागा
जनास ताराया,
ख्रिस्ताचें नाम सांगा,
मार्ग दावा त्यां.
ख्रिस्ताचा सर्वांवरी
झेंडा उभारणार,
झटा हो जन्मवरी,
काळ सरणार.

---

"A BEAUTIFUL LAND BY FAITH I SEE."

## १०. विश्वासाचा सुवर्णमय देश.

१ विश्वासें जो देश दिसतो
सुवर्ण, तेजोमय तो,
पवित्र जे तेथें राहती
ते दुःखें विपत्ति नेणती.
ध्रु० येतां काय ? येतां काय ?
तेथें राहयास येतां काय ?
येतां काय ? येतां काय?
मज बरोबरी या.
२ त्या सुंदर देशीं जे जाणार
त्यां पुनः रात न होणार,
जो ईश्वर तेथें राहतो
स्वतेजें तो जागा भरतो. ध्रु०
३ ती नितळ नदी जीवनी
वाहती त्या देशांतुनी,
तीं झाडें आरोग्य देणारीं,
व तेथील रस्ते सोनेरी. ध्रु०
४ तेथें भक्तजन नांदती
ते शुभ्रवस्त्रें शोभती
ते गायन गाती सगळे,
कीं ख्रीस्तकृपेनें तारलें. ध्रु०

---

"FAR FROM THE FOLD OF JESUS."

## ११. ख्रीस्त मेंढका.

१ कोंडवाडा मी सोडूनी दूर हिंडलों,
मूर्ख कोंकरूं मी तेव्हां, रानीं हरलों;
तरी प्रिय मेंढक्यानें मला शोधिलें,
माझीं भयें शांतवूनी हातीं धरिलें.
ध्रु० ख्रीस्त जो मेंढका, सुवंद्य तो सुप्रिय,
ख्रिस्ताठायीं मोठी प्रीति, ती अवर्णनीय.
२ त्यानें माझी क्षमा केली, प्रेम दावुनी,
स्थिर पाण्यापाशीं नेलें ओल्या कुरणीं.
आतां सुखी मी अत्यंत, तृप्त सर्वस्वीं,
रात्रींहि शांतीनें निजे तोचि राहवी. ध्रु०

३ सदां त्याचें मी ऐकेन, नाहीं हिंडणार,
मेंढक्यापासुनी कोण मजला नेणार?
अंतीं तो ठेवील मला दिव्य कुरणीं,
तों आनंदें मी गाईन ख्रिस्ता स्तवुनी. ध्रु०

---

"LORD A LITTLE BAND AND LOWLY."

## १२. दीनांची प्रार्थना.

१ प्रभू, आह्मी दीन प्राणी
तुजपुढें नमतों,
थोर तूं, पवित्र, ज्ञानी,
तुला आतां वंदितों.
दे सदात्मा,
साह्य त्याचें मागतों.
२ प्रिय येशू, तुझी प्रीति
सदा राहो अंतरीं,
आचराया दया नीति
ने आह्मां मार्गावरी.
तुझी सेवा
करूं जगूं तोंवरी.
३ देवा कसें तोषवावें
रोज आह्मां सुचवी,
प्रति दोष त्वां वारावे,
तुला दिसे सर्वस्वीं,
शुद्ध राख
मोहांतुनी सोडवी.
४ खरे आह्मी दुष्ट पापी,
तरी दया दाखवी,
आतां झालों पश्चातापी,
क्षमा कर, शांतवी,
अंतकाळीं
आकाशांत पोंचवी.

---

"O COULD I SPEAK THE MATCHLESS WORTH."

## १३. ख्रीस्ताचें प्रेम.

१ ख्रीस्ताचा प्रेम सांगाया
महिमा त्याचा वर्णाया
किती हो मी दुर्बळ!
देवा तूं मला प्रेरूनी
दुतांचे स्वर देऊनी
कर मला प्रेमळ.
२ स्वरक्त कसें अर्पूनी
पाप्यांची केली खंडणी
गाईन मी अपार,
ख्रीस्ताचें पुण्य वैभवी
हा मला झगा तेजस्वी
स्तवीतां वंदणार.
३ आकाशींहि उंचाविला
अनंत प्रेम दाविला
हें सुस्वरें गाईन,
परी हें कैसें करवेल.
संपूर्ण कैसें वर्णवेल,
तें केव्हां संपवीन!
४ सुवेळीं मला बोलावील,
स्वमुख मला दाखवील,
वंद्य ख्रीस्ता पाहीन;
तारक, भाऊ, मित्र तो,
अत्यंत कृपा करितो,
अखंड त्या स्तवीन.

---

"WATCHMAN TELL US OF THE MORNING."

## १४. यात्रिकाचें गायन.

१ जागल्या सुदिन प्रभा
उदयास आली काय?
जियोना येणारी शोभा
कोठें दिसे तिळप्राय?
यात्रिका पाहावें वरी,
फाकतो अरुणोदय,
सर्व संशय दूर करी,
चालतां हो हर्षमय.
२ होय आतां प्रभा चढे,
उत्साहाची खूण ती,
सारीं राज्यें ख्रिस्तापुढें

नमतील, भाक ती.
जागल्या तो पाहिलारे,
दिव्य लोक हा खनान !
आकाशातुनी उतरे,
किती तो दैदीप्यमान.
३ यात्रिका तो मार्ग तुझा
पाहा झाला तेजस्वी,
ती उंचावलेली ध्वजा
जयकार सुचवी.
करण्याच्या आवाजानें
भक्तजन उठणार,
शोभले अमरत्वानें,
आकाशांत चढणार.
४ जागल्या, सुगंध वारा
आतां वाहूं लागला,
ऐक त्या मंजूळ स्वरा,
देश जवळी आला.
एदेनेच्या सुशोभेनें
पाहा कसा वेष्टिला !
आले यात्रिक हर्षानें,
आतां मार्ग संपला.

---

"ALL FOR JESUS."

## १५. ख्रीस्तासाठीं सर्व.

१ ख्रीस्तासाठीं सर्व कांहीं
माझ्या सर्व शक्ति, प्राण,
शब्द, कामें, कल्पनाही,
सर्व दिन, तास, जाण.
ध्रु० ख्रीस्तासाठीं सर्व कांहीं
माझें सारें जिणें जाण.
२ हात हेही त्याचे कार्या,
पाय मार्गी चालाया,
नेत्र माझे त्या पाहाया,
ओंठ स्तुति गावया. ध्रु०
३ रत्नें, तेजस्वी पदार्थ,
कीर्ति, द्रव्य, सुखें यास
मानी जग थोर अर्थ,
परी ख्रीस्त माझी आस. ध्रु०
४ ख्रीस्ता प्रेमें न्याहाळितां,
दुजें सारें वाटे वीट,
त्याशीं जडे चित्त आतां
देतां ख्रीस्त खांबीं दीठ. ध्रु०
५ ख्रीस्त राजा गौरवी हा
मला प्रिय मानितो,
केवढें आश्चर्य पाहा!
सदाश्रय माझा तो. ध्रु०

---

"I HAVE HEARD OF A SAVIOR'S LOVE."

## १६. ख्रीस्त तुलाही तारील.

१ प्रभू ख्रीस्ताची मोठी प्रीति
जनां वर्णितां मी ऐकीलें
मज पतितावरी ती होती
हेंही ऐकाया फारच इच्छिलें,
हेंही ऐकाया इच्छिलें.
ध्रु० तुला मला त्या ख्रीस्तें प्रीति दाविली
कां वरूनी येऊनी प्राणही आर्पुनी
प्रीति सर्वां दाविली.
२ ख्रीस्तें साहिलीं दुःखें कैसीं,
तळमळला खांबावरी,
गोष्ट ऐकूनी सुचे मनासीं,
मज करितां सोसिलीं तीं खरीं ?
मज करितां तीं खरीं ? ध्रु०
३ भावें शरण जाती ख्रिस्ता
ते सुखांत सदा राहतील.
ख्रीस्त देई अशा जागा स्वर्गा,
तसी काय तो मजलाही देईल.
काय, मजलाही देईल ? ध्रु०.
४ प्रभू प्रिया, त्वां उत्तर द्यावें,
कोण मजला तुज शिवाय !
त्वां सदास्याकडूनी सांगावें,
मला कृपेनें तारण देसी काय?
मला तारण देसी काय ?

ध्रु० तुलाही म्या तारिलें, तुला तारिलें.
जो शरण येई त्या तारण मिळे,
अशा पतितां तारिलें.

---

"DRAW ME NEARER."

## १७. प्रेमभाव.

१ त्वां बोलाविलें सेवा कराया,
आलों प्रभू आनंदें,
तरी विश्वासें तुजजवळी
मला सदा राहूं दे.
ध्रु० मला जोड तुजशीं प्रभू,
तुझा क्रुस दावूनी,
घेई तुझ्या प्रीय कुशीसी,
घेई प्रभू ओढुनी.
२ तुझ्या सेवेला योग्य व्हावेंसें
मला कर कृपेनें.
तुझ्या ईच्छेला मान्य सर्वदा,
स्थीर व्हावें आशेनें. ध्रु०
३ घडीभरही तुजजवळी
किती सुख मनासी !
होती मागणीं, प्रीतिभाषणें,
जसीं मित्र मित्रासीं. ध्रु०
४ तरी संपत्ती तुझ्या प्रीतिची
इहलोकीं कळेना,
आणि भरती सदानंदाची
न मिळे स्वर्गाविना. ध्रु०

---

"I NEED THEE EVERY HOUR."

## १८. प्रभूची गरज.

१ प्रभू, हो जवळी क्षणोक्षणीं.
मला शांत करी तुझी वाणी;
ध्रु० तुझें सहाय लागे
पदोपदीं लागे,
पाहा मी साह्य मागें, आतां लागे.
२ प्रभू, तूं असतां टेंका देसी,
का मोहाची सत्ता तू मोडिसी. ध्रु०
३ प्रभु, तुजविण जिणें वांया,
सुखीं कीं दु:खीं मी भरीं पायां. ध्रु०
४ प्रभू, तूं आपली इच्छा कळीव,
माका पूर्ण करी, कृपा पुरीव. ध्रु०.
५ ख्रीस्ता, परात्परा, तूं पवित्र,
तुझा असावा मी खरा मित्र. ध्रु०

H. P. B.

---

"YES, FOR ME, FOR ME HE CARETH."

## १९. होय, मला तो संभाळितो.

१ येशू करी माझी चिंता
खरा दीनबंधु तो,
मला समदु:खी होतां
माझें ओझें वाहतो.
२ त्याच्या प्रिय सहवासें
तृप्ति होई मजला,
जगीं सुख नाहीं तसें,
तो आधार जिवाला.
३ मला त्याच्या छायेखालीं
भय नाहीं वाटणार,
सर्व दु:खें दूर गेलीं
माझा जीव हर्षे फार.
४ मजसाठीं तो मध्यस्थी
बापापासीं करितो,
ढळेना येशूची प्रीति,
त्यास मी वाखाणितों.
५ तो येईल मला न्याया
याची वाट पाहतों,
तरी तुष्ट मी राहाया
स्तुति गात चालतों.

---

"I AM COMING TO THE CROSS."

## २०. अनुभव.

१ येशूपासीं आलों मी,
तोच देई पूर्णोद्धार,

का कीं, भ्रष्ट मी श्रमी,
भरी माझा दंडभार.

२ खरा भाव अंतरीं,
येशू पुत्र ईश्वरी;
प्रेमें सदा उद्धरी,
टेंका, टेंका त्यावरी.

३ पाप ओझें काढितो,
मनीं शांति भरितो,
शुद्ध पूर्ण करितो,
सुखस्थानीं नेई तो.

४ येशूपासीं आलों मी,
तोच देई पूर्णोद्धार,
का कीं भ्रष्ट मी श्रमी,
भरी माझा दंडभार.

---

